सत्कार्योत्तेजक सभा-धुळें

श्री

## रामदास आणि रामदासी

## भाग आठवा

# श्रीसमर्थप्रताप

समर्थ सद्गुरु पूर्ण भावें सेविती ।
त्यांचे सर्व हि मनोरथ पुरती ।
सर्व कामना परिपूर्ण होती ।
सद्गुरुसमर्थप्रतापें ॥

हा ग्रन्थ शंकर श्रीकृष्ण देव यांनीं धुळें येथें
आपल्या श्रीआत्माराम छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केला.



विजया दशमी शके १८३४

किंमत बारा आणे

# श्रीसमर्थप्रताप

## अनुक्रमणिका

# प्रस्तावना



॥ श्रीराम ॥

## १

## श्रीगिरिधर आणि त्यांची कविता



**श्रीमद्दास उदास स्वामि अमुचे कृष्णातिरीं राहती ।**
**नाना गूण गुणानुवादश्रवणें संतर्पणें मांडिती ।**

**देहातीत असोनि देह भजनीं भक्तित्रिवेणीमधें ।**
**राहे संतजनीं गिरीधर कवी स्वानंदसिंधूमधें ॥**

श्रीसमर्थप्रतापाचे कर्ते श्रीगिरिधर हे कोठील, कोण, त्यांची परंपरा कशी, त्यांचे ग्रन्थ कोणते, त्यांनीं एकंदर व्याप काय केला, इत्यादि माहिती, देतां येईल तितकी, प्रस्तावनेंत अगत्य दिली पाहिजे.

श्रीसमर्थांच्या ज्या अनेक शिष्यिणी होत्या त्यांत वेणाबाईचा अधिकार फार मोठा होता. शिष्यिणींपैकीं फक्त वेणाबाईस च सभेमध्यें उभे राहून कीर्तन करण्याची श्रीसमर्थांची अनुज्ञा होती.

**वेणाबाईवांचूनि कांहीं । इतरां कन्येसी सभेसी कीर्तनआज्ञा नाहीं ।**
**येकासनीं बैसोनि कीर्तन करणें पाहीं । प्रसंगानुसारें मर्यादें ॥** $\frac{२०}{३१}$

आकामहाराजांच्या मुखांतून वेणाबाईसंबंधानें निघालेले प्रेमोद्गार बखरींत दिलेले च आहेत. पुढें श्रीसमर्थप्रतापांत हि अनेक स्थळीं त्यांचा उल्लेख आलेला आहे. वेणाबाईचा मठ मरीचि क्षेत्रीं ह्मणजे मिरजेस असे व हल्लीं हि आहे. वेणाबाईची श्रीगुरुचरणीं असामान्य निष्ठा होती व श्रीसमर्थ ती जाणून होते हें सांगणें नलगे. एकदां श्रीसमर्थ बाहेगांवीं गेले असतां कृष्णेच्या वाळवंटांत वेणाबाईचें वस्त्र वाळतांना त्यांनीं पाहिलें. तें च श्रीसमर्थांनीं विभागून त्याची मेखळा करून ती अकरा दिवस कंठीं धारण केली. केवढें हें वेणाबाईचें भाग्य !

**मनीची जीवीची गोष्टी यथार्थ । भक्तिवेणीसी सांगती समर्थ ।**
**कां जे श्रीरामउपासकांपासीं गुह्यार्थ । आत्माराम निरोपिती ॥ १३/४७**

अशी वेणाबाईंची योग्यता होती. वेणाबाईंना एकदां एक साक्षात्कार झाल्याची गोष्ट प्रतापाच्या तेराव्या समासांत शेवटीं दिली आहे. मायेच्या पुरांत गोते खाणारे जे कोणी श्रीसमर्थचरणीं लीन होऊन राहतात, त्यांना प्रत्यक्ष श्रीराम आपल्या पाटीवर घेऊन परतीरास नेऊन पोहोंचवीत असल्याचा वेणाबाईंना साक्षात्कार झाला होता. तो त्यांनीं श्रीसमर्थांस सांगितला; तेव्हां श्री

**समर्थ ह्मणती माझी हे चि श्रीरामउपासना ।**
**शरणांगतासी पाववी निरंजना ॥ १३/५०**

वेणाबाई मोठ्या साक्षात्कारी होत्या. गिरिधरांचें त्यांच्यावर एक पद आहे, त्यावरून हि त्यांचा अधिकार किती मोटा होता हें व्यक्त होणार आहे. त्या पदावरून वेणाबाईंची योग्यता जशी दिसून येते, तशी च गुरुभक्तांची हि थोरवी प्रत्ययास येत आहे आणि ह्मणून तें पद येथें देतों :—

॥ श्रीरामकर्ता ॥

**गुरु निशब्दाचीं बीजें । आह्मा प्राप्त आत्मकाजें ॥ १ ॥**
**आह्मी अबोल अबोल । अबोलें बोलूं बोल ॥ ध्रु० ॥**
**आमुची माया वांज जाली । परब्रह्मीं लया गेली ॥ २ ॥**
**शब्द आकाशीं निमाला । आत्माराम अवघा जाला ॥ ३ ॥**
**वेणीस्वामियाच्या संगें । आह्मी राहों आत्मरंगें ॥ ४ ॥**

**भवस्वर्ग मनोभास । मनोभास केला नास ॥ १ ॥**
**आह्मी आत्माराम रामीं । रामीं राम परंधामी ॥ ध्रु० ॥**
**आह्मी मन मागें केलें । मनासवें अवघें गेलें ॥ २ ॥**
**वेणीस्वामियाचा संग । येकसरा मनोभंग ॥ ३ ॥**

**आमुच्या वाटे नका जाऊं । नये ते वाटे तुह्मा लाऊं ॥ १ ॥**
**आह्मी पारिखे पारिखे । न हों लोकिकासारिखे ॥ ध्रु० ॥**
**अशी स्थिति जाली मोठी । पोटीं ब्रह्मांडाच्या कोटी ॥ २ ॥**
**वेणीस्वामी आत्माराम । तें चि आमुचें परंधाम ॥ ३ ॥**

**गुरुवाक्यप्रेमनौका । मायासागर तरलों देखा ॥ १ ॥**
**आह्मी स्वामीचे अंकित । रामनामें मुद्रांकित ॥ ध्रु० ॥**
**अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें ॥ २ ॥**

**आली अनुभवाची खूण । खूण केली रामार्पण ॥ ३ ॥**
**वेणीस्वामी अवघा जाला । विज्ञानासी अंत आला ॥ ४ ॥**

**देह माझें मन माझें । सर्व नेलें गुरुराजें ॥ १ ॥**
**आह्मी गुरुनाथपंथी । ज्ञानमुद्रा दिधली हातीं ॥ ध्रु० ॥**
**कर्णी चढली नाममुद्रा । [1] अगोचरी मुद्रा ॥ २ ॥**
**कान फाडुनि जोगी जालों । संतदर्शनासी आलों ॥ ३ ॥**
**वेणीस्वामीचें दर्शन । मायासंकेतनिर्शन ॥ ४ ॥**

वेणाबाई जशा साक्षात्कारी होत्या तशा च त्या प्रासादिक ग्रन्थकार हि होत्या. त्यांची कांहीं स्फुट कविता तर आहे च, पण "सीतास्वयंवर" ह्मणून त्यांचा एक ओवीबद्ध ग्रन्थ सभेस उपलब्ध झाला आहे. सदरहु ग्रन्थाचे चवदा समास असून ओवीसंख्या १५४६ आहे. भाषा शुद्ध, सुलभ व गोड आहे. श्रीदासबोधाची प्रभा त्यावर सर्वत्र सारखी पडलेली दिसते. "सीतास्वयंवर" ग्रन्थ खरोखर इतका प्रेमळ आहे कीं, तो छापला जाण्याविषयीं महाराष्ट्रानें उतावीळ झालें पाहिजे. श्रीसमर्थशिष्यिणींपैकीं च काय पण कोणा हि शिवकालीन महाराष्ट्रस्त्रीनें लिहिलेला दुसरा ग्रन्थ उपलब्ध नाहीं. सीमंतपूजन, हळद, पत्रिकापूजन, देवकप्रतिष्ठा, रुखवत, तेलवण, पायघड्या, कलशपूजा, गणेशपूजा, दागिन्यांचें वर्णन, मधुपर्क, लाज्याहोम, सुनमुख, उखाणे, हळदीउटणें, अक्षवाणें, भोजन, पक्वान्नांचीं नांवें, साडिसमर्पण, वरात, लक्ष्मीपूजन, वगैरे लहान मोठ्या सोहळ्यांचें वर्णन इतकें प्रासादिक आहे कीं, हरएक लग्नप्रसंगीं वेणाबाईच्या "सीतास्वयंवर" ग्रन्थाचें पठण करणें वधुवरांस मंगलकारक झाल्यावांचून राहणार नाहीं. या ग्रन्थावरून वेणाबाईच्या योग्यतेची साक्ष उत्तम पटते; असो.

वेणाबाईनीं आपला नश्वर देह श्रीगुरुसंनिध श्रीसज्जनगडावर शके १६०० च्या चैत्र वद्य १४ स ठेविला.

**श्रीरामनौमी विसावे दिनीं । सद्गुरुचरणीं लीन वेणी ।**
**चांफळपर्यळीं अधिष्ठानीं । आत्मारामीं निमग्ना ॥** २०/५४

त्यांच्या समाधिस्थळीं त्या वेळीं एक चंपक वृक्ष निर्माण झाला होता, पण कालांतरानें तो नष्ट होऊन आज त्या जागीं फक्त एक वृंदावन दर्शनासाठीं आहे.

---

1 मुळांत येथें जागा सोडली आहे. "मुखीं" असा शब्द योजावा.

या वेणाबाईच्या बाइयाबाई नामेंकरून कोणी शिष्यिणी होत्या. त्यांची फार च थोडी माहिती आपणांस आहे. एकदां सहा महिने त्या केवळ सद्गुरु-चरणतीर्थ सेवून होत्या. तीन वर्षें त्यांनीं श्रीगुरुचरणाचें अखंड ध्यान करण्यांत कंठिलीं. बाळपणीं च त्यांना श्रीरामदर्शन झालें होतें. दहीभाताचा नैवेद्य दाखवीत असतां प्रत्यक्ष श्रीराम त्यांच्या ताटांत जेवल्याची हकिकत पुढें ग्रन्थांत अकराव्या समासांत गिरिधर सांगत आहेत. लग्न झाल्यावर हि बाइयाबाईंना प्रपंचाची झांपड पडली नाहीं. कोठून पडणार! हातांत श्रीमत् दासबोधाची पोथी घेऊन त्यांनीं केव्हां केव्हां अहोरात्र वनांत उदासपणें हिंडत असावें! अशा एका प्रसंगीं बाइयाबाई मार्ग चुकल्या असतां प्रत्यक्ष श्रीरामलक्ष्मणांनीं दर्शन देऊन त्यांना मार्गावर आणून सोडलें! तें त्या दोघांचें रूप बाइयाबाईंनीं हृदयीं सांठविलें!

पीतांबरधारी दोघे सांवळे सुंदर गौरवर्णी।
कोदंडपाणी मुकुट माथा कुंडलें कर्णीं।
सुमनगंधमाळा देव सांठविले अंतःकर्णीं।
अभिवंदनें गुप्त जाले वरदायक॥ ११/५१

आपल्या वयाच्या चौऱ्याशाव्या वर्षीं बाइयाबाईंनीं आपला अवतार संपविला.

त्या बाइयाबाईचे गिरिधर हे शिष्य होत.

बाइयास्वामीचा गिरिधर नामा।
त्रिवर्गबंधूसी उदित नित्य नेमा।
त्रिंबक येशवंत बलभीम प्रेमा।
श्रीरामसमर्थसंकीर्तनीं॥ १०/९८

त्रिंबक, यशवंत व भीम या त्रिवर्गबंधूंसह गिरिधरांना बाइयाबाईचा अनुग्रह होता. गिरिधरांचा जन्मशक देतां येऊं नये हें दुर्दैव होय, तथापि त्यांनीं पूर्ववयांत श्रीसमर्थांना पाहिलें होतें, इतकें च नव्हे, तर श्रीसमर्थांचा त्यांना कांहीं काळ सहवास घडला होता, इतकें खचित. श्रीसमर्थांच्या आज्ञेनें त्यांनीं एकवार श्रीसज्जनगडावर कीर्तन केल्याचा प्रसंग पुढें त्यांच्या एका कविताप्रकरणांत येणार च आहे. श्रीसमर्थांच्या चरित्रांतील कांहीं प्रसंग आपण स्वतः पाहिले आहेत व कित्येक ऐकिले आहेत असें प्रतापाच्या पहिल्या समासांत गिरिधर ह्मणतात, त्यावरून हि हें उघड होतें, कीं शके १६०३ त गिरिधरांचें वय पंचविशीच्या सुमारास असावें; ह्मणजे गिरिधरांचा जन्म शके १५७५ चे सुमारास झाला असावा, असें

मानण्यास हरकत नाहीं. गिरिधर हे मूळचे राहणारे मिरजतासगांवकडील च, परंतु पुढें गुर्वाज्ञेवरून ते बिडापासून सात आठ कोस असलेल्या ईट गांवीं रहावयास गेले. तेथें त्यांचा मुख्य मठ आहे. स्वतः गिरिधरांनीं भिंतीवर काढलेली मारुतीची मूर्ति ईट येथें आहे. गिरिधर गृहस्थाश्रमी होते, पण त्यांना पुत्र नव्हता, एक कन्या होती. हल्लीं बिडास जे दोन मठ आहेत, त्यांपैकीं एक त्यांच्या कन्येच्या वंशजांचा व दुसरा त्यांचे बंधु भीम यांच्या वंशजांचा आहे. गिरिधरांचें लिहिलेलें असें चरित्र मिळालें नाहीं; कांहीं दंतकथा, त्यांची कविता व त्यांच्या स्थलांचे प्रत्यक्ष दर्शन, यांच्या सहाय्यानें जी कांहीं थोडी माहिती उपलब्ध होईल तेवढी च देणें शक्य आहे.

गिरिधरांनीं कोणता व्याप केला याची कल्पना त्यांच्या कवितेवरून च केली पाहिजे. इतकी गोष्ट खरी कीं, त्यांचा सर्व काळ श्रीगुरु व श्रीराम यांच्या भजनांत व गुणानुवादकीर्तनांत गेला. त्यांच्या कवितेची एकंदर ग्रन्थसंख्या २४००० वर आहे, यावरून च ते आपला काळ कसा कंठीत असले पाहिजेत याचा अदमास होतो. श्रीसमर्थप्रताप धरून त्यांचे एकंदर लहान मोठे चाळीस ग्रन्थ उपलब्ध झाले आहेत. त्याशिवाय त्यांचे शेंकडों स्फुट अभंग, पदें, श्लोक इत्यादि आहेत च. ही सारी कविता माझ्या दृष्टीला अपूर्व दिसते. माझ्या दृष्टीला कांहीं विकार झाला नसल्यास "निवृत्तिराम" ग्रन्थावरून रामदासियांनीं सारें ऐहिक वैभव ओवाळून टाकलें पाहिजे, इतका तो ग्रन्थ बहुमोल आहे. संकेतरामायणाची पहिली सहा कांडें वेणाबाईचीं असावींत असें भाषेवरून वाटतें. खरें खोटें त्या जाणोत. गिरिधरांची आणखी कांहीं कविता उपलब्ध व्हावयाची राहिली असावी, असें वाटत नाहीं. एक तर बीड येथें दोन्ही मठांत संग्रह व्यवस्थित होता, तो सर्व मिळाला व दुसरें त्यांच्या ग्रन्थांत उल्लेखिलेली सर्व कविता मिळाली आहे. रामायणांचीं नांवें सात दिलीं आहेत, परंतु सुंदररामायणाला च लवकुशरामायण व छंदोरामायणाला च भाषारामायण ह्मटलेलें असावें, असें वाटतें. या एकंदर कवितेंत श्रीसमर्थांविषयीं जे शेंकडों उल्लेख आले आहेत ते फार प्रेमळ आहेत. प्रसंगोपात या कवितेंत जी सांप्रदायिक शिकवण आलेली आहे ती फार महत्त्वाची आहे. अशा सच्छिष्यांच्या उद्गारांवरून विद्यमान सांप्रदायिकांनीं पुष्कळ बोध घेण्यासारखा असतो. यासाठीं हे चाळीस ग्रन्थ व शिवाय स्फुट कविता इत्यादिकांचें सामान्य स्वरूप दर्शवून श्रीसमर्थ आणि श्रीसांप्रदाय यांविषयीं त्यांत जे कित्येक महत्त्वाचे

उल्लेख आले आहेत ते या प्रस्तावनेच्या द्वारें महाराष्ट्रास सादर करावे असें मनांत येतें, मग हे सारे ग्रन्थ केव्हां छापले जाणार असतील ते जावोत !

## ( १ ) श्रीग्रन्थभावार्थ

श्लोक २३० वृत्त–भुजंगप्रयात

या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीमत् दासबोधाचा सर्व भावार्थ आणला आहे. श्रीमत् दासबोध ह्मणजे एक अर्णव आहे, यांत कोठें काय आलें आहे व एका समासाचा दुसऱ्याशीं व एका दशकाचा पुढच्याशीं काय संबंध आहे, हें समजण्याला आपणांला कठीण जातें, पण ती संगति कशी लावावी हें या ग्रन्थावरून चांगलें कळतें.

**मला ग्रन्थभावार्थ तो आकळेना । समुद्रामधें काय कोठें कळेना ।**
**समासामधें बोलिलें कैसकैसें । समर्थें मला सांगणें ऐसऐसें ॥ १/३**

अशी श्रीसमर्थांची प्रार्थना करून गिरिधरांनीं भावार्थ देण्याला सुरवात केली आहे. हें प्रकरण लिहिण्यांत त्यांचा हेतु कांहीं लोकांवर उपकार करण्याचा नव्हता. या निमित्तानें आपणांस ग्रन्थराजाचीं पारायणें व्हावींत व तेणेंकरून त्यांतील गूढ तत्त्वांचा परिचय होऊन आपण कृतार्थ व्हावें, एवढा च त्यांचा हेतु होता.

**प्रभू मुख्य ग्रन्थाविणें साध्य नाहीं ।**
**परी दर्शवीं हेत भावार्थ कांहीं ।**
**मला ग्रन्थपारायणु नित्य व्हावें ।**
**दयेनें तुझ्या म्या जनीं मुक्त व्हावें ॥ १/४**

पुढील तीन ग्रन्थ, ह्मणजे ग्रन्थान्वय, श्रीदासबोधग्रन्थराजभावार्थ व श्रीआत्मानुभव हे हि ग्रन्थ हा च हेतु धरून गिरिधरांनीं लिहिले आहेत; पण त्यांचा हेतु कसा हि असला तरी आज आपणांस त्यांनीं केलेल्या पारायणांचें फल अनायासें मिळत आहे. या चार हि प्रकरणांच्या सहाय्यानें श्रीग्रन्थराजाचा भावार्थ कळावा, अवघड स्थळें सुलभ व्हावीं व दासबोधांत श्रीसमर्थांनीं जें ‘ जुनें ठेवणें ’ ठेवलेलें आहे तें हातीं यावें ह्मणून हीं चारी प्रकरणें एकत्र छापवून कदा काळीं “ श्रीदासबोधाची किल्ली ” वाचकांचे हवालीं करण्याचा हेतु आहे. बाकी गिरिधर ह्मणतात च

असो ग्रन्थभावार्थ मी काय जाणे ।
स्तुती वाद संवाद कांहीं च नेणे ।
जळामाजि आसोनि नेणे जळासी ।
समर्थें मला बोलवीलें दिनासी ॥ ५/६

## ( २ ) ग्रन्थान्वय

अभंग २४५

या प्रकरणांत श्रीदासबोधाच्या वीस दशकांचीं व दोनशें समासांचीं नांवें आलीं आहेत. आपण छापलेल्या श्रीदासबोधापेक्षां जीं भिन्न नांवें गिरिधरांनीं दिलीं आहेत तीं येथें नमूद करून ठेवतों.

| | | |
|---|---|---|
| दशक | ३×१ | गर्भवास |
| | २ | बाळतारुण्यसमंध |
| | ३ | द्वितीय समंध |
| | ४ | तृतीय समंध |
| | ५ | वृद्धाप्य |
| दशक | ५×६ | पूर्ण समाधाम |
| दशक | ७×८ | श्रवणमाहिमान |
| | ९ | श्रवणलक्षणं |
| दशकं | ९×८ | बद्धजन्म |
| दशक | १० | बीजोद्भव नाम |
| | १०×२ | देहोत्पन्न |
| | १०×८ व ९ | प्रचितनिरूपण |
| दशकं | ११×७ | गुप्तेश्वर |
| | ११×८ | गुप्त गंगा |
| दशक | १६ | तत्त्वान्वय नाम |
| दशक | १७×१ | देवसाक्षात्कार |
| दशक | १८×५ | कष्टपरिहार |
| दशक | २०×४ | शिवशक्ति |

## ( ३ ) श्रीदासबोधग्रन्थराजभावार्थ

**श्लोक २७ अनेक वृत्तांत**

या लहानशा प्रकरणांत वीस हि दशकांची संगति विशद करून शे-वटीं गिरिधर ह्मणतात:—

**इति निगदित देवें बोधितां चित्त धालें ।**
**स्वरुपिं गळित जालें स्वामिपाईं मिळालें ।**
**विस हि दशक बोधीं ऐक्य संपूर्ण केलें ।**
**श्रवणमननयोगें प्रत्यया पूर्ण आलें ॥ २६ ॥**

ह्मणजे श्रीसमर्थांचें जें सांगणें कीं,

**वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध ।**
**मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥ २०-१०-३१**

त्याचा पूर्ण प्रत्यय गिरिधरांना आला होता.

## ( ४ ) श्रीआत्मानुभव

**ओवी ६९७ समास १३**

हें प्रकरण फार महत्त्वाचें आहे. आपणांस श्रीदासबोध समजला किंवा नाहीं व समजून आत्मप्रतीति आली कीं नाहीं याची, जणूं काय, गिरिध-रांनीं या प्रकरणांत श्रीसमर्थांपुढें परीक्षा दिली आहे. प्रश्नोत्तररूपानें हें प्रक-रण लिहिलें आहे. एका ओवींत प्रश्न व दुसऱ्या ओवींत त्याचें उत्तर, असे सुमारें दोन चारशें प्रश्न विचारून त्यांचीं गिरिधरांनीं उत्तरें दिलीं आहेत. बहुतेक उत्तरें श्रीगुरूंच्या च शब्दांत दिलीं आहेत, परंतु आपण केवळ घो-कंपटी करून उत्तरें देत नाहीं तर आपणास विषय हि समजले आहेत असें परीक्षकांस, अर्थात् श्रीसमर्थांस, पटावें ह्मणून कित्येक ठिकाणीं त्यांनीं स्वतंत्र उत्तरें दिलीं आहेत.

त्रयोदशाक्षरी मंत्राविषयीं एका ठिकाणीं गिरिधरांनीं चांगला उलगडा केला आहे.

**ब्रह्मज्ञानेंविण उपदेश । तो ह्मणों नये विशेष ॥ ६-२-२**

असें श्रीसमर्थ दासबोधांत ह्मणतात, त्यावर साहजिक अशी शंका येते कीं, मग आह्मांस जो मंत्रोपदेश होतो तो ब्रह्मोपदेश नव्हे काय ? ब्रह्मज्ञानावांचून

जर बाकीचा उपदेश व्यर्थ, तर सर्वत्र सांप्रदायांत जो त्रयोदशाक्षरी मंत्रोपदेश चालतो तो काय वायां गेला ? तो वायां कसा जाईल ! ब्रह्म आणि राम काय वेगळे आहेत !

**तारकब्रह्ममंत्रोपदेश । मंत्रार्थ पाहतां ब्रह्मोपदेश ।**
**राम तारकब्रह्म विशेष । श्रुति गर्जती वाक्यार्थें ॥** $\frac{१२}{२}$

तसा च दुसऱ्या एका कोड्याचा उलगडा सहज करण्यांत आला आहे. या सांप्रदायांत " एकावर एक अकरा " या संख्येचें कांहीं विलक्षण महत्त्व आहे, हें आतांपर्यंत आपणांस टाऊक झालें च आहे.

**अक्रा अक्रा बहु अक्रा । काये अक्रा कळेचिना ।**
**गुप्त तें गुप्त जाणावें । आनंदवनभूवनीं ॥** स्फु. प्र. $\frac{५८}{५७}$

असें प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें च वचन आहे. तेव्हां असें या संख्येंत काय गूढ आहे ? तें गिरिधर सांगतात:–

**येकीं येक ऐक्य ब्रह्म । गुरुशिष्य दोन्ही परब्रह्म ।**
**येकादश हें अंकवर्म । सहजसमाधि सांगितलें ॥** $\frac{१२}{५८}$

या हि पेक्षां या अंकाचा जास्त खुलासा पुढें निवृत्तिराम ग्रन्थांत करूं.

अशी अनेक प्रकारची महत्त्वाची शिकवण या प्रकरणांत आहे, परंतु ही केवळ प्रस्तावना आहे, शिवाय पुढें आणखी किती तरी महत्त्वाचे ग्रन्थ आपणांस पहावयाचे आहेत, या सर्व गोष्टींचें स्मरण ठेवून मला संकोच च केला पाहिजे. तथापि हें प्रकरण हातावेगळें ठेवण्यापूर्वी, श्रीदासबोध ग्रन्थ आपण कोठें व कसा वाचावा, कीं आपणांस हि गिरिधरांप्रमाणें आत्मानुभव येईल, तेवढें अवश्य पाहिलें पाहिजे.

**येकांतवनीं उपवनीं । येकांतभुवनीं ब्रह्मभुवनीं ।**
**गुरुदेवसदनीं परमात्मसदनीं । अध्यात्मग्रन्थ पाहावे ॥** $\frac{१३}{६८}$
**नाना सुमनवाटिका आरामें । देवदेवालयें येकांतधामें ।**
**श्रवणमननें पूर्णकामें । अध्यात्मग्रन्थ वाचावे ॥** $\frac{१३}{६९}$
**नाना परोपकाराकारणें । सद्गुरुनाथें केलें धांवणें ।**
**वेदशास्त्रसंमतवचनें । अध्यात्मग्रन्थ विवरावे ॥** $\frac{१३}{७०}$

## ( ५ ) गुरुमार्ग

अभंग ७६

या प्रकरणांत आरंभीं शाक्तादि निंद्य वाममार्गांचें वर्णन करून श्रीसमर्थसांप्रदायांत प्रविष्ट होण्याला काय सामुग्री असावी लागते ती सांगितली आहे. सामुग्री दुसरी कांहीं नाहीं, एक पूर्ण निष्ठा पाहिजे !

**येक्या भावें जावें शरण गुरुराजा ।**
**नवविधा पूजा मुख्य येथें ॥ ६० ॥**

आणि श्रीसमर्थांनीं तरी दासबोधांत हा च उपाय सांगितला आहे:

**साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली ।**
**सुगम पंथें नेऊन घाली । जेथील तेथें ॥ ४ $\frac{६}{२४}$**

श्रीसद्गुरुसमर्थांपुढें एकदां च एक लोटांगण असें घालावें कीं, उठून पाहतां आपणाजवळ आपलें असें कांहीं च नुरावें ! सद्गुरो, हें माझें मन आपल्या चरणीं अर्पण असो, असें ह्मणून आपलें मन सर्वस्वीं श्रीचरणीं अर्पण करावें ! आणि मन एकदां श्रीसमर्थचरणीं जडल्यावर तें अन्य चिंतन कोणाचें आणि कसें करणार ? मन श्रीचें झाल्यावर तन आणि धन कोठें उरणार ? तात्पर्य, एकादा सुदिन पहावा—सद्गुरूला शरण जाण्याला सर्व च दिवस चांगले आहेत, ज्या क्षणीं अंतरीं उत्कट इच्छा उत्पन्न होईल तो च सुमुहूर्त—तथापि एकादा चांगला दिवस पहावा व अंतःकरणांत हि तीव्र मुमुक्षुत्वाचा उदय झालासें पहावें आणि श्रीसज्जनगडनिवासी श्रीसद्गुरुचरणीं सर्वस्व अर्पण करावें ! तन, मन, धन, त्यांचें झाल्यावर त्यांच्या पासून, त्यांच्या परवानगीनें, जरूर तितकें च, मागून घ्यावें ! पुष्कळ मुमुक्षु, गुरु करावा या इच्छेनें, कोणाचे तरी पाय धरतात आणि कालांतरानें फसलों ह्मणून पश्चात्ताप पावतात ! अशांना गुरु कोण, कोठें, कसा करावा, याचा मार्ग या प्रकरणांत गिरिधरांनीं दाखविला आहे. या मार्गानें गेला तो कृतार्थ च झाला !

**सेवेलागीं तन मन धन भक्ति । कांहीं यथाशक्ति अर्पिजे बा ॥ ६६ ॥**
**अर्पिजे बा येक सुदिन पाहूनि । मनोदय मनीं जेहां होय ॥ ६७ ॥**
**जेहां होय तुज मनोदय मनीं । जयंति पर्वणी मोहछाह ॥ ६८ ॥**
**मोहछाह नित्य सद्गुरूचे घरीं । आपुल्या अंतरीं उदय व्हावा ॥ ६९ ॥**

**उदय व्हावा आणि सुदिन पहावा । निःकाम भजावा गुरुराज ॥७०॥**
**गुरुराजयाचा निःकाम विचार । सकाम संसार जाईजणा ॥ ७१ ॥**
**जाईजणा देह धन्य त्याच्या गुणें । संसार लावणें गुरुभक्ति ॥ ७२ ॥**
**गुरुभक्ति कांहीं संसारीं च घडे । जरी ते उघडे ज्ञानदृष्टी ॥ ७३ ॥**
**ज्ञानदृष्टी माझी उघडावी स्वामी । शरण आलों आह्मी लडिवाळें॥७४**

## ( ६ ) शिष्यभावार्थ

अभंग ५३

या प्रकरणांत दोघा शिष्यांचा परस्परसंवाद दिला आहे. गुरु आणि शिष्य यांचा जो, जणूं काय, धंदा कोठें कोठें जगांत चालू आहे आणि तेणें-करून जे दगे होत आहेत व परमार्थमार्गाला निवळ व्यवहाराचें रूप येत आहे, त्यांचा निषेध करून गिरिधर ह्मणतातः—

**कासयासी आतां लोकांसी बोलावें । सदृढ धरावें गुरुवाक्य ॥५१॥**
**गुरुवाक्यें मोक्ष लागतसे पाईं । विश्वासें हे कांहीं फळश्रुति ॥ ५२ ॥**
**फळश्रुति नव्हे लोकांसी बोलतां । गिरिधर आतां स्वस्थ चित्तें ॥५३॥**

## ( ७ ) श्रीगुरुआज्ञा

अभंग ७८

जगामध्यें हल्लीं गुरुमार्गाची निंदा चाललेली पाहून एकाचें अंतःक-रण कळवळलें आणि त्यानें श्रीसद्गुरूस विचारलें, महाराज, गुरु भोळ्यानें करावा, गुरु करील तो वेडा, अशी जी हल्लीं गुरुमार्गाची थट्टा चालली आहे आणि तेणेंकरून लोक संशयांत पडत आहेत, ती थट्टा बंद होऊन लोक निःसंदेह कशानें होतील ? आह्मी अज्ञानी आहोंत, आह्मांस कांहीं कळत नाहीं, तथापि गुरुमार्गाची होत असलेली निंदा सहन होत नाहीं, तरी काय करावें ? यावर सद्गुरूंनीं श्रीराम हा उघडा मंत्र आहे असें सांगून व वित्तशाठ्य न करितां मोठ्या थाटानें श्रीरामनवमीचा उत्सव करावा अशी आज्ञा करून त्या थाटाचें किंचित् वर्णन केलें आहे.

**टाकूं नका नित्य हव्यास आपुला ।**
**हे चि हे तुह्मांला आज्ञा माझी ॥ ६७ ॥**

## ( ८ ) श्रीगुरुरूप

**अभंग १०५**

ईश्वराचें रूप तें गुरूचें रूप, आपल्या कल्याणासाठीं सद्गुरु सगुण रूप धारण करितात, इत्यादि विवेचन या प्रकरणांत आहे.

## ( ९ ) शिष्यशासन

**अभंग ८२**

हा जन्म आपण दुश्चित्तपणानें वायां दवडणें योग्य होईल काय ? कोणच्या घमेंडींत आपण आहोंत कोण जाणे ? केव्हां तरी आपण शुद्धीवर येऊन श्रीसद्गुरूचे चरण धरूं काय ? श्रीसमर्थांचे आपणावर इतके उपकार आहेत कीं त्यांचे उतराई होण्यास स्वर्गसंपत्ति हि अपुरी पडेल ! अशा सद्गुरूची ज्याला अवज्ञा घडते, तो यावच्चंद्र नरकीं पडतो. त्यांतून सुटण्यास स्वामी तुष्टल्यावांचून अन्य उपाय नसतो. नरदेहांत येऊन श्रीसद्गुरुदर्शन घडलें नाहीं, तर चौऱ्यायशीचा फेरा कांहीं चुकणार नाहीं. यासाठीं अभिमानविवर्जित होऊन सत्संग धरावा, सद्गुरुभजन करावें, व त्यांच्या आज्ञेंत नेहमीं वर्तावें. श्रीसद्गुरु हिताच्या गोष्टी वारंवार सांगत असतां हि जर तदनुरूप आपण आचरण न करूं, तर आपल्या पापाला पारावार नाहीं !

**प्रवर्तावें गुरुआज्ञेंत वर्तावें। किती हें सांगावें तुजलागीं ॥ ७१ ॥**
**तुजलागीं आह्मी किती हें सांगावें। तुझें कर्म धांवे आह्मांपुढें ॥ ७२ ॥**
**आह्मांपुढें तुझें कर्म धांव घेतें। आमुच्या बोलें होतें काय तुला ॥७३॥**
**काय तुला आतां मानेल तें करीं। बहु बोलों तरी सीण जाला ॥७४ ॥**
**सीण जाला आतां सद्गुरुस्वामीतें। मूर्खा शुद्धि तूतें कैसी नाहीं ॥७५॥**

हे मना, आतां तरी शुद्धीवर येऊन स्वामींचे चरण दृढ धरशील काय ? गिरिधरमहाराज,

**स्वामी तुह्मी आतां आपुलें ह्मणावें।**
**नेउनी घालावें पायांवरी ॥ ७८ ॥**

## ( १० ) गुरुदीक्षा

**अभंग १७८'**

श्रीसद्गुरु मानवदेहधारी असले तरी त्यांस तसे मानूं नये, त्यांस दीर्घदंड नमस्कार दुरून घालावा, लाजूं नये, सद्गुरुसंनिध गलबला करूं नये, चालतांना पाय वाजवूं नयेत, त्यांच्या देखत हंसों नये, दूर उभें रहावें, जवळ बोलाविल्यास सन्मुख येऊन अधोमुख उभें रहावें, ते सांगतील तें एकाग्र चित्तानें ऐकावें, त्यांच्याशीं वाद घालूं नये, कांहीं कमीजास्त पुसणें असल्यास एकांतीं पुसावें, स्वामिजवळ दुसऱ्या कोणाचें उणें बोलूं नये, गुरुबंधूंवर प्रेम करावें, दुसऱ्या कोणाचा हि मत्सर न करावा, लोक वाढवावे, गुरु रागावले तरी तें आत्महितार्थ मानावें, स्वामींच्या अपरोक्ष हि कांहीं वेडेंवांकडें बोलूं नये, कारण स्वामी जेथें नाहींत असें ठिकाण च नाहीं,

> **बरळूं नका मागें पुढें कोणे ठाईं ।**
> **स्वामी सर्वां ठाईं ऐकताहे ॥ ६१ ॥**
> **ऐकताहे स्वामी त्यासी कोण सांगे ।**
> **अंतर्बाह्य वागे न कळे तुह्मां ॥ ६२ ॥**

स्वामींच्या चरणस्पर्शानें पुनीत झालेल्या स्थळांना नमन करावें, स्वामीसेवेंत देह झिजवावा, शुद्ध अंतःकरणानें स्वामीदर्शनास जावें, त्यांचें चरणतीर्थ घ्यावें,

> **स्वामीयाचें तीर्थ अवघ्या तीर्थांवरी ।**
> **घेऊनि अंतरीं निवावें हो ॥ ७९ ॥**

करूं कां नको करूं असा विकल्प हि मनांत न येऊं देतां स्वामींचे घरीं पडेल तें कार्य करावें, आपलें कांहीं बरें वाईट झालें तरी त्याचा बोल स्वामीला लाऊं नये, त्यांच्या दर्शनास रिक्तहस्तें जाऊं नये, त्यांची मोठ्या थाटानें पूजा करावी, लोकांस त्यांच्या भजनीं लावावें, स्वामींचे ग्रन्थ लोकांस लिहून द्यावे, लोकांत त्यांच्या ग्रन्थांचा विस्तार करावा, मठ स्थापावे,

> **स्वामीयाचे ग्रन्थ विस्तारावे लोकीं ।**
> **मठ हि त्या लोकीं करवावे ॥ ११६ ॥**

उत्सव सुरूं करावे, चालतांना स्वामींच्या बरोबर चालूं नये, पुढें जाऊं नये किंवा मागें राहूं नये, तर संनिध असावें, त्यांच्या चरणाकडे लक्ष

ठेवून त्यांच्या मुखांतून निघतील ते शब्द ऐकण्याकडे चित्त ठेवावें, एकांत सांपडतां च कांहीं पुसणें तें पुसावें, त्यांच्या आज्ञेवांचून कांहीं करूं नये, स्वामीचरणीं सर्वस्व अर्पण करून एकनिष्ठपणें असावें, सद्गुरूचें भजन करावें, गुरुगीतेचें अध्ययन करावें, सद्गुरुस्वरूप हृदयीं अखंड सांठवावें, जप करणें तो एकांतांत करावा, सद्गुरुभजनांत मन गुंग होऊन राहिलें तर नित्यनेम राहिला तरी चालेल, सद्गुरुसेवा करितांना नित्यनेम टळला तरी त्याची पर्वा नसावी,

**विसरावा नित्यनेम सेवेमध्यें । कांहीं मनामध्यें येवों नये ॥ १५२ ॥**

द्रव्यदारेसंबंधानें आचरण शुद्ध ठेवावें, परावी कांता मातेसमान मानावी, इत्यादि गिरिधरांची शिकवण कोण लक्षपूर्वक वाचणार नाहीं, मनांत ठेवणार नाहीं व तदनुरूप वागण्याचा प्रयत्न करणार नाहीं ?

## ( ११ ) श्रीस्वामीदर्शन

### अभंग १२९

या अकराव्या प्रकरणांत श्रीसमर्थांच्या दिनचर्येचा उल्लेख असल्यामुळें तें जसें गोड आहे, तसें च महत्त्वाचें आहे. गिरिधरांनीं श्रीसमर्थांना पाहिलें होतें इतकें च नव्हे, तर कांहीं काळ श्रीसमर्थांचा त्यांना सहवास हि घडला होता, असें जें मी ह्मणतों तें या प्रकरणावरून होय. गुरुभक्तांना हें प्रकरण फार बहारीचें वाटणार आहे. गिरिधर ह्मणतात:

मी येथें आणि स्वामी व स्वामींचें अधिष्ठान हीं जरी दूर आहेत, तरी मी अनन्यभावेंकरून नित्य तेथें च आहे ! तथापि मी प्रथम जेव्हां तेथें प्रत्यक्ष गेलों, तेव्हां शेंकडों संत महंत श्रीसमर्थांचे भोंवती होते, कथाकीर्तनांची सारखी दाटी झाली होती, दिवस आणि रात्र केव्हां व कसे लोटत याचें हि माझें भान हरपलें, इतकें माझें मन कथाश्रवणांत दंग होऊन गेलें. पुराणकथाकीर्तनप्रसंगीं स्वामी मुख्यासनीं बसत, एकंदर जगसमूह तल्लीन होत असे, कथाकीर्तननिरूपणाचा प्रसंग बहुधा श्रीरामचंद्रांच्या शतकोटी चरित्रांतील असे. एकदां मी दूर होतों, तों श्रीसमर्थांची दृष्टि मजकडे वळली ! माझें अंतर जाणून मला कीर्तन करावयाची स्वामींची आज्ञा झाली. स्वामींची आज्ञा होतां च मन आनंदलें व मी कीर्तनास उभा ठाकलों. गणेशशारदा-

सद्गुरु यांना प्रथम नमन करून राघवचरित्रास आरंभ केला. मन रामरूप होऊन गेलें व पुढें बसलेले जन हि दिसेनासे झाले. कथा संपते तों प्रभात झाली. नंतर भूपाळ्या व कांकड–आरति झाली, वाद्यें वाजूं लागलीं. स्वामींचें सगुण ध्यान हृदयांत सांटवून घेतलें, हेतु हा कीं, परत गेल्यावर तें च चिंतूं! स्वामींस दंडप्राय नमस्कार घातला. चित्त चरणीं जडल्यामुळें उठवेना. ऊठ, ह्मणून स्वामींनीं आज्ञापिलें, ह्मणून उठलों. नंतर स्वामी किंचित् पहुडले. प्रातःकाळीं सडेसंमार्जनें झालीं, श्रीसमर्थांचें स्नान झालें. स्नानाच्या ठिकाणीं फार दाटी होती, ' रीघ सांपडेना, तसा च जवळ गेलों. स्वामींचें स्नान झालें. स्वामींनीं देवाची केलेली पूजा पाहिली. नंतर आरति झाली, देवास नैवेद्य अर्पण झाला, विपुल फळें अर्पिलीं, सर्वांनीं देवास नमस्कार घातले. नंतर पुराणाचा एक अध्याय झाला, तों स्वयंपाक सिद्ध झाल्याची वर्दी आली. सर्वांचीं भोजनें झालीं. नंतर तांबूल सेवन होतांना थोडा वेळ चर्चा होऊन स्वामी कांहीं काळ एकांतांत गेले, थोडेंसे निजले. स्वामींनीं उठून मुखमार्जन केलें. महंतांनीं स्वामींच्या अंगाला नूतन चंदन लाविलें, पुष्पमाळा अर्पिल्या. स्वामींनीं तांबूल सेवन केला. नंतर झंपे, बीरभाटीव, कडके, सुवेळेचे भडके इत्यादि गायन झालें, तों सूर्यास्ताची वेळ आली. नंतर धूपार्ति होऊन बैठका घातल्या व पुन्हां आदल्या दिवसाप्रमाणें कीर्तनें सुरू झालीं. असा श्रीसमर्थस्वामींचा

**कांहीं दिवस मज संग जाला ॥ १११ ॥**

त्याचा वृत्तान्त आहे. अशा रीतीनें श्रीसमर्थांच्या सांनिध्यांत कांहीं काळ कंठल्यावर एकांतांत बुद्धिवाद सांगून मला जाण्याची श्रीसमर्थांची आज्ञा झाली. श्रीगुरुचरण अंतरणार ह्मणून मन उद्विग्न झालें. तें पाहून श्रीसमर्थ ह्मणाले, आह्मी उदास आणि त्या आमचा तूं दास ह्मणवीत असतां खंति करितोस हें काय ? तेव्हां गिरिधरांच्या डोळ्याला पाणी आलें.

**असुं आलें मग पल्लवें पुसिलें । आश्वासन दिल्हें काय देवें ॥ ११७ ॥**
**काय देवें दिल्हें आश्वासन ऐका । येक वेळे देखा यावें लागे ॥ १८ ॥**
**यावें लागे येक वेळे सांभाळाया । आह्मावांचूनियां कोण आहे ॥ १९ ॥**
**कोण आहे तुज आह्मावांचूनियां । कळला भाव वायां खंति काय ॥ २० ॥**
**खंति काय जाले प्रसंग आठवीं । अनन्य स्वभावीं देव भक्त ॥ २१ ॥**
**देव भक्त येक कळला विवेक । ग्रंथाधारें लोक प्रबोधिसी ॥ २२ ॥**

**प्रबोधिसी तेथें काय भिन्न आहे । अर्थ पूर्ण पाहे विचाराचा ॥ २३ ॥**
**विचाराचा अर्थ नित्य बोलतोसी । खंति करितोसी नवल मोठें ॥ २४ ॥**
**नवल मोठें वाटे भक्तीची आवडी । राहों द्यावी जोडी भक्ति प्रेमें ॥ २५ ॥**
**भक्ति प्रेमें जोडी असो हि विदेसीं । आहों तुजपासीं सर्व काळ ॥ २६ ॥**
**सर्व काळ आहों वचन प्रमाण । प्रसंग जाणून भेटी आणूं ॥ २७ ॥**
**भेटी आणूं कांहीं खंति न करावी । नौमी आठवावी रात्रिदिवस ॥ २८ ॥**
**रात्रिदिवस ध्यान नौमीचें करावें । गिरिधर देवें आज्ञापिला ॥ २९ ॥**

## ( १२ ) श्रीदेवदर्शन

अभंग ११८

श्रीसमर्थांचा निरोप घेऊन गिरिधर निघाले त्या वेळीं

**सद्गुरुसमर्थें ग्रन्थगर्भ दिल्हा । श्रीकंठमेखळा प्रासादिक ॥ २ ॥**

आणि कांहीं बोध केला, तो आज आपण श्रवण केला ह्मणजे श्रीसमर्थ शिष्यांना युक्तिबुद्धीनें कसे भरीत, तें कळणार आहे.

**निरोपिती कोठें वाद घालूं नको । भक्ति सोडों नको राघवाची ॥५॥**
**राघवाची भक्ति ग्रन्थाचें पूजन । स्वजनशोधन समुदाई ॥ ६ ॥**
**समुदाई लोक मर्यादे धरावे । कलयुगीं अघवे अमर्यादी ॥ ७ ॥**

अशा ह्या अमर्याद काळामध्यें चित्ताचा क्षोभ होण्याचे प्रसंग वारंवार येणार, ह्मणून श्रीसमर्थ ह्मणतातः–

**क्रोध येतां पाय मागें काढा ॥ १२ ॥**

पण अशा धर्मभ्रष्ट काळांत च लोकांना जो ताळ्यावर आणील तो च खरा महंत ! काय मोठी कठीण गोष्ट आहे ? श्रीसमर्थ गिरिधरांना विचारतात:–

**सावधान रामीं असतां विवेकें । वोळेतिना लोकें काय तुला ॥१७॥**

इत्यादि अनेक तऱ्हेचा बोध करून व श्रीदासबोधाची पोथी गिरिधरांना देऊन श्रीसमर्थ ह्मणाले:—

**सोडूं नको ग्रन्थ उपासना दीक्षा । सर्वकाळ भिक्षा सोडूं नको ॥१९॥**
**सोडूं नको नित्य साधन आपुलें । पाठांतर केलें पाहिजे तां ॥ २० ॥**
**पाहिजे तां आपुला आचार रक्षिला । वेद सांभाळिला पाहिजे तां ॥**

केव्हां हि काय करूं असा संशय उत्पन्न झाला ह्मणजे श्रीदासबोध उघडावा !

**ग्रन्थामध्यें बरा पाहुनि विवेक । वर्तावें सम्यक लोकामध्यें ॥ २९ ॥**

शेवटीं श्रीसमर्थ आशीर्वाद देतातः—

**लोकामध्यें आहे राम साभिमानी । जनीं जनार्दनीं सुखें असा ॥३०॥**

असा श्रीसमर्थांचा आशीर्वाद घेऊन जाण्यासाठीं उठलों, पण पाय कांहीं चालेनात.

**उभा ठेलों रूप न्याहाळिलें दृष्टी ।**

आणि पुन्हा एकवार

**साष्टांगीं हे सृष्टी स्पर्शिलीसे ॥ ४२ ॥**
**स्पर्शिलीं पाउलें मस्तक ठेविला ।**
**मग धीर केला निघावया ॥ ४३ ॥**

आणि गिरिधर स्वामींचे पाय आठवीत स्वामीकार्यासाठीं निघाले, ते बहुधा प्रथम श्रीक्षेत्र चाफळास गेले. तेथें श्रीरामाचें दर्शन घेत असतां

**स्वामीकृपें तुह्मी सांपडां आह्मांसी ।**
**येरीं निगमासी न पडां ठाईं ॥ ६६ ॥**

इत्यादि गिरिधरांनीं श्रीरामाशीं मोठें धिटाईचें भाषण करून शेवटीं श्रीरामाची प्रार्थना केली कीं,

**सांगों धाडा मेघीं वर्षावें हो जळें । पत्रें पुष्पें फळें रसोत्पत्ति ॥८२॥**
**रसोत्पत्तियोगें जन सुखी व्हावें । मन प्रवर्तावें तुझे निष्ठे ॥ ८३ ॥**

इत्यादि.

## ( १३ ) श्रीरामरूप

### अभंग ५२

श्रीरामाच्या सगुण व निर्गुण अशा दोन्ही स्वरूपांचें यांत वर्णन आहे. सगुणाचा सारखा ध्यास घेतला ह्मणजे सर्व सृष्टि कशी राममय होते, तें गिरिधरांनीं या प्रकरणांत दाखविलें आहे.

**दृढ मनीं रामरूप हें धरिलें । दृश्य हें सारिलें कैसें पाहा ॥ १७ ॥**
**पाहा पाहा आतां कल्पनासंभ्रम । राम राम राम राम जाला ॥१८॥**
**राम जाला ब्रह्मगोळ हा सकळ । येकेक प्रांजळ बोलूं आतां ॥ १९॥**
**बोलूं आतां लोक मला न दिसती । राम सीतापति सर्व जाले ॥२०॥**

चारी खाणी, चारी वाणी, सर्व तीर्थें, क्षेत्रें, इन्द्रपुरी, यमपुरी, सत्यलोक, वैकुंठ, कैलास, अष्ट दिक्पाळ, लोकपाळ, अष्टकुलाचल, इतर सर्व अचल,

मेरु, येकवीस स्वर्ग, चंद्र, सूर्य, तारा, ढग, मेघधारा, पंच भूतें, पंच तत्त्वें, तुह्मी, आह्मी, सर्व, सर्व कांहीं राममय होऊन

**जेथें पाहों तेथें राम दिसे ॥ २९ ॥**

## ( १४ ) श्रीसीतारूप

### अभंग ५४

यांत मायेच्या स्वरूपाचें वर्णन आहे. आपल्याला हा जो सारा विस्तार दिसत आहे तो व दिसत नाहीं तो सर्व मायेचा आहे.

**विस्तारली कांहीं नाहीं रामाकडे । सर्व हि इकडे कर्तव्यता ॥ ९ ॥**
**कर्तव्यता सीतादेवीकडे लागे । आपण चि वागे तिहीं लोकीं ॥१०॥**
**ईच्या योगें नाना कथा चमत्कार । अवतारविस्तार सर्व ईचा ॥ ४० ॥**
**ईच्या योगें देव दानव मोहिले । मायेनें गोविले थोर थोर ॥ ४८ ॥**
**थोर थोर येथें येऊनियां गेले । गेले आणि मेले मायायोगें ॥ ४९ ॥**
**मायायोगें कांहीं गुह्य हि कळतें । मन निवळतें गुरुकृपें ॥ ५० ॥**

ती गुरुकृपा होण्यासाठीं सद्गुरूंचे पाय धरिले पाहिजेत.

## ( १५ ) प्राणनाथ

### अभंग ५२

यांत मरुत्सुत जो मारुति, आपल्या सर्वांचा प्राण, त्याच्या विश्वव्यापक स्वरूपाचें वर्णन आहे.

**प्राणनाथ आहे सर्वत्र व्यापक । दावी देव येक भक्तजना ॥ ४८ ॥**
**भक्तजना दावी रामउपासना । घाली निरंजना पैलिकडे ॥ ४९ ॥**
**पैलिकडे मज प्राणनाथें नेलें । नेऊनि आणिलें देहबुद्धि ॥ ५० ॥**
**देहबुद्धि तव दास्य त्याचें करीं । नित्य निरंतरीं वस्तुरूप ॥ ५१ ॥**
**वस्तुरूप गिरिधर केला तेणें । बोलणें चालणें सर्व त्याचें ॥ ५२ ॥**

तेव्हां आपण आतां निराळा अभिमान कशाचा धरावा !

---

१ ऐसी माझी उपासना । आणितां न ये अनुमाना । नेऊन घाली निरंजना । पैलिकडे ॥ १५$\frac{३}{२९}$

## ( १६ ) योगीराज

**अभंग ५०**

ब्रह्म आणि योगी एक च, असें निरूपण करीत असतां, या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीसमर्थांचें, एक प्रकारें, स्तवन करून

**योगीयांचा योगी स्वामी माझा ॥ २१ ॥**

असा सिद्धान्त केला आहे.

## ( १७ ) दीक्षासंवाद

**अभंग १५४**

रामनाम, ब्रह्मज्ञान, विज्ञान, विवेक, वैराग्य, भक्तियोग, संतसंग, पर्यटण, सर्वमान्यता, ब्रह्मचर्य, रामोपासना, ग्रन्थदेवार्चन, गुरूचीं कर्तव्यें, निस्पृहलक्षणें, जगदुद्धार इत्यादि विषयांचें विवेचन या प्रकरणांत आहे. आपल्याला तें सारें समजतें च असें नाहीं. कोणी पाहिलें आहे ब्रह्मज्ञान! स्वामींचें रूप हें च आपलें ब्रह्मज्ञान!

**कैसें आहे ब्रह्मज्ञान कोणा ठावें । रूप आठवावें स्वामीयाचें ॥ ५३ ॥**
**स्वामीयाचें रूप आठवतें मनीं । रामनाम श्रवणीं उपदेशिलें ॥ ५४ ॥**
**उपदेशिलें तें चि दृढ हें धरावें । भक्तीस लागावें संतसंगें ॥ ५५ ॥**

बाकीचे कठीण विषय सोंपवावें पुढिलांवर. नाना ग्रन्थ वाचावे आणि संशयांत पडावें, हें कोण ज्ञान! आपण आपला श्रीसमर्थचरित्राचा ध्यास घ्यावा.

**दिसों आले दृगे ग्रन्थविवरणें । समर्थकरणें कैसें आहे ॥ १४० ॥**
**कैसें आहे ऐका समर्थकरणें । देवाचिकारणें त्याग केला ॥ १४१ ॥**
**त्याग केला सर्व उपासनेलागीं । निस्पृहता आंगीं कडकाडित ॥४२॥**
**कडकाडित निस्पृहता समर्थातें । जगदोद्धारातें भक्ति केली ॥ ४३ ॥**
**भक्ति केली श्रेष्ठ अधिक वाढली । उपासना केली आधीं पुढें ॥३४॥**
**आधीं पुढें रामनौमीचे उछाह । मग समुदाव दर्शनासी ॥ ४५ ॥**

---

१ उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे । भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ १९$^{१०}_{८}$ या उपदेशाचें रहस्य गिरिधरांनीं कसें व्यक्त केलें आहे, त्याचें मनन करावें.

दर्शन स्वामीचें येकायेकीं नव्हे । पुण्य गांठीं राहे विचाराचें ॥ ४६ ॥
विचाराचें पुण्य असतां संग्रहीं । धन्य तो निस्पृही लोकांमध्यें ॥ ४७ ॥

## ( १८ ) साधुसंवाद

अभंग ४५

यांत भिन्न सांप्रदायाच्या दोघा साधूंचा संवाद आहे. दोघे निरनिराळ्या मतांचे साधु परस्परास भेटले. प्रथम नमस्कार चमत्कार होऊन त्यांच्यांत ब्रह्मज्ञानाची चर्चा सुरू झाली. कोठेंसा मतभेद होऊन

तुह्मी जाणा तुमच्या सद्गुरूच्या कृपें ।
आमुच्या गुरुकृपें आह्मी जाणों ॥ २९ ॥

येथवर वादाची मजल आली. पण गिरिधर ह्मणतात, बापांनो, तुह्मी भिन्न भावीत असाल, पण सद्गुरु कोठें दोन आहेत ?

सद्गुरु समर्थ येक आहे ॥ ३० ॥

तथापि ज्या वादानें तत्त्वबोध न होतां उलट वितुष्टपणा वाढत जातो असला वाद च नको.

राघवाची कीर्ति गातां समाधान । नको ब्रह्मज्ञान मित्रतुटी ॥ ३३ ॥
मित्रतुटी होते नसत्या साभिमानें । करावीं कीर्तनें राघवाचीं ॥ ३४ ॥

## ( १९ ) श्रीगुरुदेवनमन

ओवी १२८

ह्या लहानशा पण गोड प्रकरणांत विश्वव्यापी श्रीगुरुदेवाला नमन केलें आहे. त्याची कांहीं कल्पना व्हावी ह्मणून थोड्या ओव्या येथें देतों.

नमूं जी श्री रामा । नमूं जी जय रामा ।
नमूं जय जय रामा । जगद्गुरु ॥ ९१ ॥
नमूं सुखधामा । नमूं निजधामा ।
नमूं परंधामा । मायातीता ॥ ९२ ॥
नमूं सर्वसिद्धा । नमूं शुद्धबुद्धा ।
नमूं निजबोधा । भावातीता ॥ ९३ ॥
नमूं श्री सर्वेशा । नमूं सर्वाधीशा ।
नमूं जगदीशा । व्यापका जी ॥ ९४ ॥

नमूं दयाकरा। नमूं परावरा।
नमूं निराधारा। करुणासिंधु ॥ ९५ ॥
नमूं गुणातीता। नमूं तत्त्वातीता।
नमूं सर्वातीता। निर्मळा तूं ॥ ९६ ॥
नमूं जगद्वंद्य। नमूं अद्यअद्य।
नमूं स्वसंवेद्य। वेद्य वस्तु ॥ ९७ ॥
नमूं ज्ञानघना। नमूं सनातना।
नमूं पुरातना। अगोचरा ॥ ९८ ॥

वगैरे.

## ( २० ) देवसंवाद

श्लोक ७१ वृत्त-इंद्रवज्रा

श्रीसद्गुरुपदापुढें वैकुंठ, कैलास, सत्यलोक, इन्द्रलोक, इत्यादि सर्व तुच्छ होत. इंद्र, ब्रह्मा, विष्णु, महेश हे सारे श्रीरामाचीं च स्तोत्रें गातात. तेव्हां श्रीरामोपासकाला या सर्वांचें वैभव तृणतुल्य वाटावें हें साहाजिक च आहे.

बंदांतुनी देव समस्त रामें। सोडोनि द्यावे भुवनैकरामें।
ऐसा कृपाराम समर्थ माझा। इंद्रा अम्हां काय हिसाब तूझा ॥ ७ ॥

ही तर श्रीरामोपासकाला इंद्रपदाची किंमत वाटते. इंद्र हि रामोपासकाच्या वाट्याला जात नाहीं; कारण इंद्राला इंद्रपद तरी रामानें च दिलें आहे. इंद्र ह्मणतो:-

रामें दयाळें मजकारणें हो। केलीं बहूसाल किती रणें हो।
त्या राघवाचे निजदास तुह्मी। तुह्मांसि विघ्नें न करूं चि आह्मी॥१४

अशा रीतीनें इतर देव हि श्रीरामोपासकाला साह्यभूत होतात.

कैलासिचा राव भुमीसि आला। हनुमानरूपी गमला मनाला।
रक्षीतसे रामउपासकाला। काळावरी भीमरुपी निघाला ॥ ५२ ॥

## ( २१ ) गुरुगीतार्थ

अभंग २३४

प्रकरणाच्या नांवावरून च त्यांतील विषयाचा बोध होत आहे. संस्कृत

गुरुगीता गिरिधरांना मुखोद्गत होती, तिचा सर्व अर्थ त्यांनीं प्राकृतांत आणला आहे.

**मुखोद्गत तुझा गुरुगीता आहे।**
**अर्थ कैसा काय निरूपावा ॥ १० ॥**

मूळ संस्कृत वर व खालीं गिरिधरांचे अभंग देऊन एक लहानसें पुस्तक प्रकाशित केल्यास तें गुरुभक्तांना निःसंशय प्रिय होईल.

**पाहिजे हे गुरुगीता गुरुभक्तां।**
**हरिभक्तां विरक्तां प्रिय आहे ॥ २१४ ॥**

## ( २२ ) गुरुवाक्यमाला

श्लोक १६१ वृत्त–चंपकमाला

**कोण मि स्वामी काय करावें। ब्रह्म तुं आतां ध्यान धरावें।**
**ध्येय ध्यान हें द्वैत नुरावें। एक गुरुपद सत्य उरावें ॥ ५ ॥**

असा आरंभ करून पहिल्या ८५ श्लोकांत आत्मज्ञान सांगितलें आहे, पुढें ५० श्लोकांत श्रीगुरूंनीं शिष्याला वर दिला आहे:–

**श्रीगुरुचें वरदान जाहलें। आत्मरुपीं निजऐक्य पाहिलें।**
**सर्वगतीं स्वगतीं मन धालें। प्रत्ययज्ञान प्रचीतिसि आलें ॥ १३३ ॥**

व पुढील पंचवीस श्लोकांत

**जय जय सद्गुरुराज समर्था। पावविलें मज जी परमार्था ॥**

इत्यादि श्रीसद्गुरूचें स्तवन करून शेवटच्या श्लोकांत प्रकरणाचा समारोप केला आहे.

## ( २३ ) श्रीशिवरहस्य

श्लोक १०२ वृत्त–प्रमाणिका

मुळांत मुखपृष्ठावर शिवरहस्य असें नांव होतें, तें खोडून "राममहिमा" असें नांव दिलेलें आहे. शिवाचें रहस्य म्हणजे रामनाम. श्रीसांप्रदायांत जीं दोन चार आवडतीं वृत्तें आहेत, त्यांपैकीं "प्रमाणिका" वृत्तांत हे श्लोक आहेत.

पद्मपुराण व लिंगपुराण यांचा आधार घेऊन हें प्रकरण लिहिलेलें आहे. परमार्थाचीं साधनें पुष्कळ आहेत व वेदपठण, तीर्थाटण, होमहवन,

दान, तप वगैरे मार्ग हि अनेक आहेत; परंतु साधकाचा प्रश्न असा आहे कीं या सर्वांत सुलभ साधन कोणतें ? नामस्मरण हा च सर्वांत सुगमोपाय होय.

शिवास छंद लागला । शिवें शिवे निरोपिला ।
पुढें अनेक वेधले । तयासि योग साधले ॥ १२ ॥
तुह्मांसि तें चि सांगतों । श्रीरामरूप बोलतों ।

इत्यादि रीतीनें या प्रकरणांत श्रीराममहिमा वर्णिला आहे.

## ( २४ ) लोकस्वभाव

ओवी २५

जो जो प्राणी जन्मासि आला । तो तो देहाभिमानें चि गेला ।
त्यामध्यें कोण्ही विरुळा । प्रबोधनिवळा निवळला ॥ १ ॥
जो तो ह्मणे आह्मी थोर । कोण पाहे सारासार ।
माझी वर्तणूक परपार । पाववी भवाच्या ॥ २ ॥
परपार हें हि नाहीं । मी च अवघा सर्व कांहीं ।
साधुसंत कैंचे काई । कोठून आले ॥ ३ ॥
शूद्र निंदिती ब्राह्मणास । ब्राह्मण निंदिती आणिकास ।
परस्परें यातीयातीस । थोरपणें उडविती ॥ ४ ॥
कितेक मूर्खपणाचीं लक्षणें । स्पर्धा कुतर्क कुलक्षणें ।
समर्थें निरोपिलीं विचक्षणें । ग्रन्थांतरीं ॥ ६ ॥

इत्यादि रीतीनें जनस्वभाव वर्णन करून शेवटीं गिरिधर श्रीसमर्थांचें स्तवन करितातः—

सोपें बोलणें उमजावया । परत्रमार्गा समजावया ।
स्वभाव लोकीं पालटावया । केली दया दयाकरें ॥ १८ ॥
ऐसा दयार्णव कृपाळु । रागेजोनि करी निवळु ।
पदीं ठेऊनि आळुमाळु । सुखकल्लोळु भोगवीं ॥ २० ॥
स्वामीयेवढें थोर नाहीं । प्रपंचीं तों सुख नाहीं ।
भक्तियोगें धन्य होई । उभय लोकीं ॥ २१ ॥
धरितां समर्थाची कास । कुभाव पालटे निशेष ।
सद्भावें आपण चि जगदीश । भेटताहे ॥ २२ ॥
गिरिधर ह्मणे समर्थाचा । आश्रय मजला स्वामियाचा ।
स्वामीकृपेनें लौकिकाचा । न्यास केला संपूर्ण ॥ २४ ॥

## ( २५ ) श्रीकृष्णकथातरंग

ओवी १७३

अघासुरवध, वत्सहरण, वत्सासुरवध, कालियादमन, यशोदादर्शन, कृष्णदर्शन, श्रीसरस्वतीतीर, वरुणा, केशीवध, रासक्रीडा, वृकवध, दुर्वासपरीक्षा, गर्दभासुरवध इत्यादि कथा या प्रकरणांत थोडक्यांत वर्णिल्या आहेत.

## ( २६ ) हरिलीला

श्लोक ४५४ वृत्त-मालिनी

या प्रकरणाचे अकरा समास असून त्यांत गिरिधरांनीं श्रीकृष्णलीला प्रेमभरानें गायिली आहे. ज्यांनीं यावद्देह रामोपासना चालविण्याची दीक्षा घेतली त्यांना श्रीकृष्णचरित्र गाण्यास बरी वेळ फावली, अशी कोणी शंका घेईल, तर त्याचें समाधान गिरिधर च करीत आहेत.

> रघुविरभजनाची मुख्य आजन्म दीक्षा ।
> यदुविरभजनाची रामरूपें अपेक्षा ।
> यदुपति रघुराजीं ऐक्यरूपें मिळाला ।
> श्रवण करुत आतां संत श्रोते तयाला ॥ १/४

आणि अशा रीतीनें श्रीराम आणि श्रीकृष्ण यांचा ऐक्यभाव सर्व प्रकरणांत दाखविला आहे. अकराव्या समासांत द्वापारांतीं द्वारकेस हनुमंतास भेटण्यासाठीं कृष्ण रामरूप कसे झाले तें वर्णिलें आहे.

> व्रजवधुअभिळाषी ब्रह्मचर्यास भेटे ।
> पवनसुतहटानें राम केला चि नेटें ।
> परवधुअभिळाषा वाटतें तें चि व्हावें ।
> पवनसुतकृपेनें रामरूपीं भरावें ॥ ११/२१
> शमदम हनुमंतीं कृष्णजीलागि चाड ।
> ह्मणउनि मनुजा रे ईतरां कोण पाड ।
> पवनतनुजसंगें कृष्णजी राम जाला ।
> भिमकितनुजसंगें येकपत्नी च ठेला ॥ ११/२२
> ह्मणउनि मनुजा रे देव भक्ताभिमानी ।
> शरण त्वरित जाईं मोक्ष पावें निदानीं ।

**यदुकुळटिळकेसीं राम होई स्वभावें ।**
**सदयहृदय स्वामी सांगती शुद्ध भावें ॥ ११/२५**

अशा रीतीनें श्रीकृष्णाचें मनोहर चरित्र गाऊन तें गिरिधरांनीं श्रीचरणीं अर्पण केलें आहे.

**सुजन सुजनवृंदें ऐकती हें चरित्रें ।**
**परम परमछंदें तोषती संतपात्रें ।**
**हरिगुणमणिमाळा किंचिता वोविल्या हो ।**
**निजगुरुपुजनार्थें श्रीपदीं ठेविल्या हो ॥ ११/२६**

## ( २७ ) नाना पंथ

**पदें–कडवीं ५०**

निरनिराळ्या पंथांवर हीं पदें आहेत. ज्याला त्याला आपआपला पंथ चांगला च वाटत असतो व तो चांगला नसतो असें तरी कोणी ह्मणावें, परंतु ज्या पंथांत ज्ञानप्राप्ति नाहीं ते सारे पंथ केवळ श्रमास कारण होतात.

**ज्याचा पंथ त्यासि चांगला बहु चांगला कोणें नव्हे ह्मणावें ।**
**सात पांच पंथें चालिले लोक चालिले ज्ञानेंवीण शिणावें ॥**

उपासनाभेदेंकरून जरी निरनिराळे पंथ प्रचलित झाले असले, तरी ज्यांचा भर आत्मज्ञानावर आहे असे पंथ चांगले होत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पण याशिवाय आणखी एक पंथ अनादि काळापासून चालत आलेला दिसतो व तो सर्व काळीं आणि स्थळीं फक्त बद्धांना च प्रिय झालेला आढळतो !

**आमुचा पंथ अह्मां चांगला बहु चांगला सांगणें चि न लागे ।**
**सुखरूप संसार करणें जन्ममरणें आणखी पंथ न लागे ॥**

वित्तार्जन करवेल तितकें करावें, विषयवासना तृप्त करवतील तितक्या कराव्या, संसाराचें कोड पुरवेल तितकें पुरवावें व एके दिवशीं बायकापोरें, घरदार, शेतीवाडी, धनधान्य, यांच्याकडे पहात, तळमळत, प्राण सोडावा ! ज्यांच्या हातीं द्रव्याची जपमाळ व ज्यांना कांताध्यान सर्वकाळ अशा बद्धांचा च हा बोलूनचालून पंथ होय ! त्यांना दुसऱ्या कोणत्या हि पंथाची अपेक्षा नसते, इतके ते आपल्या ठिकाणीं तृप्त झालेले असतात ! हा पंथ निर्विवाद त्याज्य होय; पण ज्या पंथांत परमार्थाच्या नांवाखालीं मनसोक्त आचार,

एकंकार, अष्टाकार यांना मुभा असते, ते हि पंथ त्याज्य च होत. याखेरीज बाकी सारे पंथ, ज्यांत शुद्ध आचार आहे, ज्यांत भगवद्भक्ति आहे, गुरुसेवा आहे, ज्ञानार्जन आहे, ते सारे चांगले.

**नाना देश भाषा मतें । भूमंडळीं असंख्यातें ॥**

त्या सर्वांचा निवाडा श्रीसमर्थांनीं आत्मबोधांत केला आहे, फक्त कोणत्या हि मताचा किंवा पंथाचा प्रत्यक्ष नामनिर्देश केला नाहीं, इतकें च.

**नाना पंथ नाना मतें हि असंख्यातें हीं समर्थानें शोधिलीं ।**
**गीतार्थ शोधितां शोधितां बरें शोधितां शिष्यसृष्टी बोधिली ॥**

महानुभाव, जटिल, बैरागी, लिंगाईत, स्मार्त, वैष्णव, मध्ववैष्णव इत्यादि पंथांचें एक एका पदांत वर्णन करून नंतर ज्ञानियांचा जो उदास पंथ ह्मणजे श्रीरामदासी सांप्रदाय, त्यावर गिरिधरांचीं दोन पदें आहेत. त्यांत श्रीग्रन्थराजाचा गौरव विशेष केला आहे.

**उदास ब्रह्मींचे निवाडे मोठे निवाडे ग्रन्थ पाहतां कळती ।**
**वेदांत सिद्धांत धादांत यांच्या पंथें कल्पवृक्ष फळती ॥**
**दासबोधग्रन्थ निवाडा मोठा निवाडा मायाब्रह्म निरोपी ।**
**भगवद्वाक्यें ग्रन्थ बोलिला पुढें चालिला गिरिवरदस्वरूपीं ॥**

## ( २८ ) हकिकत वाके

कडवीं १४७

वाका ह्मणजे हकिकतीचें पत्र. अशीं हीं दहा हकिकतीचीं पत्रें गिरिधरांनीं श्रीसमर्थांना ह्मणून लिहिलीं आहेत.

( १ ) **स्वात्मबोध वाकाः**—हा वाका श्रीमत् दासबोधाविषयीं आहे. त्यांत ग्रन्थाचा गोषवारा दिला आहे.

( २ ) **दिक्पाळ वाकाः**—इंद्रो वन्हिः पितृपतिः ( यमः ) नैऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥ या अष्ट दिक्पालावर हा वाका आहे.

( ३ ) **नवग्रह वाकाः**—सूर्यश्चंद्रो मंगलश्च बुधश्चापि बृहस्पतिः । शुक्रः शनैश्चरो राहुः केतुश्चेति ग्रहा नव ॥ यांच्यावर.

( ४ ) **महर्षि वाकाः**—कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम,

जमदग्नि, वसिष्ठ, हे सप्तर्षि व इतर ऋषि, यांचे संबंधीं हा वाका आहे.

( ५ ) **पंचीकरण वाका**:–मुळीं ब्रह्म निराकार, निर्मळ निश्चळ निराधार, मुक्त अक्रिय निर्विकार, गगनासारिखा विचार, तेथें मूळमाया सविकार, पवनासारिखा विचार, पंचभूतें त्रिगुणाकार, अष्टधा प्रकृतीचा प्रकार,प्रकृतिस्वभावें जगदाकार, इत्यादि.

( ६ ) **ब्रह्मगोळ वाका**:–यांत ब्रह्मांडाचें विवरण केलें आहे.

( ७ ) **दैवी वाका**:–यांत भरतवर्षांतील पवित्र नद्या, पवित्र स्थानें, द्वादश ज्योतिर्लिंगें, देवदेवतांचीं स्थानें, यांचा उल्लेख आहे.

( ८ ) **पंथी वाका**:–नाना पंथ, नाना मार्ग, मतमतांतरें इत्यादिकांचा यांत विचार केला आहे.

( ९ ) **निवेदनी वाका**:–छप्पन देश, तितके राजे, नाना शास्त्रें, धर्मप्रवर्तक, चतुर्विधा मुक्ति, भक्ति, प्रतिमापूजन, नाना पंथ, मोक्षदाता सद्गुरु, इत्यादिकांच्या वतीनें या वाक्यांत फिर्यादी निवेदन केल्या आहेत.

(१०) **राजशासनी वाका**:–यांत हि ब्राह्मणांच्या वतीनें फिर्याद मांडून श्रीसमर्थांचे हुकूम सुटले पाहिजेत, अशी विनंति केली आहे.

असे हे दहा वाके आहेत, त्यांचीं नांवें एका श्लोकांत गोंवून तो श्लोक शेवटीं दिला आहे:–

**स्वात्मबोध दिक्पती नवग्रहादि बोलिले ।**
**ऋषि महर्षि पंचिकर्ण गोळ हे विलोकिले ।**
**समस्त देव पंथ हे निवेदनें चि शासनें ।**
**अनुक्रमें वृतांत ग्रंथदीपिकाविलोकनें ॥ १ ॥**

हे वाके गिरिधरांनीं श्रीसमर्थग्रन्थाला धरून लिहिले आहेत. या वाक्यांतील सर्व विवेचन, सर्व विचार–नव्हे–मला वाटतें, शब्द आणि शब्द, दासबोधांतील आहे. हे वाके वाचावे आणि दासबोधग्रन्थाची विश्वव्यापकता मनांत पटवून घ्यावी. हे वाके पत्ररूपानें गिरिधरांनीं श्रीसमर्थांना लिहिले आहेत, ह्मणून वर सांगितलें च आहे. पत्रांचा मायना वाचण्यासारखा आहे, तो असा:–

श्रीरामसमर्थ

श्रीहनुमान स्वात्मबोधवाका
(किंवा असेल तो)

स्वस्ति श्रीमत्सच्चिदानंदैकघन ब्रह्मानंदैकजीवन परमानंद परमपुरुष परावर परात्पर सकळ चराचर आगमनिगमांतर अक्षर अपार परातीत निर्गुण गुणातीत निरंजन सदोदीत शुद्ध बुद्ध शब्दातीत भावगर्भ भावातीत आदिपुरुष आत्माराम सगुण निर्गुण पूर्णकाम अनंतकोटिब्रह्मांडनायक नाम श्री राम जय राम जय जय राम स्वामीसमर्थांचे सेवेसी ॥

दासानुदास परंपरैक गिरिवरदनामैक अणुरेणैक निजपदैक येकैक कृत साष्टांग नमस्कार विज्ञापना परिहार ॥

वगैरे

## (२९) काशीयात्राकथन

अभंग १०६

शके १६३९ चे सुमारास गिरिधरांनीं काशीयात्रा केली, त्या प्रसंगाचें वर्णन या प्रकरणांत आहे.

**संत जनी गुरु । पादुका वंदुनी । वेणीस्वामी नमुनी । सैह्याद्रीसी ॥**
**सैह्याद्रिशिखरीं । समर्थआसन । पादुकासंस्थान । कृष्णातीरीं ॥**

त्यांना साष्टांग नमस्कार करून, गिरिधर आज्ञा घेऊन निघाले, ते माहुली, पंढरी, करून गोदावरीतीरास आले. गोदावरीच्या कांठीं कोठें मुक्काम केला त्या ठिकाणाचें नांव त्यांनीं दिलें नाहीं, पण काशीखंड ग्रन्थ लिहिण्यास त्या ठिकाणीं त्यांनीं सुरवात करून यात्रा पुढें चालली. मार्गांत पवित्र नद्या लागत तेथें स्नानार्थ मुक्काम करीत, तीर्थें लागत त्या त्या ठिकाणीं तीर्थविधि करीत, त्यांचीं महात्म्यें श्रवण करीत, अशा ठिकाणीं निदान त्रिरात्र मुक्काम करून संकीर्तन करीत. पीयूष्णा, पूर्णा, नर्मदा इत्यादि नद्यांचीं स्नानें होऊन, अनेक सुगम, दुर्गम स्थळें ओलांडून यात्रा चित्रकूटास पोंचली. तेथें भरतप्रेमाची आठवण होऊन गिरिधर प्रेमभरित झाले. पयस्विनी, कालिंदी, यमुना, यांचीं स्नानें करून माघस्नानाला गिरिधरांनीं प्रयाग गांठलें. माघमासाचा पहिला पंधरवडा तेथें च कंठून काशीखंडाचा पूर्वार्ध समाप्त केला. नंतर

माघस्नाना अंतीं । समर्थांची तिथि ।
जे कां पुण्यतिथि । विख्यात हे ॥ ४८ ॥

ती प्रयागास च करून यात्रा पुढें चालली. गुहाचें शृंगवेर अवलोकन करून व गोमती, तमसा उल्लंघून यात्रा अयोध्येस पातली. अयोध्येचें दर्शन होतां च गिरिधर ह्मणतातः—

पापें गेलीं भंगा । क्षणमात्रें ॥ ५६ ॥
क्षणमात्रें पापें । नसतां पदरीं ।
गेलीं हे उत्तरीं । कोण बोले ॥ ५७ ॥
कोण बोले पाप । पुण्य सरयुतीरीं ।
जेथें नांदे हरि । आत्माराम ॥ ५८ ॥
निरंतर वृत्ति । नौमीं विश्रामली ।
रामआज्ञा जाली । गयागमने ॥ ६२ ॥

तेथें पुन्हा शरयुदर्शन घडलें आणि गिरिधरांना

ध्यान आठवलें । अयोध्येचें ॥ ६४ ॥
अयोध्येचा राम । विश्रामा विश्राम ।
तारक हें ब्रह्म । स्वानंदाचें ॥ ६५ ॥
स्वानंदाचा घन । श्रीराम वोळला ।
बरा काळ गेला । सरयुतीरीं ॥ ६६ ॥

गयेस यात्रा चैत्रांत च पोंचली. तेथें पिंडदानादि सर्व विधि उरकून यात्रा ज्येष्ठांत काशीस येऊन दाखल झाली. गिरिधरांचा चातुर्मास मुक्काम तेथें च होता.

वर्णवेना मुक्त-। पुरीचा स्वानंद ।
जेथें परमानंद । शिव स्वयें ॥ ८३ ॥
शिव स्वयें काशी- । खंडीं श्रवणीं बैसे ।
वाणी वदवीतसे । काशीखंडीं ॥ ८४ ॥

गुरुकृपेनें यात्राहेतु सफल होऊन काशीखंड ग्रन्थ हि काशीस च संपूर्ण झाला. गुरुकृपेची आठवण होऊन गिरिधर ह्मणतातः—

स्वामियाचें ध्यान । सह्याद्रिशिखरीं ।
साष्टांग मी करी । नमस्कार ॥ ८८ ॥
गुरुपदीं वास । नित्य काशीवास ।
गुरुवाक्यीं विश्वास । विश्वनाथ ॥ ९४ ॥

**गुरुपदीं सर्व । तीर्थें वोळगती ।**
**गुरुगीता पढती । ब्रह्मादिक ॥ १०२ ॥**

असें ह्मणून गिरिधरांनीं श्रीगुरुचरणीं संपूर्ण यात्रा निवेदन केली.

## ( ३० ) काशीखंड

**अभंग ३९४८**

मागच्या प्रकरणांत ज्या ग्रन्थाचा उल्लेख केला आहे तो च हा ग्रन्थ होय.

**काशीखंड ग्रन्थ जाला काशीपुरीं ।**
**मणिकर्णिकातीरीं विश्वनाथीं ॥** ११६/४५

तो मूळ संस्कृत ग्रन्थाला च बहुतांशीं धरून असल्यामुळें त्यांतील कथाभाग येथें देत नाहीं; तथापि ग्रन्थ छापला जाणें आवश्यक आहे. भाविकांस तो प्रिय झाल्यावांचून राहणार नाहीं.ग्रन्थाचा शेवट करितांना गिरिधर ह्मणतात:—

**जगद्गुरु स्वामी कृष्णातीरवासी । गोदातीरवासी अवतारें ॥** ११६/५५
**अवतार धर्मस्थापना परलोकीं । भरतखंडीं लोकीं विख्यात जो ॥५६॥**
**विख्यात जो हनुमान सर्वेश्वर । तो चि अवतार विश्व जाणे ॥५७॥**
**विश्व जाणे विश्वविख्यात कीर्तीचा। संतसज्जनाचा प्रेमसिंधु ॥५८॥**
**प्रेमसिंधु दीनबंधु दीनानाथ । ज्याची रघुनाथ उपासना ॥ ५९ ॥**
**उपासना राम तारक ब्रह्म हो । कीं परब्रह्म हो श्रुतिवाक्यें ॥ ६० ॥**
**श्रुतिवाक्यें रामीं रामदासस्वामी । परंपरा आह्मी निवेदिली ॥ ६१ ॥**
**निवेदिली वेणीस्वामीपरंपरा । कवि गिरिधरा ब्रह्मानंदु ॥ ६२ ॥**

## ( ३१ ) श्रीसमर्थकरुणा

**श्लोक १०९** **वृत्त—स्वागता**

या माळेचे १०८ श्लोकरूपी मणि स्वागता वृत्तांत असून १०९ वा मेरुमणि शार्दूलविक्रीडितांत ओंविला आहे.

हें प्रकरण फार प्रेमळ आहे. त्यांत गिरिधरांनीं श्रीसमर्थांना परोपरीनें आळविलें आहे. सांप्रदायिकाला ही माळा नेहमीं कंठीं धारण करावी असें वाटणार आहे. ती प्रत्येक सांप्रदायिकाच्या हातीं केव्हां पडेल ती खरी ! तोंवर तिच्या स्वरूपाचें दिग्दर्शन करून ठेवितों.

श्रीसद्गुरूचें स्वरूप व श्रुतीनें नेति नेति ह्मणून वर्णिलेलें स्वरूप हीं एक च होत. तेव्हां श्रीसद्गुरूच्या स्वरूपाचें तरी वर्णन कसें होऊं शकणार ? तथापि

श्रुति जरी लज्जित झाल्या, तरी जीवाचा स्वभाव कांहीं केल्या जात नाहीं, आणि ह्मणून श्रीसद्गुरुरूप गातां येईल तसें मी गाणार च !

**थोर भाग्य मजला भजनाचें । लाधलें जरि तुझ्या पुजनाचें ॥**

तरि मी हळु हळु आपल्या स्वरूपीं लीन होईन असा मला भरंवसा वाटतो. नवविध भक्तिमार्ग आह्मां जड जीवांस दाखविण्याकरितां आपण जरी मानव-वेष धारण केला तरी आपण प्रत्यक्ष श्रीराम च आहांत. रामनामेंकरून पाषाण तरले, मी तरी जड पाषाण च आहे, तेव्हां आपलें नाम घेऊन मी कां न तरेन ? महाराज, आपले गुण किती आठवूं ! दासबोधांत आपण मतम-तांतरांचें खंडण करून सर्व निवाडा करून दिला आहे. आपलें स्तवन करावें ह्मणून मी पुढें सरसावलों, पण माझ्या सर्व वृत्ति आपल्या चरणीं लीन होऊं पाहतात.

**शिष्य सर्व भुवनीं गित गाती । स्वामि सद्गुरु तुह्मां नित गाती ।**
**नाहिं गूणगणना वदुं आली । वृत्तिं पादसदनीं निजुं आली ॥ २५ ॥**

तथापि त्या वृत्तीला वारंवार जागी करून आपल्या सगुण स्वरूपाचे गुण वर्णन करण्यास प्रवृत्त होतों. मज किंकराला एरव्ही श्रीरामरूप कोठून उम-गतें ? तें आपल्या वचनबोधदीपानें मला सर्वत्र दाखविलें. तें रूप पाहून माझी देहबुद्धि नष्ट झाली. मी मूळचा जड फत्तर ! हालणें नाहीं, चालणें नाहीं ! त्या मजला आपण हातीं धरून भवार्णवीं उद्धरिलें ! कोण ही आपली सद-यता ! आपला ग्रन्थ मला नौकारूप झाला !

**ग्रन्थगर्भ हृदईं प्रगटीलें । तें चि सर्व हि जनीं प्रगटीलें ।**
**सत्य सत्य दृढ भाव करावा । हीन दीन दिन धन्य करावा ॥४५॥**

एवढी आपणांस माझी करुणा आली पाहिजे. माझे बोबडे बोल आपण गोड करून घेतले पाहिजेत. माझ्या हातून आपण कांहीं तरी सेवा घेतली पाहिजे.

**बोबडे तुजपुढें गुरुमाये । माययातित खुणा वदताहे ।**
**गोड वाटत तुला कवतीकें । रंजणूक करितों कवतीकें ॥ ६५ ॥**

स्वतःला श्रीरामाचे दास ह्मणवून घेऊन आपण लोकांवर केवढे हे उपकार करून ठेविले आहेत ! आपण स्वतःला दास ह्मणविता, पण लोक आपणांस समर्थ ह्मणतात.

**दास नाम धरुनी निजबोधें । तारिले हे जन बोधुनि बोधें ।**
**उत्तरोत्तर पुढें भजनाला । लाविले बहु बहूत जनाला ॥ ६९ ॥**

**मूढ लोक ह्मणती देहधारी । भक्त लोक ह्मणती अवतारी ।**
**चंचळें ह्मणत चंचळ तूला । निश्चळें ह्मणत निश्चळ तूला ॥ ७० ॥**

अशा आपलें मी चार प्रकारांनीं पूजन करितों. हे चारी प्रकार तरी आपण च शिकविले आहेत. अकराव्या दशकाच्या दुसऱ्या समासांत आपण चत्वार देव निरूपिले आहेत. ते चारी देव आपल्या ठायीं कल्पून मी आपली पूजा करितों. आपल्या पादुका ही च माझी प्रतिमापूजा, आपण अवतारी आहांत च, सर्वव्यापी जाणीवरूप हि आपण आहांत व निश्चळ निर्विकारी हि आहांत ! आपण नाहीं काय ? माझा मुख्य प्राण तुह्मी, माझा राम तुह्मी. आपलें धगधगीत ब्रह्मचर्य पाहून मला आपण मारुतीप्रमाणें वाटता. शिवाय मारुतीप्रमाणें आपण हि रघुवरीवांचून अन्य देव सहसा जाणत नाहीं. आपण च राम आहांत असें मी कां न ह्मणावें ? घरदार, आईबाप सोडून आपण हि श्रीरामाप्रमाणें वनवास पत्करिला !

**राघवें वनविहारण केलें । सर्व राज्य जन सांडुनि दिल्हें ।**
**त्यापरी च तुज म्यां निरखीलें । म्यां नव्हे बहुजनीं निरखीलें ॥८४॥**

खरदूषणादि राक्षसांस रामानें मारिलें, तर आपण हि बद्ध प्राणी हे च कोणी राक्षस त्यांना बोधरूपी बाणानें ताळ्यावर आणिलें. कामक्रोधादि असंख्य राक्षसांचा आपण संहार केला. अविद्यारूपी शूर्पणखेचें आपण हि नाक कापिलें. अहंकाररूपी रावणाचा अखेरीस आपण वध केला. आपल्यांत आणि श्रीरामांत याशिवाय आणखी एक साम्य मला दिसतें. शिवाला रामाचा ध्यास लागला होता, आणि आपला हि ध्यास शिवानें नव्हता कां घेतला ?

**नाम तारक रघोत्तम त्याचें । ध्यान शीव करितो बहु त्याचें ।**
**स्वामि सद्गुरु तुह्मा बहु ध्याती । शीव अंश भगवे बहु गाती ॥ ९७॥**

फार काय सांगूं, ब्रह्मा, विष्णु, महेश हि आपण च आहांत. अनेक शिष्य करून ब्रह्मदेवाचा गुण आपण प्रगट केला, त्यांचें पालन करून आपण त्यांना विष्णुस्थानीं झालांत व त्या सर्वांना आपल्या स्वरूपीं ठाव देऊन रुद्राचें काम हि आपण केलें ! सद्गुरो, आपल्या स्वरूपाचा मला कधीं तरी निश्चितार्थ होईल काय ? आपल्या स्वरूपाचा मला साक्षात्कार होईल काय ? आपण निर्गुणरूप आहांत, त्या आपणांस म्यां सगुणानें कसें गावें ? आपलें स्तवन करावयाचें ह्मणजे मीं निर्गुण च झालें पाहिजे; आणि त्याप्रमाणें श्रीसद्गुरुस्वरूपीं गिरिधर बुडाले हि ! शेवटचा मेरुमणि गिरिधर ओवतात:—

इत्यानि करुणार्णवा विनविलें नानारुपें भाविलें ।
नाना गूण गुणान्वयें अळविलें कारुण्य हें दाविलें ।
सत्यासत्य असत्य शब्द मज हा लागों स्वभावें भला ।
शब्दातीत समर्थस्वामि मजला नीरंजनू लाभला ॥

## ( ३२ ) श्रीकरुणाराम

श्लोक १८२ वृत्त–स्वागता

या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीरामाला आळविलें आहे. गिरिधरांच्या ठिकाणीं दोष कोठचे असणार, पण श्रीसमर्थांनीं तुह्मांआह्मांसाठीं जसें, अचपळ मन माझें नावरे आवरीतां ॥ ह्मणावें, तद्वत् गिरिधरांनीं, जणूं काय स्वतःचे अनेकविध दोष आठवून ते नाहींसे करण्याविषयीं श्रीरामाची प्रार्थना केली आहे. या प्रकरणाची दुसरी मौज अशी आहे कीं, श्रीरामाची प्रार्थना करीत असतां, त्यांत गिरिधरांनीं क्रमशः रामायणाचीं सात हि कांडें आणलीं आहेत.

रामा, एरव्हीं तूं मजसारख्या दीन जनास कोठून भेटणार, पण सद्गुरूंनीं मजवर कृपा केल्यामुळें, भेट दिल्यावांचून तुला गत्यंतर च नव्हतें.

तूज दाउनि दिलें गुरुनाथें । ध्यान गान शिकऊनि दिनातें ।
ज्ञान धर्म तप तीर्थ तपावें । सर्व न्यास तव नाम जपावें ॥ ३ ॥

सद्गुरूंनीं मार्ग दाखविला ह्मणून त्या मार्गानें जातां आलें, सद्गुरु न भेटते तर माझी कांहीं धडगति नव्हती ! कोठून असावी ? मी सर्व दोषांनीं भरलों आहे; त्या दोषांची आठवण झाली ह्मणजे मन कंटाळतें.

भाव तो मज दिना कइचा रे । नष्ट दुष्ट जिव मी कळिचा रे ।
भुक्ति तप्त जाहली रघुराया । या भुमीं निपजणें चि मराया ॥ ८ ॥
कर्म ही न घडलें मज हीना । धर्म पुण्य घडलें न च दीना ।
योगयाग कइचा मज रामा । भोगत्याग न घडे चि विरामा ॥ ९ ॥

माझ्या हातून धड कर्म होत नाहीं, नीटपणें उपासना होत नाहीं, ज्ञानाविषयीं तर बोलावयास च नको, पण ह्या तीन हि मार्गांत विघ्नें काय थोडीं आहेत ?

कर्ममार्ग भरला चि कचाटें । जाहलीं जन उपासक चाटें ।
ज्ञानकांड तिसरें अनुमानें । नासले जन बहू अभिमानें ॥ ३५ ॥

अशा स्थितींत माझी तुला प्रार्थना इतकी च आहे कीं,

**कर्म म्यां न करणें फळभावें । भक्ति दे मज उपासकभावें ।**
**ज्ञान दे मज अहं दवडूनि । तीन कांड मज दे निवडूनि ॥**

मी बोलून चालून दीन आहे, तेव्हां मज अनाथाला एकटें गांठून षड्रिपूंनीं लुटावें हें साहजिक आहे. अशा वेळीं, हे रामा, तुजवांचून माझें रक्षण करण्यास कोण समर्थ आहे ?

**दीन मी मजवरी उठताती । काम चोर मजला लुटिताती ।**
**स्वामि सद्गुरु ह्मणे अजि येथें । जानकीजिवन राखिल तूतें ॥ ५३ ॥**

मुखीं राम त्या काम बाधूं शकेना । अशी सद्गुरूंची प्रतिज्ञा आहे, ती खोटी कदापि हि होणें नाहीं ! ह्मणून

**वाटतें तव सुसंग धरावा । वाटतें जनकुसंग हरावा ।**
**देह गेह समुळीं विसरावा । राम राम ह्मणतां चि सरावा ॥११३॥**

तेव्हां, रामा, तुझ्या नामाचा मी अखंड छंद घेतला आहे, त्यामुळें माझ्याकडे वक्र दृष्टीनें पाहण्याची कोणाची प्राज्ञा आहे, असें मला वाटत नाहीं. तथापि, रामा, माझ्या जीवींची एक इच्छा आहे, ती आपण पुरविल्याशिंवाय माझें समाधान होणार नाहीं ! एक वेळ मला आपले चरण दाखवा ! भरताला पादुका देऊन त्याचें जसें कोड पुरविलें, तसें माझें पुरवाल काय ?

**पादुका दिधलिया भरतासी । पूर्ण भक्त निजभक्त रतासी ।**
**येक वेळु पद दावि दिनासी । ते चि पाय बसवीन मनासी ॥ ११५**

किंवा मारुतीला जसे आपण भेटलात, तशी जर मला आपण या कलियुगीं भेट द्याल तर मजसारखा भाग्यवान् दुसरा कोणी नाहीं, असें ह्मटलें पाहिजे.

**भेटलासि जइसा बलभीमा । भक्तभूषण विभूषण रामा ।**
**भेटसी मज दिना कलयूगीं । धन्य धन्य तरि मी कलयूगीं ॥ १३३ ॥**

पण मी वेडा तर नाहीं. राम मला भेटावयाचे काय अजून राहिले आहेत ? श्रीसद्गुरु समर्थ हे कोण आहेत ?

**स्वामि राम हनुमान रुपें जी । स्वामि सद्गुरु रुपें स्वरुपें जी ।**
**लोक वानर बहू मिळवीले । पादपद्मसदनीं मिळवीले ॥ १४७ ॥**

आणि मारुती तरी दुसरे कोण ?

**तारिलें कपिकुळास भिमानें । मारिलें अरिकुळा अभिमानें ।**
**ते चि ऊपम समर्थप्रभूतें । तारकू बुडतयांप्रति येथें ॥ १४८ ॥**

असे समर्थ सद्गुरु लाभल्यावर मी आतां वृथा चिंता कां करावी ! असें ह्मणून प्रकरणाचा उपसंहार गिरिधर करितातः

**एवं राघवदर्शनीं मज मनीं कारुण्य जें वाटलें ।**
**तें तें सादर ऐकतां प्रभुमनीं कारुण्य हें लोटलें ।**
**आत्माराम अराम राम सकळां तें नाम माझे मुखीं ।**
**ब्रह्मादीक पिपीलिका अणुमय व्यापूनि केले सुखी ॥ १८२ ॥**

## ( ३३ ) श्रीकरुणारुद्र

श्लोक १२१ वृत्त-स्वागता

यांत श्रीहनुमंताची करुणा भाकीत एकंदर हनुमंतचरित्र क्रमशः निवेदन केलें आहे. अकरा अकरा श्लोकांचें एक एक अशीं हीं अकरा भीमरूपी स्तोत्रें आहेत. वृत्त हि अकरा अक्षरांचें च आहे.

**कलयुगीं कलिच्या कलहानें । गादलों बहु बहु सळहानें ।**
**सोसुं मी किति अतां भिमराया । या भुमी मरण पात्र मराया ॥१३॥**

श्रीसमर्थांनीं जे अकरा मारुती स्थापन केले त्या बहुतेकांचें ध्यान एकसारखें च आहे. श्रीरामापुढें जो मारुती असावयाचा तो दासरूपानें, बाकी सर्व प्रतापरूपानें. डावा हात कटावर, डावा पाय दैत्याच्या मस्तकावर व उजवा हात वर उगारलेला, हें प्रतापमारुतीचें ध्यान होय. तें च ध्यान मी ध्यातों, तरी तें ध्यान धरून, गिरिधर ह्मणतात, हे भीमराया, मला आपण सत्वर भेट द्याल काय ?

**तूं जसा कर कटावरि ठासी । येक हस्तु दिनमस्तक ठासी ।**
**तें चि ध्यान करुनी मनभावें । भावितों त्वरित सत्वर यावें ॥३७॥**

हे मारुतिराया, तुला रामरायांनीं मागें ठेवून जें चिरंजीवपद दिलें आहे, तें विनाकारण नाहीं. आह्मां रामोपासकांचें तूं रक्षण केलें पाहिजेस, आह्मांस संकटीं पावून आमची रामोपासना अखंड चालविली पाहिजेस.

**वज्रदेह तुज कां दृढ दिल्हे । भक्तलोक भजकां जडवीलें ।**
**चंद्र सूर्य जव हे दिसताती । रामचंद्रचरितें वसताती ॥ १०१ ॥**

असो. हीं स्तोत्रें फार प्रेमळ आहेत, त्याची कल्पना तीं साद्यंत वाचल्यांवांचून होणार नाहीं. तो प्रेमळपणा मला सारांशांत व्यक्त करतां येत नाहीं हा माझा दोष होय. ह्या एका च प्रकरणाविषयीं मी हें ह्मणतों असें नव्हे, सर्व च प्रकरणांची स्थिति अशी आहे. या प्रस्तावनेंत गिरिधरांच्या कवितेचा मी जो गोषवारा देत आहे, त्यावरून त्या कवितेविषयीं वाचकांची जी कल्पना होईल तीहून शतपट अधिक योग्यतेची मूळ कविता आहे; असो. प्रस्तुत प्रकरणाचा गिरिधर उपसंहार करितातः

इत्यानी करुणा करूनि बहुसा प्रार्थूनि प्राणाधिपु।
नाना गूणरुपें यथामति रुपें गाऊनि वज्रीवपु।
रुद्रा रुद्ररुपें चि श्लोक जाहले रुद्राक्षरी छंद हा।
रामोपासक वीनवी भिमरुपी आनंद हा कंद हा॥ ७॥

## ( ३४ ) अब्दरामायण

श्लोक १८३ वृत्त-अनेक

आनंदनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमीस मध्यान्हकाळीं अयोध्येस प्रभु रामचंद्र अवतरले.

वयाचे ४ थे वर्षापासून विद्याभ्यास
११ वे वर्षीं व्रतबंध
१२ वे वर्षीं विश्वामित्राबरोबर गमन
१५ वे वर्षीं शिवकार्मुक भंगिलें, सीतास्वयंवर झालें, तेव्हां सीतेचें वय सहा वर्षांचें होतें.
१५–२७ अयोध्येस वास
२७ वे वर्षीं वनवासाला सुरवात. सीतेचें वय त्या वेळीं अर्थात् अठरा वर्षांचें होतें.
२७–४१ वनवास

वैशाख शु. १ ला वनवासास निघाले.
१, २, ३ केवळ जलपान.
४ स कांहीं वनफळें सेविलीं.
५ स चित्रकूटीं पोंचले.
वैशाख व. ६ स भरत आले. नंतर तेथून निघून पंचवटीस आले, व तेथें साडे बारा वर्षें क्रमिलीं. खरदूषणादि राक्षसांचा संहार.
आश्विन व. ३० स शूर्पणखेला विरूप केलें. पुढें साडे तीन महिन्यांनीं सीताहरण.
माघ शु. १४ स सीता गुप्त झाली.
माघ व. ७ स रावणानें मायावी सीतेचें हरण केलें, ह्मणजे साडे चवदा महिने सीता विरह. राम सीतेच्या शोधार्थ निघाले, जटायूनें शुद्धि सांगितली. कबंधाला

मारून बद्रीवनांत शिरले. तेथें शबरीची भक्ति पाहून उच्छिष्ट फळें भक्षिलीं. तेव्हां रामलक्ष्मणाचा थोडा संवाद झाला तो ऐका.

**समर्था वनीं फीरती भिल्लटें हीं । नसे ज्ञान ना ध्यान हें रानटें हीं ।**
**अशांचीं उष्टिषें कशीं अंगिकारा । समर्था प्रभू कोण सांगे विचारा ॥**
**म्हणे राम रे लक्ष्मणा योधधामा । कळेना तुला हा कदां भक्तप्रेमा ।**
**न जाणोनि मातें किती कष्टें हीं । भलीं चोखटें भिल्लटें रानटें हीं ॥**
**तुला देखवेना तरी जा अयोध्ये । फणीबंधु तेव्हां धरी पाय सध्ये ।**
**दिनानाथजी ब्रीद हें साच तूझें । कळेना प्रभू भक्तिसाम्राज्य माझें ॥**

फाल्गुन महिन्यांत पंपातटीं आले. तेथें तीन महिने श्रीरामांनीं अनुष्ठान केलें.

ज्येष्ठ शु. १ स पंपासरोवरीं मारुती भेटीस आले.

ज्येष्ठ शु. ५ म्हणजे नागपंचमीस सुग्रीवाची भेट झाली.

ज्येष्ठ शु. ८ स वालीला बाणानें मारिलें. अपराधावांचून वालीला रामानें मारिलें असा कित्येक दोष देतात पण तो निरर्थक आहे.

**विनापराध मारिलें म्हणोन बोलती जनीं ।**
**पराभिळाष जारमार छेदितों रे मी क्षणीं ।**
**कितेक पातकें जिवा अवश्यरूप घातकें ।**
**फणीप्रती कितेक गूज बोलिले श्रीनायकें ॥ ६१ ॥**

ज्येष्ठ शु. १३ स सुग्रीवाला किष्किंधेचें राज्य दिलें.

ज्येष्ठ शु. १५ श्रीराम माल्यवान् पर्वतावर रहावयास गेले. वर्षाकालीं तेथें च एका गुहेंत मुक्काम केला. श्रावण मासांत लिंगार्चन, भाद्रपदांत पक्ष वगैरे सर्व विधि तेथें केले.

**लिंगार्चनीं श्रावण मास तेथें । वर्षा गिरी शोभत राम जेथें ।**
**श्रीमाल्यवंतीं भगवंत साक्षात् । कपीरुपें सेवक रुद्र साक्षात् ॥६८॥**
**पक्षमास वीध सर्व । सारिती प्रभू अपूर्व ।**
**विधीसि रक्षिती वनीं । मुनि समस्त भोजनीं ॥ ६९ ॥**

आश्विन शु. १० च्या मुहूर्तावर श्रीराम तेथून निघाले.

कार्तिक शु. १० ला सुग्रीवाचें सर्व सैन्य जमा झालें.

कार्तिक व. ७ स मारुती सीताशोधनार्थ निघाले.

मार्गशीर्ष शु. १० स मारुतींनीं उड्डाण करून समुद्र लंघिला.

शु. १२ स सीतेला अशोकवनांत भेटले.

| | | |
|---|---|---|
| | व. ७ | स मारुती सैन्यासह श्रीरामचरणापाशीं आले. |
| | व. ३० | स श्रीराम समुद्रतीरीं आले. |
| पौष | शु. ४ | स बिभीषण येऊन भेटले. |
| | शु. ८ | पासून तों १२ पर्यंत पांच दिवसांत सेतु बांधला. |
| | शु. १४ | स श्रीराम सिंधुपार झाले. |
| | व. ३ | ते १० पर्यंत लंका पुरवेष्टन. |
| | व. ११ | स रावणाकडून शुक व सारण दूत आले. |
| | व. १२ | स पुरद्वार रोधिलें. |
| | व. ३० | स मायाशिर करून रावणानें सीतेला फसविण्याचा प्रयत्न केला. |
| माघ | शु. १ | स अंगद शिष्टाईस गेले. |
| | शु. ७,८ | घोर युद्ध. |
| | शु. ११ | स अकंपन मारिला. |
| | शु. १३ | स वज्रदंष्ट्राला अंगदानें मारिलें. |
| | शु. १४ | स प्रहस्ताला नीलानें यमसदनास पाठविलें. |
| | व. २ | स मंदोदरी रावणाला उपदेश करिते. |
| | व. ४ | स रामांनीं रावणाचा मुकुट खालीं पाडला. |
| | व. ९ | स कुंभकर्ण लढाईस आला. |
| | व. १४ | स रामांनीं कुंभकर्णाचें शिर उडविलें. |
| फाल्गुन | शु. ४ | पर्यंत रावणाकडील महोदर, त्रिशिरा, देवांतक, नरांतक व महापार्श्व हे पांच वीर मारले गेले. |
| | शु. ५ ते ७ | अतिकाय युद्ध करून निमाला. |
| | शु. ८ते१२ | या पांच दिवसांत कुंभ, निकुंभ, जंघ, प्रजंघ, क्रोधन, शोणिताक्ष व यूपाक्ष हे सात कामास आले. |
| | शु.१३ ते व. १ | पर्यंत चार दिवसांत मकराक्षादि बाकीचे हि वीर निमाले, तेव्हां |
| | व. २ | स इंद्रजित युद्धास आला. |
| | व. ३ | स मारुतींनीं द्रोणागिरि आणून वानर उठविले. |
| | व. ७ | पर्यंत युद्ध मंदावलें, पण |

व. ८ ते १३ हे सहा दिवस घनघोर युद्ध होऊन शेवटीं
इंद्रजिताचें शिर लक्ष्मणानें बाणानें उडविलें.

चैत्र शु. १ ते ५ पुन्हां घोर युद्ध.

शु. ९ ह्मणजे श्रीरामनवमीस च लक्ष्मणाला शक्ति लागली.
पुन्हा मारुतीनें द्रोणागिरि आणून लक्ष्मणाला उठविलें.

शु. १० स स्वतः रावणाची स्वारी निघाली.

शु. ११ स रामासाठीं इंद्राच्या आज्ञेनें रथ घेऊन मातली आला.

शु. १२ पासून तों व. १४ पर्यंत अठरा दिवस " रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव " झालें.

व. ३० स रावण वैकुंठास गेला.

**आनंदसंवत्सर जन्मकाळीं । त्रैलोक्य आनंदविलें सुकाळीं ।**
**शतकोटि रामायणसिंधु जाला । वैकुंठधामाप्रति शत्रु नेला ॥१२८॥**

वैशाख शु. १ ला वानरदळांत आनंदोत्सव झाला. बरोबर चवदा
वर्षें वनवासाला झालीं.

शु. २ स बिभीषणाला राज्याभिषेक केला. तेहतीस कोटी
देवांचा बंदिवास संपला.

शु. ३ बलभीमांनीं सीतामातेस संपूर्ण वृत्तान्त निवेदन
केला. चवदा महिने अठरा दिवस सीतावियोग व
चवदा महिने दहा दिवस सीतेला लंकावास.
सीता रामांकीं विराजली.

**देवेंद्र देव स्तविती स्तवनें प्रभूला ।**
**कैलासधाम धवळे पाहती रुपाला ।**
**रामा तुझें परम सीतळ नाम कंठीं ।**
**धरिलें सदां परम निर्मळ नीळकंठीं ॥ १४० ॥**
**भोळेपणें असुर म्यां प्रभु वाढवीले ।**
**संहारिले अरि तुवां सुर सोडवीले ।**
**ध्रूवापरी अढळता निजसेवकासी ।**
**लंका अपूर्व दिधली जि बिभीषणासी ॥ १४१ ॥**

वगैरे प्रकारांनीं देवादिकांनीं श्रीरामाचें स्तवन केलें. बिभीषणानें वानरांचें पूजन केलें. प्रभूचें चित्त भरताकडे होतें. भरताची प्रतिज्ञा आठवून पुष्पकविमान सिद्ध केलें.

वैशाख शु. ५ स श्रीराम प्रयागास आले.

वैशाख शु. ६ स बरोबर चवदा वर्षांनीं भरतभेट.

वैशाख शु. ७ स श्रीराम भद्रासनीं विराजले.

त्या वेळीं श्रीरामांचें वय ४२ व माताजानकीचें वय ३३ होतें. पुढें अकरा हजार वर्षें राज्य करून

वैकुंठधामाप्रति राजधानी ।
नेली पुरी बैसवुनी विमानीं ।
विष्णूरुपें ध्यान प्रयाणकाळीं ।
हनुमंत ते बोलती ते चि काळीं ॥ १७१ ॥

उपासकांलागुंनि ध्यान कैसें ।
श्रीराम रामेति अपूर्व ऐसें ।
राहो सदा सर्व हि सांप्रदाईं ।
विनती पुनर्दर्शनहेतु पाईं ॥ १७२ ॥

धनुर्बाण घेऊनिया पृष्ठिभागीं ।
लिलाविग्रही राम मी भक्तसंगीं ।
सिता मोक्षश्रीया घरीं नित्य तेथें ।
श्रिया सानकूळा स्वयें मी च जेथें ॥ १७४ ॥

जयाचे घरीं अर्चनें भक्तिरंगें ।
कथा रम्य रामायणें प्रेमरंगें ।
सडे मार्जने रंगमाळा सुरंगें ।
पुजा नित्य नीलांजनें प्रीतिरंगें ॥ १७५ ॥

जयंत्यादिकें मुख्य पर्वें अचाटें ।
अती संभ्रमें मांडिती भक्ति थाटें ।
मला लागतें सर्व सिद्धीस न्यावें ।
जगद्व्यापकु रूप माझें स्वभावें ॥ १७६ ॥

गिरीकंदरीं राहती वीतरागी ।
जनामाजि आबोलणें जे विरागी ।
तयाचें किती भक्ति साहित्य तेथें ।
मला सर्व करणें चि लागे चि येथें ॥ १७७ ॥

तुझा मारुती संभ्रमें वास जेथें ।
मला राहणें सर्वभावें चि तेथें ।
महाक्रूर तो काळ लोटून घालीं ।
स्वयें राम मी मारुती सर्वकाळीं ॥ १७८ ॥

दिनानाथजी बोलिले तें चि गावें ।
बहू मागणें हें चि देवा स्वभावें ।
कथावालिमकीमाजि म्यां मग्न व्हावें ।
कवीभक्तऊपासकां बोलवावें ॥ १७९ ॥

सख्या प्राण तूं प्राणनाथांतरीं मी ।
सख्या तूं हरी श्रीहरीअंतरीं मी ।
सदां सर्व ही बोलवी चालवी मी ।
सदां भक्त वीभक्त कांहीं नव्हे मी ॥ १८१ ॥
गुरुनाथजी मद्रुपें सूखमूर्ति ।
सदां सर्वदां बोधिती पुण्यकीर्ति ।
अनामाजि ऊपासना रामदासी ।
महा भक्त श्रीरामनौमीविलासीं ॥ १८२ ॥
एवं मारुति राम ऐक्यस्वरूपीं गुह्यार्थ अनुवादती ।
देवेंद्रादिक देव सर्व स्वपदें सर्वत्र बोबाळिती ।
श्रीमद्दास उदास स्वामिचरणीं वेणीप्रवाहो गिरी ।
श्रीरामायण अब्दग्रंथ कवि हा वालमीकिना उत्तरीं ॥ १८३ ॥

## ( ३९ ) मंगलरामायण

श्लोक १६१९ वृत्त–शार्दूलविक्रीडित

आधीं मंगल शारदा गणपती श्रीसद्गुरु गाइला ।
कृष्णातीरनिवास वास बहुसा ऊदाससा पाहिला ।
ज्याची कीर्ति जगांत होउनि पुढें भेदीत गेली चढे ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥ १ ॥

असें स्तवन करून या रामायणाला गिरिधरांनीं आरंभ केला आहे. एकंदर श्लोक १६१९ आहेत, त्या सर्वांचा चवथा चरण

कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥

हा एक च आहे. लग्नप्रसंगीं ह्मणावयाचीं हीं मंगलाष्टकें च आहेत; कारण गिरिधर ह्मणतात:–

किंवा येक गमे रघूवरवरा सत्कीर्तिकन्या दिल्ही ।
जीचें कीर्ण प्रकाशलें अति भलें शतकोटिसंख्या भली ।
तीला आणि रघोत्तमासि बरवें सूलग्न लाऊं भलें ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥

ग्रन्थारंभीं श्रीविष्णूपासून श्रीरामापर्यंतच्या चाळीस पिढ्यांचीं व जानकीच्या पूर्वजांच्या सवीस पिढ्यांचीं नांवें दिलीं आहेत. लग्नाला राजे कोणकोणच्या देशांचे आले होते त्यांचीं नांवें दिलीं आहेत. पुढें सर्व रामायणाची सप्तकांडात्मक कथा क्रमशः सांगितली आहे, तिचा सारांश देणें शक्य नाहीं. प्रस्तावनेच्या मर्यादेकडे पाहून आज ती कथा पुन्हपुन्हां देण्याची आपणांस आवश्यकता वाटत नाहीं, मग गिरिधरांना तरी कां वाटली होती ? एक च कथा पांच सात प्रकरणांत त्यांनीं तरी कां सांगितली ? शिवाय गिरिधर ह्मणतात, आपण कांहीं मोठे कवि नाहीं किंवा आपल्या काव्यांत कांहीं नवीनपणा हि नाहीं; मग ती च ती कथा गिरिधरांनीं वारंवार कां गाइली बरें ? अहं ब्रह्मास्मि महावाक्याचा उपदेश होऊन हि श्रीरामकथेंत गिरिधरांना गोडी उरली च होती काय ?

**श्रोतें सज्जन हो तुह्मी सकळ ही रामायणु ऐकिलें ।**
**तेथें युक्ति प्रयुक्ति शक्ति नसतां कां हें येथें बोलिलें ।**
**माझें मीपण वारलें परि हरीगूणार्णवीं थारलें ।**
**कुर्यात्० .............................. ॥ ३/५ ॥**

माझें मीपण सद्गुरूंनीं वारिलें, तरी पण हरिगुणवर्णनाचे ठिकाणीं जी मति जडली आहे ती कांहीं केल्या तेथून ढळत नाहीं असें गिरिधर ह्मणतात. आणि ह्मणून च ते च ते गुण शंभरदां हि वर्णन करून त्यांना कंटाळा आला नाहीं ! शिवाय श्रीगुरुचरणाला नमन करून रामकथा गातां गातां च गिरिधरांना सर्वत्र राम दिसूं लागले.

**आत्माराम उपासना त्रिभुवनीं व्यापूनि ते राहिली ।**
**श्रीमत् सद्गुरुनाथजीसि नमुनी सर्वत्र ते पाहिली ।**
**तेथें मीपण वारिलें जिवदशे मायामये सारिलें ।**
**कुर्यात्० .............................. ॥ ३/११०**
**श्रीमत् सद्गुरुनाथअंघ्रि नमितां श्रीराम तो भेटला ।**
**आत्माराम जनीं वनीं निजमनीं आखंड तो दाटला ।**
**नाना देह विदेह भाव अवघे सर्वत्र हे वारले ।**
**कुर्यात्० .............................. ॥ ३/११३**

गिरिधर ह्मणतात, मी मूळचा पाषाण असून श्रीरामकथा वर्णन करूं शकत आहे ही सारी सद्गुरुकृपा होय. सद्गुरूचें ध्यान हृदयांत सांठविल्यामुळें ह्या

पाषाणांतून कवितारूपानें हें गंगोदक स्रवत आहे. एरव्हीं ह्या किंकराचा काय अधिकार होता, कीं त्यानें संतसज्जनापुढें रामकथा गावी ! अशा गुरुचरणापुढें गिरिधर वारंवार लोटांगण घालीत आहेत.

स्वामीच्या वदनेंदुदर्शनवशें हा सोमकांतु द्रवे ।
पाषाणांतुनि गांग हें उदक हें कवितारुपें हें स्रवे ।
आनंदैक कथा त्रिवेणिप्रभुची वेणीरुपें चालिली ।
कुर्यात्० ........................................ ४/११९ ॥

नाना पंथ अनंत संत पाहतां विश्रांति येथें दिसे ।
सारासारविचार सार बहुधा संपूर्ण जेथें वसे ।
त्या संतासि नमस्कृतैक चरणीं घालीन लोटांगणी ।
कुर्यात्० ........................................ ॥ ४/१२० ॥

अशा सद्गुरूंनीं ही जी रामोपासना शिकविली, ती आह्मी आमरण चालवूं व ते श्रीगुरुचरण अखंड स्मरूं.

यावद्देह उपासना दृढ धरूं तद्भक्ति भावें करूं ॥ ४/१२३ ॥
श्रीमत् दास उदास स्वामि आमुचे जे निर्मळु निश्चळु ।
त्यांचे देह विदेह नामरुप हें जाणोनि घ्या केवळु ।
ज्याच्या दर्शनस्पर्शनें मन मुरे संसर्गवेथा नुरे ।
कुर्यात्० ॥ ४/१२५ ॥

रामायण बाजूस ठेवून आपण दासायन च चालविलें आहे ! काय बिघडलें ? रामकथेपेक्षां दासकथेची गोडी काय कमी आहे ? रामदास्य तरी काय फुकाचें आहे ? सीताशुद्धीला जाण्यापूर्वी वानरांनीं जो निर्धार केला होता तो च निर्धार करावा तर रामदास ह्मणवावें !

प्राणत्याग करूं श्रिराम चि स्मरूं काया वनीं संहरूं ।
दर्भातें अथरूं निवेशन करूं निष्ठा धरूं उद्धरूं ।
संसारार्णव ऊतरूं भव तरूं संसर्गवेथा हरूं ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥ ४/२९

आणि अशा श्रीरामदासांच्या चरणीं मन जडेल तर आणखी निराळी श्रीरामकथा ऐकावयाची कोणती राहणार आहे ? तेव्हां गिरिधरांनीं श्रोत्यांची केलेली विनंती देऊन आपण पुढील रामायण हातीं घेऊं.

श्रोते हो दशकंठ मारुनि प्रभू भरतासि भेटे जसा ।
नाना हे दश देह सारुनि तुह्मी श्रीराम भेटो तसा ।

आवडेह उपासना दृढ धरूं श्रीरामसेवा करूं ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥ ६/११२

## ( ३६ ) छंदोरामायण

श्लोक १५५६ वृत्त–अनेक

श्रीसमर्थ, वेणाबाई व बाइयाबाई असा हा त्रिवेणीसंगम होय, आणि ह्मणून पुष्कळ वेळां आपल्या परंपरेला गिरिधरांनीं त्रिवेणी ह्मणून संबोधिलें आहे. त्रिवेणीच्या ऐवजीं या रामायणांत गिरिधरांनीं नुसता नदी शब्द च योजला आहे.

गिरिगुहांत राहणें । जनीं अभिष्ट पाहणें ।
समर्थ स्वामि ते गुरु । नदी ह्मणे जगद्गुरु ॥ १/४
श्रीरामदासस्वामिचें । चरित्र सर्व तेथिचें ।
हरादिकां न वर्णवे । नदीस केवि वर्णवे ॥ १/२४३

या ठिकाणीं व इतरत्र हि या रामायणांत त्रिवेणीऐवजीं नदी शब्द योजला आहे. नदी ह्मणजे त्रिवेणी व पर्यायानें तद्रूपता पावलेले गिरिधर होत.

त्रिवेणी हे परंपरा । समर्थ राम हा खरा ।
उदास पंथ बोलवी । कथा स्वयें चि चालवी ॥ १/२४२

अशी ही रामायणी कथा आपल्याकडून श्रीसमर्थ बोलवीत आहेत. तींतील एकादा दुसरा प्रसंग आपण येथें देऊं.

रामाला एकदां कां राज्याभिषेक झाला ह्मणजे रावणाच्या बंदिशाळेंत पडलेले देव कोण सोडविणार, असा विचार पडल्यामुळें रामाकडे भूभारहरणार्थ प्रार्थना करण्यासाठीं एक मुनि आले. ते कोण ?

कळहो जयासि आवडे । अखंड वृत्ति वावडे ।
शिखा अखंड थर्थरी । आला श्रीराममंदिरीं ॥ ३/३४

मग पुढें कैकेयीमार्फत त्या मुनींनीं आपला डाव कसा साधला ती कथा सर्वश्रुत च आहे.

भरतप्रेमाची बरोबरी आजपर्यंत कोणा हि बंधूला करतां आली नसेल. रामाला परत आणण्यासाठीं भरत चित्रकूटास गेले असतां रामाला ह्मणतातः—

परांतरासि जाणसी । स्वबंधु साक्ष नेणसी ।
क्षमा करूनि कैकये । रघोत्तमा पुरीसि ये ॥ ३/१८७

तुझी च आण वाउनी । गुरूसि साक्ष ठेउनी ।
विभूति चर्चिली पुढें । मनीं तुझें चि रूपडें ॥ १४८
तुला वनांत सोडुनी । करूं मी राज्य जाउनी ।
अघोर नर्क तेधवां । चले पुरीसि येधवां ॥ १४९

सुंदरकांडाचा शेवट करितांना गिरिधर ह्मणतातः—

रामदाससमर्थजी जनपावनी प्रभुची कथा ।
ऐकतां जड जीव पावन होत हे निज तत्वता ।
संपलें निजकांड सुंदर वेणि हे वदली नदी ।
युद्धकांड गिरी ह्मणे मज बोलवील दयानिधी ॥ १४७

या रामायणांत युद्धकांडाचा च फार विस्तार केला आहे. श्रीसमर्थांना युद्धकांड फार आवडत असे. सुंदरकांडांत मारुतीचा पराक्रम आहे ह्मणून व युद्धकांड आवडतें ह्मणून श्रीसमर्थांनीं हीं दोन च कांडें वर्णिलीं आहेत.

लक्ष्मणाला शक्ति लागून लक्ष्मण पडले असतां मारुतिरायांनीं औषधी आणून लक्ष्मणाला जीवदान दिलें, त्या प्रसंगीं प्रत्यक्ष राम आपल्या दासाची स्तुति करितात :—

मारुती रघुनाथजी सुखरूप पूर्ण हे भेटले ।
वानरीं जयकार कीं भुभुकार सर्व हि दाटले ।
पावना पवनात्मजा निज लक्ष्मणा जिवदान रे ।
ईश्वरा जगदीश्वरा तुज प्राण हें अभिधान रे ॥ यु. ४/५२

ही स्तुति ऐकून मारुतीला मात्र गर्व झाला नाहीं. त्यांनीं कांहीं बोलून दाखविलें नाहीं, पण सारखी दृष्टि प्रभूच्या चरणाकडे होती, यावरून हा प्रभुचरणाचा प्रताप होय असें त्यांनीं सुचविलें.

सुमन मेघ हे वर्षती स्तुतिभाषणें किति दाटती ।
मारुती प्रभुअंघ्रि लक्षुनि मौनगर्भ करी स्तुती ।
स्वामिच्या पदविक्रमें सकळीक कार्य घडूनि ये ।
हे चि खूण हरीजनाप्रति मीपणांत पडों नये ॥ यु. ४/५३

अशा एकनिष्ठ सेवकाला काय बक्षिस द्यावें हें श्रीरामाला मोठें कोडें पडलें. जानकीमातेनें मोठ्या प्रेमानें नवरत्नमाळा दिली तिची मारुतींनीं काय वाट लावली ती सर्वांस ठाऊक च आहे. मग आतां, मारुतिराया, तुझें उत्तीर्ण कसें व्हावें असें रामांनीं विचारल्यावरून मारुति ह्मणतातः—

**सर्व तूं तुजमाजि सर्व हि देव भक्तपरंपरा ।**
**आत्मया परमात्मया मज स्वामि तूं सचराचरा ।**
**कांहिं ही न कळे मला गुणनामकीर्तन दे मनीं ।**
**नवविधा निजप्रेम जीवन ध्यान पूर्ण जनीं वनीं ॥** यु. ६/६५

असे अनेक प्रसंग युद्धकांडांत आहेत आणि ह्मणून च तें श्रीसमर्थांना फार आवडे. वारंवार युद्धकांड वाचीत जा अशी त्यांची आज्ञा आहे.

**रामदाससमर्थ श्रीगुरु संत सज्जन तोषले ।**
**युद्धकांड अखंड वाचित राहें ह्मणउनि बोलिले ।**
**सप्त कांड अनुक्रमें आह्मि सर्वदां श्रवणें करूं ।**
**वेणिस्वामि गिरीवरी बहु तुष्टमान जगद्गुरु ॥** यु. ८/८१

## ( ३७ ) सुंदररामायण

श्लोक ७४९ वृत्त–दोधक

रामायण च, पण लवकुश गात आहेत.

**रामकथा हे लवकुश गाती । सुरमुनि चकित ते पाहताती ।**
**रामरुपें स्वरुपें दिसताती । कोण कुमार प्रभु ह्मणताती ॥** ३/१२४
**काय अपूर्व हें गायन यांचें । रामरुपें चि स्वरूप जयांचें ।**
**कोण जनक निजस्थान तयांचें । उत्कट तप वाल्मिकसखयाचें ॥** ३/१२५

असें हें रामायण गिरिधरांनीं वर्णिलें आहे; पण त्याचें सर्व श्रेय श्रीसद्गुरुचरणाकडे दिलें आहे.

**रामदास प्रभु स्वामि समर्थें । रामायण कथिलें हें यथार्थें ।**
**वेणिस्वामिपदीं सुखस्वार्थें । गिरिधर संतपदीं परमार्थें ॥** १२/५२

## ( ३८ ) संकेतरामायण

ओवी ६७४१

गिरिधरांच्या सर्व ग्रन्थांत हा ग्रन्थ मोठा आहे. त्यांच्या सर्व रामायणांत मला हें रामायण फार आवडतें. कथेंत गोडी आहे आणि भाषेंत हि गोडी आहे. पहिल्या सहा कांडांची भाषा शेवटच्या कांडाच्या भाषेहून निराळी दिसते. वेणाबाईच्या सीतास्वयंवराची जी भाषापद्धति, ती पहिल्या सहा कांडांत दिसते व उत्तरकांडाची भाषा श्रीसमर्थप्रताप किंवा निवृत्तिराम ग्रन्थांसारखी दिसते, बालकांडाच्या तिसऱ्या सर्गांत सद्गुरुस्तवन

आहे, त्यांत श्रीसमर्थांना च फक्त नमन केलें आहे. पहिल्या सहा कांडांची भाषा, खरोखर, फार गोड आहे. श्रीदासबोधाच्या ओवींत जें माधुर्य आहे तें च या ओवींत आहे. इत्यादि कारणांवरून मला असें वाटतें, कीं पहिलीं सहा कांडें वेणाबाईकृत व शेवटचें गिरिधरकृत असावें. अशी माझी कल्पना आहे, ती खरी कां खोटी याचा निर्णय केव्हां-तरी होईल. तथापि ग्रन्थ एकट्या नातवाचा स्वसंपादित असो किंवा वडिलार्जिताचें त्याला पाठबळ असो, त्यांत तिसऱ्या कोणाचा संबंध नाहीं, इतकें खचित. आपण त्याला वेणीगिरिधरांचा ग्रन्थ असें ह्मणूं.

सदरहु ग्रन्थ शके १६४४ त गिरिधरांनीं गोदातीरीं संपूर्ण केला, असें उत्तरकांडांत त्यांनीं ह्मटलें आहे. त्या च ठिकाणीं गिरिधरकृत बाकीच्या रामायणांचा उल्लेख आला आहे, त्यावरून तीं रामायणें संकेतरामायणांतील उत्तरकांडाच्या पूर्वींचीं होत, असें स्पष्ट होतें.

या ग्रन्थांत बालकांडाचे २२, अयोध्याकांडाचे १९, अरण्यकांडाचे २०, किष्किंधाकांडाचे १६, सुंदरकांडाचे १४, युद्धकांडाच्या पूर्वार्धाचे ३५ व उत्तरार्धाचे २७ आणि उत्तरकांडाचे ३५ असे एकंदर १८८ सर्ग आहेत.

श्रीरामकथा गिरिधरांनीं वारंवार गायिली आहे, त्याचें एक कारण मागें सांगितलें च आहे. दुसरें असें कीं, पुष्कळ कथा आहेत पण त्यांत रामकथेची बरोबरी कोणाला च होणार नाहीं.

**नाना सकाम कथा सृष्टीवरी । रामकथेची न पवती सरी ।**
**कां जे आत्माराम चराचरीं । तारक ब्रह्म सर्वत्र हें ॥ १८ [१]**
**शिवकंठींचा अग्नि विझविला । ब्रह्महत्यारा कवि आदि केला ।**
**त्रैलोक्य तेणें पावन जाला । शतकोटी रामायणें ॥ १९ ॥**
**आदिकाव्य हें रामायण । जैं नव्हतें कोणाचें आख्यान ।**
**नाना पुराणें माहात्म्यकथन । शास्त्रसिद्धांत रामायणीं ॥ २० ॥**

अशी ही कथा प्रथम ब्रह्मदेवानें नारदाला, नारदानें वाल्मीकीला व वाल्मीकीनें ऋषींना सांगितली. तिचा मूळ विस्तार शतकोटी होता, तो शंकरानें तिन्ही लोकांस वाटून दिला.

**शतकोटी ग्रन्थ श्रवण करी । ऐसा कोण हो सृष्टीवरी ।**
**संकेतमात्रें कैलासशिखरीं । बोलिलें तें चि ऐकावें ॥ १३ [४]**

ती कथा वेणीगिरिधरांनीं आधीं च संकेतमात्र सांगितली आहे आणि आतां आपणांस तिचा हि संक्षेप करावयाचा आहे. अशा स्थितींत साद्यन्त कथा

क्रमशः न सांगतां कांहीं निवडक प्रसंग वाचकांस सादर करणें, एवढें च शक्य आहे.

( १ ) मखरक्षणासाठीं विश्वामित्र रामाला मागावयास दशरथाकडे आले व पुष्कळ होय नाहीं होऊन अखेरीस रामलक्ष्मणांना विश्वामित्राबरोबर देण्याचें ठरलें, तेव्हां राम आईची आज्ञा मागावयास गेले असतां ह्मणतात:-

ब्राह्मणाच्या कार्याकारणें । अवतार घेतले नारायणें ।
ह्मणोनि माये आज्ञा देणें । द्विजां रक्षणें उचित ॥ १$\frac{९}{२२}$
देव ब्राह्मण अग्निपूजनें । नाना योग याग व्रतें दानें ।
नाना तपें तीर्थाटणें । माते रक्षणें उचित ॥ २३ ॥
नाना पुरश्चरणें अनुष्ठानें । नाना योग नाना साधनें ।
आत्मचिंतनें स्वानंदभुवनें । स्वधर्म रक्षणें उचित ॥ २४ ॥
ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण जेथें । सर्व सांडोनि धांवणें तेथें ।
नाना वैष्णवी माया भक्तजनातें । झणीं बाधील ह्मणूनियां ॥ २५ ॥
नाना षट्कर्मं चालती जनीं । विध्योक्त क्रिया आचरती मनीं ।
ब्रह्मसंपन्न स्वानंदभुवनीं । नवविधा भजनीं तत्पर ॥ २६ ॥
निःकामभजनें सर्वस्वत्याग । मजनिमित्य मांडिती योग याग ।
आत्मचिंतनें भवस्वर्गभोग । तुच्छ कारिती स्वानंदें ॥ २७ ॥
ऐसे योगी दुर्लभ जगीं । धुंडित चालिले वीतरागी ।
ऐसयाकारणें मजलागीं । अवतार घेणें निर्धारें ॥ २८ ॥
पूर्वी सूतिकागृहीं दिधलें दर्शन । माते तुजला असेल स्मरण ।
सुरसाधुधर्मधरारक्षण । करावया मी अवतरलों ॥ २९ ॥
एवं धर्मस्थापनाकारणें मातें । रायें दिधलें मखरक्षणातें ।
अग्नि ब्राह्मण आमुचीं दैवतें । आज्ञा देईं सिद्धाश्रमा ॥ ३० ॥

( २ ) अहल्या शिळा होऊन पडली होती, पण तिचा श्रीरामचरण-स्पर्शानें उद्धार होण्याची वेळ जवळ येत चालली तेव्हां ती गौतमभार्या अगदीं उतावीळ होऊन करुणा भाकते:—

ह्मणे देवा कैं तूं येशील । कैं तूं आतां भेटी देशील ।
आपुल्या पदा कैं तूं नेशील । थोर आपदा चिरकाळें ॥ १$\frac{११}{१३}$ ॥
तूं जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं । ऐसी वदे समर्थवाणी ।
तरी कां नव्हे माझी धांवणी । जगदानंदा जगद्गुरु ॥ १४ ॥
आत्माराम ह्मणती तूते । तरी कां दर्शन नव्हे मातें ।
भवितव्य भाविनि विधिकर्ममतें । संचित प्रारब्ध कुमरिला ॥ १५

**मी भ्रमें जाल्यें जड मूढ शिळा । परी तूं जीवींचा जिव्हाळा ।**
**चरणप्रताप दावीं अवलीळा । कीर्ति गाजो त्रैलोक्यीं ॥ १६ ॥**

अशी च आतुरता श्रीसद्गुरुदर्शनाविषयीं झाली ह्मणजे श्रीराम अहल्येला जसे भेटले तसे श्रीसद्गुरु भाविकांला भेटतील. श्रीरामचरणकमलाचा स्पर्श होतां च

**तात्काळ अहल्या लागली रामपायीं । ह्मणे माझे श्रीराम आई ।**
**इतुके दिवस कवणे ठायीं । विगुंतलीस जननिये ॥ १ ११/२०**
**कैलासीं शंकरें गोविलीस । सुटका जालिया धांवलीस ।**
**राम माउली सावकाश । आतां न विसंबे हृदयांतुनी ॥ १ ११/२२**

आणि अहल्या श्रीरामोपासकांस आशीर्वाद देते कीं,

**पवित्र चरणाची प्रचित मातें । ऐसी च हो कां सद्भाविकांतें ।**
**भवस्वर्गकाम भक्तांतें । स्वप्नीं तो हि न लिंपो ॥ १ ११/२३**
**आत्मारामउपासना । सद्गुरुकृपें लाधो जना ॥** वगैरे.

( ३ ) बालकांडाच्या तिसऱ्या सर्गांत जें सद्गुरुस्तवन केलेलें आहे तें पूर्वीं श्रीरामदासी ग्रन्थमालेंतील दुसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत दिलेलें आहे. श्रीसद्गुरुमूर्ति हृदयांत अचल ठेवून ग्रन्थरचना झालेली असल्यामुळें ग्रन्थांत सर्वत्र श्रीसद्गुरुरूप दृग्गोचर होत आहे. तथापि अयोध्याकांडाचे आरंभीं सद्गुरुस्तवन केलें आहे तें असें:—

**भावें नमस्कारिला जगद्गुरु । रूप पाहातां परात्परु ।**
**निर्मळ निश्चळ निराकारु । नामारूपावेगळा ॥ २ १/३ ॥**
**सर्वात्माराम सर्वांतरीं । अवतार घेउनी गोदातीरीं ।**
**ब्रह्मचर्यें सचराचरीं । वैराग्ययोगें विचरला ॥ ४ ॥**
**जैसें रघोत्तमें शरयुतीरीं । उत्पन्न होउनी गोदातीरीं ।**
**वास केला वल्कलांबरीं । तैसें चि कृष्णातीरीं समर्थें ॥ ५ ॥**
**कृष्णातीरस्थ नाम साजे । रघुनाथकीर्ति जेथूनि गाजे ।**
**जयाच्या तीव्र वैराग्यें झिजे । हृदय तापसाचें ॥ ६ ॥**
**ज्याचें ज्ञान शबलचैतन्याविहीन । चौदा ब्रह्में सिद्धांत करून ।**
**अनिर्वाच्य ब्रह्म खरें स्थापून । विमळ परंपरा चालविली ॥ ७ ॥**
**श्रीरामसद्गुरुउपासना । सगुणगुणें गुणसंपन्ना ।**
**पाहतां निर्गुण निरंजना । पैलिकडे आहे हो ॥ ८ ॥**
**जरी तेथवरी पाहत जाऊं । तरी मग गुण कैंचे गाऊं ।**
**याकारणें तें लपऊं । रूप उपासनेचें ॥ ९ ॥**

कशी आहे गोडी ! कशी आहे उपासना आणि गुरुभक्ति !

( ४ ) अयोध्येच्या लोकांना श्रीराम किती प्रिय झाले होते व त्यांच्या मनाला श्रीरामाचा च कसा छंद लागला होता याचें वर्णन गिरिधरांनीं ह्मणा किंवा वेणाबाईनीं ह्मणा, फार प्रेमळ केलें आहे. उतारे जरा मोठमोठें होत आहेत खरे, परंतु कांहीं इलाज नाहीं; वाचकांनीं क्षमा केली पाहिजे. अयोध्येच्या लोकांना श्रीरामाचा जसा ध्यास लागला होता, तसा आपणास लागावा, तर च या सांप्रदायाची दीक्षा घ्यावी व श्रीरामदासी बाणा प्रगट करावा.

राम सकळांसी व्हावा । राम सकळांचा विसांवा ।
राम सकळांनीं चिंतावा । राम ध्यावा जनांनीं ॥ २-२/६
घरीं क्रमेना क्षणभरीं । अन्य न भावे अंतरीं ।
तिष्ठत उभीं राजद्वारीं । राम पाहों ह्मणोनियां ॥ ७ ॥
बाळ तारुण्य आणि वृद्ध । सकळां लागला रूपवेध ।
जेथें तेथें बोध प्रबोध । जय जय राम होतसे ॥ ८ ॥
जिकडे तिकडे राम राम । गल्लोगल्लीनें राम राम ।
बिदीं बाजारीं राम राम । पूर्णकाम चिंतिती ॥ ९ ॥
जातां येतां राम राम । काम करितां राम राम ।
सर्वांचा तो अंतर्याम । ह्मणोनि राम चिंतिती ॥ १० ॥
खातां जेवितां राम राम । उठतां बैसतां राम राम ।
अशनीं शयनीं राम राम । मंगळधाम चिंतिती ॥ ११ ॥
मंगळमंगळ राम राम । महामंगळ राम राम ।
निर्मळ माझा आत्माराम । जय जय राम होतसे ॥ १२ ॥
ह्मणती शिवाचे हृदयींचा । ह्मणती जप हा पार्वतीचा ।
साहाकारी हा सुरांचा । मनुष्यवेषें देखिला ॥ १७ ॥
कोण भाग्य हो आमुचें । थोर पुण्य पूर्वजांचें ।
कोण सुकृत सांचिलें साचें । रूप रामाचें देखिलें ॥ १८ ॥

(५) श्रीसमर्थांच्या शिष्यांचा हि अधिकार केवढा होता हें या उताऱ्यांवरून व्यक्त होत आहे. इतकें रामदास्य आंगीं बाणावें तेव्हां सद्गुरुकृपेची अपेक्षा करावी. शंकरानें रामाचा सारखा ध्यास घेतला होता, याचें पार्वतीस मोठें नवल वाटे ! इतरांसारखा च पंचभूतात्मक देहाचा राम एक राजा आहे, तेव्हां त्याचा आपण इतका गौरव करून त्याला परब्रह्मपदाला चढवावें हें मोठें आश्चर्य आहे, असा प्रश्न पार्वतीनें केल्यावरून रामाचे गुण वर्णन करून शंकर ह्मणतात:–

ऐसा राम माझा प्रिये । काय सांगों अभिप्राय ।
आत्मारामेंसीं तुळितां न ये । तुळणा कोठें पार्वती ॥ ९ ३/७ ॥
म्हणसी ब्रह्मांडामध्यें देखिला । तो काय तुम्ही परात्पर लेखिला ।
ऐसें म्हणसी तरी वोळखिला । नाहीं च तुवां श्रीराम ॥ ८ ॥
गगनाभ्रमंडळीं सूर्य असे । परी तो तया समभावें नसे ।
तैसा राम ब्रह्मांडीं च भासे । परी तो सर्वां आगळा ॥ ९ ॥
सर्वां आगळा म्हणोनि ध्यातों । नाहीं तरी मी केवीं गातों ।
न जाणतां मी भजन करितों । हें अघटित मम प्रिये ॥ १० ॥
तुम्ही अवघीं मायामोहित । जऱ्ही जाला सुखानंदभरित ।
तरी रामसुखाचें कण अमृत । त्याची सरी न पावाल ॥ १३ ॥
तुम्ही मायेमधील सकळ । तैसे चि मायावी सीतळ ।
तेणें कैसा हळाहळ । शांत होतो तुमच्यानीं ॥ १४ ॥
मायातीताचें जें नाम । तेणें जाला मज आराम ।
ऐसा माझा आत्माराम । वाचें केवीं बोलवे ॥ १५ ॥
जो माझ्या रामा जाणता । तो राम चि होय तत्त्वता ।
राम होऊनि कथा वार्ता । रामाच्या चि सांगतसे ॥ १६ ॥

म्हणून गिरिधरांनीं रामकथा इतक्या वेळां गायिल्या आहेत.

( ६ ) अशा सर्वगुणसंपन्न रामाला राज्याभिषेक होण्याची वेळ आली, तेव्हां बंदिवासांत पडलेले सारे देव चिंताग्रस्त झाले.

कोण सोहळा अयोध्येचा । प्राण जातसे रे आमुचा ।
तेतीस कोटी सुरवरांचा । संहार होतो आजिच्यानीं ॥ २ ६/११

अशी देवांना चिंता पडली, तेव्हां मग मंथरेनें कैकेयीच्या मार्फत देवांच्या कार्यासाठीं श्रीरामाला वनवासास कसें पाठविलें ही कथा सर्वांस ठाऊक च आहे. कैकेयीच्या वचनाला गुंतून दशरथ राजा विव्हल झाला. भार्येच्या नादीं लागल्यामुळें आपणांस राम अंतरला म्हणून दशरथ लोकांस उपदेश करितात:—

कामाकरितां कैकेयी केली । रामावरी हे उठावली ।
तरी च भक्तजनीं भूमंडळीं । कांता सकळीं निंदिली ॥ १ ६/२१
अरे ज्यासी राम व्हावा । तेणें कांतासंग त्यागावा ।
स्त्रीहत्येचा दोष घ्यावा । परी राम धरावा हृदयकमळीं ॥ २२ ॥

रामवियोग सहन न होऊन राम राम करीत दशरथानें देहत्याग केला ! रामस्मरणांत देहभाव नष्ट व्हावा म्हणतात; पण दशरथानें प्रत्यक्ष देह च श्रीरामावरून ओवाळून टाकला.

राम ह्मणतां देहभाव जावा । तें चि घडलें त्यास देवा ।
राया दशरथानें जीवा । जयजयरामें वोवाळिलें ॥ ३ २/२३
तात्पर्य रामवियोग सहन करण्यापेक्षां देहपात झालेला पत्करिला; पण देह-रक्षण करणें च असेल तर तो देह लक्ष्मणाप्रमाणें श्रीरामसेवेंत झिजवावा.

किंवा देह असतां भजन । करावें गुणानुवादकीर्तन ।
कीं बरव्या रीतीनें पूजन । लक्ष्मणासारिखें करावें ॥ २४ ॥
पण प्रत्यक्ष श्रीरामसेवा करण्याचें भाग्य सर्वांचें थोडें च आहे, अशा स्थितींत प्रतिमापूजन करून असावें.

सकळांसी कैंचें श्रीरामअर्चन । तरी करावें प्रतिमापूजन ।
तेथें ठेऊनि अंतःकरण । चापपाणी चिंतावा ॥ २५ ॥
आणि प्रत्यक्ष राम भेटणार च नाहीं असें तरी कां ह्मणतां ?

ज्याचे हातीं धनुष्यबाण । तो चि राम हें प्रमाण ।
येकपत्नी येकवचन । राम माझा तो चि तो ॥ २६ ॥

( ७ ) श्रीसमर्थांचा " आत्माराम " ग्रन्थ इतरत्र छापलेला आहे, आपल्या मालेंत तो मुळावरून अजून छापावयाचा आहे. वीस दशकांचा बोध करून हि जेव्हां कांहीं शिष्य कोरडे च पाहिले तेव्हां त्यांच्यासाठीं " आत्माराम " ग्रन्थ श्रीसमर्थांनीं सांगितला. आत्मारामाला दुसरी उपमा नाहीं इतका अप्रतिम तो ग्रन्थ आहे. त्यांत श्रीसमर्थ शिष्याला ह्मणाले, मी तुजजवळ एक गोष्ट मागतों, ती जर तूं मला देशील तर मी तुला सस्वरूपाची ओळख करून देईन. त्यावर शिष्य फारसा विचार न करितां ह्मणाला, ठीक आहे, मागा, मागाल तें देतों. सद्गुरु ह्मणाले, तुझें जीवपण मला दे. शिष्य ह्मणाला, दिलें. मग मी हि तुला निजपद दिलें असें सद्गुरु ह्मणाले. जीवपण दिलें ह्मणणें सोपें आहे, पण खरोखर कोणी देतो कां ? जो देतो त्याला निजपदाची प्राप्ति हि पण होते. तात्पर्य काय, आपण आपला वेगळेपणा सर्वस्वीं श्रीचरणीं अर्पण केला पाहिजे. आपलें ह्मणून वेगळें आपणाजवळ कांहीं उरलें न पाहिजे. जें कांहीं आहे तें सारें श्रीरामदासार्पण झालें पाहिजे. तसें वेणाबाईनीं केलें होतें, गिरिधरांनीं हि केलें होतें.

अभेद भजन देवें सांगितलें । त्यागार्थ जीवपण मागितलें ।
सद्गुरुनाथें निरोपिलें । आत्मयारामीं ॥ ३,१/१४
सद्गुरुपदीं जीवपण दिधलें । स्वामी ह्मणती निजपद लाधलें ।
त्याउपरी म्यां जीवपण आपुलें । मानिलें चि नाहीं ॥ १५ ॥

(८) पंचवटीस श्रीराम असतांना एकदा लक्ष्मणाचें येणें सहज कृष्णातीरापर्यंत झालें होतें. चंद्रगिरीच्या डोंगरावर लक्ष्मणाचा कांहीं काळ वास झाला, तेव्हां तेथून चांफळखोरें त्याच्या नजरेस पडलें होतें. चांफळखोऱ्याची शोभा पाहून तें स्थान लक्ष्मणाला फार आवडलें व परत पंचवटीस गेल्यावर त्या ठिकाणाबद्दल श्रीरामाजवळ लक्ष्मणानें गोष्ट काढली. पुढें दक्षिणेकडे जाण्यास श्रीराम निघाले तेव्हां त्यांनीं तें स्थळ प्रत्यक्ष पाहिलें व येथें आपण कलियुगीं वास करूं ह्मणून ह्मटलें होतें.

त्रेतायुगींची सत्यकल्पना। कलयुगीं प्रत्यक्ष होईल जना।
गुप्त प्रगट सामर्थ्यें नाना। संत सज्जन अवलोकिती ॥ ३ $\frac{१२}{२२}$

याची प्रतीति शालिवाहनाच्या सोळाव्या शतकांत महाराष्ट्रास आली.

पंचक्रोशीं कृष्णातीरीं। पाहोनि घ्यावें चराचरीं।
जो कां उदास गिरिकंदरीं। सद्गुरुनाथ समर्थ ॥ ३ $\frac{१४}{२३}$

समर्थ सद्गुरु अवतारमूर्ति। रामें सांगितलें ऋषीप्रति।
प्रत्यक्ष अनुभवा येईल प्रचीति। आत्माराम जगद्गुरु ॥ २४ ॥

(९) सात हि कांडांत एकाद्याला सुंदरकांड च फार आवडलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं. अशा त्या सुंदरकांडाला आरंभ करतांना वेणीगिरिधरांनीं श्रीसद्गुरुसमर्थांना जें नमन केलें आहेतें अप्रतिम आहे. त्यांत सद्गुरूचें सामर्थ्य व सच्छिष्याची निष्ठा हीं दोन्ही व्यक्त होत आहेत. तें नमन वाचून ज्याचें मन श्रीगुरुचरणीं जडणार नाहीं असा वाचक विरळा !

दया समर्थ सद्गुरूची। जेणें दिधली समाधिरुचि।
जीवन्मुक्त दशा कैंची। समर्थस्वामीवांचूनियां ॥ ५ $\frac{१}{१६}$
समर्थ श्रीगुरु तरणोपाय। सद्भाविकाचें मोक्षठाय।
तयावीण करूं काय। नाना उपाय शब्दाचे ॥ १७ ॥
शब्दातीत स्वामी माझा। जो योगियां योगिराजा।
राजयोगींद्र महाराजा। सहजीं सहजा जगद्गुरु ॥ १८ ॥
अलभ्य लाभला सद्गुरुसंग। सांगे तेथील कथाप्रसंग।
शुकादिकांचा सारिला संग। विदेहरूपें गुरुराजें ॥ २१ ॥
अहं आत्मा हा वृत्तिसंग। हा चि केला संगभंग।
मग नवविधा भक्तिरंग। रंग श्रीरंग गुरुदेव सांगे ॥ २२ ॥
चापपाणीचें रूपडें। दाऊनि दिल्हें वाडेंकोडें।
वर्णीं वर्णीं रे पवाडे। स्वरूप रूपडें रामाचें ॥ २३ ॥

**आज्ञा प्रमाण जी प्रमाण । कोण करील अप्रमाण ।**
**करीन गुणानुवादन कीर्तन । परमानंदें गुरुकृपें ॥ २४ ॥**
**ऐसें सद्गुरुदेवाजवळी । बोलिलों ऊर्ध्वमूळवृक्षातळीं ।**
**पुढें कृपासरितोदकें झळाळी । वेणी त्रिवेणी ते चि हो ॥२५॥**
**तेथें मंचकीं सहजासन । विमळ डोळां देखिलें ध्यान ।**
**ह्मणाल सगुण कीं निर्गुण ध्यान । अनुसंधान दोन्ही हो ॥२६॥**
**समर्थ सद्गुरु निरंजन । जेणें वारिले अवघे जन ।**
**येकपणें विराजमान । भक्तजनसंकीर्तनीं ॥ २७ ॥**
**गुरुआज्ञें भगवत्कथा रामायणी । गाऊं आतां ऐका श्रवणीं ।**
**श्रोते वक्ते संतसज्जनीं । जय जय वाणीं वंदिले ॥ २८ ॥**

( १० ) सुंदर आणि युद्ध या दोन कांडांत मारुतीचा प्रताप फार वर्णिला आहे. श्रीरामाला मारुतीचें सहाय न होतें तर श्रीरामकार्य शेवटास कसें गेलें असतें कोण जाणे ! असें तुह्मां आह्मांला च वाटतें असें नव्हे, तर त्या वेळीं हि सर्वांना वाटलें. एकदां असें झालें, कीं अहिमहिरावण पाताळांतून लंकेंत रावणाच्या समाचारास आले. श्रीरामलक्ष्मण हे आपल्या चिंतेला कारण होत, असें रावणानें त्यांना सांगितलें. तेव्हां श्रीरामलक्ष्मण निद्रिस्थ असतां त्यांना अहिमहीनें पाताळांत नेलें. तेथें त्या उभयतांचा शक्तीला बळी द्यावा असा त्यांचा विचार होता; तों च मारुतीराय हि तेथें पातले. इकडे वानरदळांत हाहाःकार झाला ! पुन्हां आपणांस श्रीराम कसे भेटतील व देवकार्य शेवटास कसें जाईल याची चिंता सर्वांस वाटूं लागली. नंतर पाताळांत अहिमहीचा संहार करून मारुतीनें श्रीरामलक्ष्मणांना सुखरूप परत आणलें, वगैरे मनोहर कथाभाग वेणीगिरिधरांनीं वर्णिला आहे. कित्येक ह्मणतील कीं ही कथा वाल्मीकींत नाहीं ती गिरिधरांनीं कोठून आणली ? त्याचें उत्तर वेणीगिरिधर देतात, कीं श्रीरामचरित्र शतकोटी आहे, त्याचा पार कोणास कळणार आहे ? ज्यांना शंका असेल त्यांनीं अग्निपुराण, ब्रह्मांडपुराण, स्कंदपुराण, पद्मपुराण, हनुमन्नाटक इत्यादि ग्रन्थ पाहावे, ह्मणजे त्यांची खात्री होईल कीं, जेथें जेथें वाल्मीकीहून कांहीं भिन्न कथा वेणीगिरिधरांनीं वर्णिल्या आहेत, त्या आधारावांचून नाहींत.

**आर्ष रामायणीं कथा नाहीं । ह्मणोन संदेह न धरणें पाहीं ।**
**शतकोटीचा पार कांहीं । कळत नाहीं निर्धारें ॥ ७ ३१/२**
**अनंत युगीं अनंत अवतार । धर्मस्थापनेचा विचार ।**
**अनंताचा अनंत पार । पाहातां अपार पार नाहीं ॥ ७ ३१/१५**

असो; श्रीरामलक्ष्मण सुखरूप आलेले पाहून सर्वांना आनंद झाला व सर्व-
जण मारुतीचा धन्यवाद गाऊं लागले.

नमस्कारिती वेळोवेळां । राजाराम देखती डोळां ।
ह्मणती मारुति आमुचा सर्वांगळा । केवढें कार्य केलें हो ॥ ६$\frac{३}{१३}$

मारुतीचरणीं विश्वास धरी । त्यासी श्रीराम भेटेल निर्धारीं ।
सद्यप्रचीत साक्षात्कारीं । विलंबू न लगे ॥ १४ ॥
बिभीषण ह्मणे रे शोकहरण । तुवां भेटविला सीतारमण ।
नाहीं तरी हा सुरशत्रु रावण । मूळ निर्मूळ करिता रे ॥ १५ ॥
जांबुवंत ह्मणे रे त्रिपुरारि । तुवां भेटविला रावणारि ।
नाहीं तरी हे आमुची बोहरी । जाली होती लंकेसी ॥ १७ ॥
अंगद ह्मणे रे वज्रतनु । तुवां भेटविला आनंदघनु ।
नाहीं तरी हें आवघें सैन्यु । पडलें होतें आवर्ती ॥ १८ ॥
शरभ ह्मणे रे बलभीमा । तुवां भेटविलें श्रीरामा ।
नाहीं तरी हा रावण आह्मा । देशधडी करता रे ॥ २१ ॥
ऋषभ ह्मणे रे महारुद्रा । तुवां भेटविलें श्रीरामचंद्रा ।
नाहीं तरी या दुःखसमुद्रा । कैशीं आह्मी तरतों रे ॥ २२ ॥
विनत ह्मणे रे वायोतनया । तुवां भेटविलें श्रीरामराया ।
नाहीं तरी या दुर्धर भया । पासूनि कैशीं सुटतों रे ॥ २३ ॥
कुमोद ह्मणे रे हनुमाना । तुवां भेटविलें सीतारमणा ।
नाहीं तरी हा सुरशत्रु जाणा । कंदन आमुचें करिता रे ॥२४॥
गज ह्मणे रे महाबळी । तुवां दाविला श्रीराम डोळीं ।
नाहीं तरी हे कपिहोळी । जाली होती लंकेसी ॥ २६ ॥
ऐसे ऋक्ष वानर देवावतार स्तविती । मारुतिमनीं श्रीराममूर्ति ।
ह्मणे काय बोलता तुह्मी जुत्पति । सर्व प्रताप स्वामींचा ॥२९॥

( ११ ) असे उतारे आपण देत बसलों तर प्रस्तावनेचा शेवट च कधीं येणार नाहीं. आतांपर्यंत जे उतारे आले आहेत त्यांवरून हें रामायण फार सुरस आहे, तें आपण साद्यन्त श्रवण करावें, अशी वाचकांस इच्छा झाल्यावांचून राहणार नाहीं, असें मला वाटतें. हें रामायण सामान्य नव्हे, त्याचा वक्ता प्रत्यक्ष श्रीहनुमान होय !

श्रीरामनवमीसी स्वप्न देखिलें । घननील सांवळें स्वरूप प्रगटलें ।
श्रीरामदेव्हारां कपींद्ररूप पाहिलें । देखोन नमन केलें साष्टांग ॥ ७$\frac{३५}{१८}$

हास्यवदन देखून मजकारणें। सुदंत झळकले सीत कीर्णें।
नेत्रीं प्रेमाश्रु गळती निर्मळपणें। तीर्थें ह्मणूनियां स्वीकारिले ॥ १९ ॥
वाल्मीकि श्लोक बोलत आहे। विद्युत्पुंज्य स्वरूप पाहे।
कटिप्रदेशीं झळकताहे। पुछ लंबायमानें हो ॥ २० ॥
सत्य जाणून स्वप्नकथा। निवेदिली श्रीगुरुसमर्था।
समर्थ ह्मणती श्रीहनुमान तत्त्वता। प्राणरूपें त्वरिता भेटला तुज ॥
मग प्राणनाथें रामायणें केलीं। वगैरे.

असें हें रामायण कधीं काळीं छापलें जाऊन तें प्रत्येकाच्या हातीं पडावयास नको काय ?

## ( ३९ ) निवृत्तिराम

ओवी २०१६

हा ग्रन्थ फार च महत्त्वाचा आहे. श्रीमत् दासबोधांतील उपदेशाचा आपणांस अनुभव येऊन आपली निवृत्ति कसकशी झाली तीं श्रीसमर्थांच्या आज्ञेनें गिरिधर सांगत आहेत.

समर्थकृपेनें निवृत्ति जाली। समर्थदेवें आज्ञा केली।
कैशी कैशी निवृत्ति बाणली। समर्थ मुखें बोलविती ॥ ४/३७

या ग्रन्थाचे बावीस समास आहेत. पहिल्या समासांत श्रीसमर्थआख्यान, दुसऱ्यांत गुरुकृपास्तवन, तिसऱ्यांत ब्रह्मानुभव व चवथ्यांत ग्रन्थानुभव सांगून पुढें मनमाया, अहंमाया, अहंममता, भक्ति, ज्ञान, वैराग्य, भवोपसर्ग, संकल्प, प्रपंच, अभ्यास, स्वर्गकाम, ब्रह्मगोळ, सृष्टिक्रम, भेदाभेद, प्रत्यक्ष ग्रन्थराज, मूळमाया, पंचीकरण, सर्व सिद्धांत, इत्यादि सर्व गोष्टी पूर्वपक्षांत च कशा येतात व त्या सर्वांची निवृत्ति होऊन "निखिळ परब्रह्म केवळ निर्गुण" कसें उरतें तें स्पष्ट करून दाखविलें आहे. हा विषय च असा कांहीं गुप्त आहे कीं, तो कळला तरी सांगतां येत नाहीं व न कळला तर मग नाहीं च नाहीं सांगतां येत.

कळलें पण काय कळलें। काय कळलें तें न कळलें।
न कळोनि तें कळलें। कांहींयेक निज गुह्य ॥ ५/२०

असें तें कांहींयेक निज गुह्य आहे; तें आपणांस कळलें असें जो ह्मणेल त्याला कळलें नाहीं ह्मणून समजावें. ह्मणे जाणता तो जनीं मूर्ख पाहे ॥

अकरा संख्येचा जास्त खुलासा या प्रकरणांत करूं ह्मणून मागें ह्मटलें होतें, तो खुलासा असा आहेः-

स्वामी आणि सेवक येक । वक्ते आणि श्रोते येक ।
सिद्ध आणि साधक येक । येकीं येक अकरा ॥ ३१/१८ ॥
पुरुष आणि प्रकृति येक । परब्रह्मीं ईश्वर येक ।
हरि हर दोनी मिळोनि येक । येकीं येक अकरा ॥ १९ ॥
शिवात्मा आणि जीवात्मा येक । निर्मळात्मा आणि परमात्मा येक ।
ब्रह्म आणि ब्रह्मांश येक । येकीं येक अकरा ॥ २० ॥
सद्गुरु आणि सच्छिष्य येक । देव आणि भक्त येक ।
रघुनाथजीपुढें बलभीम येक । येकीं येक अकरावां ॥ २१ ॥
अकरा अकरा उदंड असती । कांहीं निरोपिलें यथामति ।
रघुनाथजीपुढें मारुति । महारुद्र अकरावां ॥ २२ ॥

शेवटीं बाविसाव्या समासांत ग्रन्थाचा उपसंहार करितांना गिरिधरांनीं श्रीमत् दासबोधाचा गौरव केला आहे. गिरिधरांसारख्या साक्षात्कारी सांप्रदायिकांना च ग्रन्थराजाची योग्यता कळणार !

तरावया संसारसागरु । समर्थग्रंथ मुख्य तारुं ।
तेथील उपग्रंथ निवृत्तिविचारु । निवृत्तिराम या नांवें ॥ ३२/१७३
समर्थग्रंथ सहस्रकर । ज्ञानप्रकाशें महाथोर ।
तेथील उपग्रंथ ऐक्यकर । निवृत्तिराम या नांवें ॥ १७४ ॥
समर्थग्रंथमहाद्वारीं । द्वारपाळ असती ब्रह्मचारी ।
तेथील उपग्रंथ ऐक्यब्रह्मचारी । निवृत्तिराम या नांवें ॥१७५॥
समर्थग्रंथ मुख्य राजन्य । राजन्यापुढें उदंड प्रधान ।
तेथील उपग्रंथ ऐक्यप्रधान । निवृत्तिराम या नांवें ॥ १७६ ॥
समर्थग्रंथ परमहंस । भोंवते विचारवंत योगी तापस ।
तेथील उपग्रंथ ऐक्य तापस । निवृत्तिराम या नांवें ॥ १७७ ॥
समर्थग्रंथ सर्वसंन्यासी । तेथें उदंड षडंगन्यासी ।
तेथील उपग्रंथ ऐक्यसंन्यासी । निवृत्तिराम या नांवें ॥१७८॥
समर्थग्रंथ मुख्य ब्रह्मा । तेथें नारदादि पुत्रसमूहमहिमा ।
तेथील उपग्रंथ वशिष्ठनामा । निवृत्तिराम या नांवें ॥ १७९ ॥
समर्थग्रंथ महाविष्णु । व्यापकरूपें देव जिष्णु ।
तेथील उपग्रंथ पार्शद सहिष्णु । निवृत्तिराम या नांवें ॥१८०॥
समर्थग्रंथ सर्वेश्वर । पुढें सन्मुख नंदिकेश्वर ।
तेथील उपग्रंथ शिवगण मनोहर । निवृत्तिराम या नांवें ॥१८१॥

समर्थग्रंथ आत्माराम । पुढें उभा मारुति भीम ।
तेथील उपग्रंथ पेवय वैष्णव नाम। निवृत्तिराम या नांवें ॥१८२॥
समर्थग्रंथ निरोपमा । उपमा लाजिल्या मनोरमा ।
निवृत्तिरामग्रंथमहिमा । समर्थग्रंथीं विस्तारला ॥ १८३ ॥
समर्थग्रंथ स्वयंज्योति । तेथील प्रकाशें प्रकाशकीर्ति ।
निवृत्तिरामग्रंथ सत्कीर्ति । समर्थकृपें अनुभविला ॥ १८४ ॥
समर्थग्रंथ श्रीदासबोध । तेथूनि सर्व हि बोध प्रबोध ।
विमळ ज्ञान बाळबोध । सच्छिष्यासी बाणलें ॥ १८५ ॥
एवं श्रीदासबोध समर्थग्रंथ । तेथूनि सर्व हि परमार्थ ।
जाणती योगी संत महंत । ग्रन्थराज मुकुटमणी ॥ १८६ ॥

अशा त्या ग्रन्थराजाला व त्याचें यथार्थ स्वरूप अनुभवणाऱ्या गिरिधरादि संतांना शतशः प्रणिपात असोत !

## ( ४० ) श्रीसमर्थप्रताप

ओवी १३३२

प्रताप वदला रे वदला नवचे कोणा ॥ ध्रु० ॥

तथापि आपण प्रतापाचें गुणवर्णन करण्याचा प्रयत्न पुढें स्वतंत्र प्रकरणांत करूं.

## ( ४१ ) स्फुट कविता

श्लोक, पदें, इत्यादि सुमारें १५००

गणपति, सरस्वति, सद्गुरु, जनीजनार्दन, सर्व देव, सर्व शक्ति, इंद्र, चंद्र, मंगळ, ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य, पंच भूतें, राम, भक्ति, ज्ञान, वैराग्य, श्रीसमर्थ, वेणीस्वामी, सच्छिष्य, असच्छिष्य, गुरुमार्ग, मृत्यु, इत्यादि विषयांवर गिरिधरांचीं कांहीं पदें, कांहीं श्लोक, व कांहीं आरत्या आहेत. याशिवाय प्राकृत व्याकरणावर ८४ व संस्कृत व्याकरणावर २५ श्लोक आहेत. लोकस्वभावावर २३३ ओव्या आहेत. हिंदुस्थानी भाषेंत सीतास्वयंवर व कांहीं किरकोळ पदें व श्लोक आहेत. गणेश, शारदा व सद्गुरु यांच्यावर गिरिधरांनीं संस्कृत भाषेंत स्तोत्रें केलीं आहेत. याशिवाय त्यांनी कांहीं प्रासंगिक कविता हि आहे. या सर्व स्फुट कवितेपैकीं किती उतारे देऊं ?

**गुरुदेवें मज सांगितलें नाम । श्रीराम जयराम जयजयराम ॥**
असे त्रयोदशाक्षरी मंत्राचे तीन अभंग आहेत.

**किती मग्न जाला सतीकामसंगें । किती मग्न जाला रतीकामरंगें ।**
**कितीएक जंजाळ टाकूनि द्याया । चला रे चला रामनौमी पहाया ॥**
**किती लेक लेकी मुलें खेळवीता । किती शोकशोकींमध्यें मग्न होतां**
**किती शोधितां सर्व माईक माया । चला रे चला रामनौमी पहाया ॥**
असे बारा श्लोक व

**किती काय संसार हा वेर्थ वाया । किती काय लोकीक हा दंभ जाया ।**
**किती काय सूखास त्या मग्न होऊं । चला रे चला रामनौमीस जाऊं ॥**
**प्रपंचीक हें कृत्य मर्ता सरेना । वय जातसे वेर्थ धर्ता धरेना ।**
**तडातोडि हे सर्व वारूनि दाऊं । चला रे चला रामनौमीस जाऊं ॥**
असे तेरा श्लोक, मिळून पंचवीस श्लोक श्रीरामनवमीवर आहेत. किती उत्साह-जनक ही कविता आहे ! आज हि गिरिधरांची वाणी जिवंत भासते, मग त्या काळीं जेव्हां प्रत्यक्ष त्यांच्या मुखांतून निघून जनाच्या श्रवणीं पडत असेल तेव्हां हजारों लोक त्यांच्या भजनीं लागून श्रीरामनवमीस श्रीक्षेत्र चांफळास जात असतील, हें काय सांगावयास पाहिजे ? अशा सत्पुरुषांनीं व निष्ठावंत सांप्रदायिकांनीं या सांप्रदायाची अनन्य भावानें सेवा केली ह्मणून आज हि आपणांस तो सांप्रदाय स्फूर्तिदायक होत आहे.

गिरिधर वृद्ध झाले होते तरी देखील श्रीरामक्षेत्र चांफळ व श्रीदास-क्षेत्र सज्जनगड या दोन स्थळांच्या दर्शनाविषयीं त्यांची उत्कंठा यत्किंचित हि कमी झाली नाहीं !

**गळित शरिर जालें दर्शनीं शक्ति द्यावी ।**
**त्वरित सदय देवें आस हे पूरवावी ।**
**प्रभुवरमहिमेचा भाट ठेऊनि मागें ।**
**गिरिधर प्रभुपांई येतसे लागवेगें ॥ २ ॥**

अशी चार श्लोकांची पत्रिका त्यांनीं आधीं बंधूबरोबर पुढें पाठविली होती आणि मागोमाग आपण गेले ! ही गिरिधरांची निष्ठा पहावी व आपली निष्ठा तिच्याशीं मनांतल्या मनांत ताडून, अजून आपला हेतु श्रीसद्गुरु कां पुरवीत नाहींत याचें कारण शोधावें !

श्रीसमर्थांचा बोध श्रवण करून गिरिधरांची कशी वृत्ति झाली होती ती पहा :—

स्वामीचें पद देखतां विवरतां तद्रूपता लागली।
तेथें देह विदेह मी मन नव्हे हे ही मती भागली।
सारासारविचार सार बहुधा होऊनि गेला चि हो।
ऐसा स्वामिसमर्थबोध मजला जाला चि जाला चि हो॥ १॥

वैकुंठासि न जें शिवास नव जें त्या ब्रह्मस्थाना न जें।
पित्रामाजि न जें न जें उडगणीं त्या शेषशाई न जें।
दृश्यामाजि न जें पदीं च उमजे सिद्धान्त केला चि हो।
ऐसा०......................................................॥ २॥

दारा द्रव्य नव्हे जनीं जन नव्हे इत्यादिकें मी नव्हे।
नाना दृश्य पदार्थ मी नव्हे नव्हे मी वृत्ति भूमी नव्हे।
पंचापंच नव्हे चि पिंड हि नव्हे ब्रह्मांड गेला चि हो।
ऐसा०......................................................॥ ३॥

देहानें मज बांधणें तरि जडें मी बोध बांधे कसा।
भिंती चारि मिळोनि स्वामिघरिच्या तो बांधिला जी कसा।
तीर्थालागि निघे तेव्हां सकळ ही सोडूनि गेला चि हो।
ऐसा०......................................................॥ ४॥

जाली वृत्ति उदास काय मजला ऊणें असे वैभवा।
नाना वैभव येथिचें न मनतें मानी न त्या वैभवा।
माझें वैभव भक्तिभाव भजनें हा जीव धाला चि हो।
ऐसा०......................................................॥ ५॥

नाना काम सकाम ईप्सित पदें ब्रह्मादिकें राहिलीं।
तेथें स्वर्गसुखें क्षणीक असुखें पुण्यक्षयें पाहिलीं।
निःकामासि सकाम अमृत नको हा भाव आला चि हो।
ऐसा०......................................................॥ ६॥

नाना मंत्र चि यंत्र तंत्र बहुधा ध्यानें धरूं नेणतों।
श्रीरामेति उपासना गुरुमुखें तत्त्वार्थ मी जाणतों।
रामीं लीन विलीन दीन जन हा पाईं मिळाला चि हो।
ऐसा०......................................................॥ ७॥

गूणातीत असोनि गूण सगुणा गावें चि गावें चि हो।
दृश्यातीत असोनि दृश्य भजना व्हावें चि व्हावें चि हो।
भक्तीची खुण भक्त जाणति भले हा भाव त्याला चि हो।
ऐसा०......................................................॥ ८॥

भक्तीमाजि असे असोनि च नसे मी मीपणें मी नसे।
मुक्तीमाजि असे चि मी ह्मणतसे पर्ती च पर्ती असे।
मुक्ता मुक्ति कशास व्हाविस असा सिद्धांत केला चि हो।
ऐसा०......................................................॥ ९॥

कार्याकारण ब्रह्मकर्म करितों वेदोक्तवाणीगुणें।
नानादेवउपासना न धरितों कोदंडपाणीगुणें।
श्रीरामेति जगद्गुरु गिरिमनीं लागूनि गेला चि हो।
ऐसा स्वामिसमर्थबोध मजला जाला चि जाला चि हो॥१०॥

या विवेचनाचा शेवट केल्याशिवाय तो होणार नाहीं; ह्मणून गिरिधरांच्या कवितेचें निरूपण येथें संपवून आपण पुन्हा गिरिधरांच्या दर्शनाला जाऊं.

श्रीगिरिधरांची ही एकंदर कविता पाहिली ह्मणजे त्यांनीं आपल्या आयुष्याचें सार्थक कसें केलें तें आपणांस कळतें. साक्षात्कारी गुरुदास कसा असतो, कामक्रोधादि षड्रिपु त्यानें कसे जिंकले असतात, जन्ममरणाचे त्याचे फेरे कसे चुकतात, श्रीगुरुचरणीं आपलें सर्वस्व अर्पण करून तो कसा मुक्त झालेला असतो आणि अखेरीस गुरुरूपीं समरूप होऊन जातो याचा बोध या कवितेवरून होऊन वाचकांस तींत स्वहिताचा मार्ग सांपडणार आहे.

गिरिधरमहंतांनीं आयुष्यभर दुसरा कांहीं व्याप केला च नाहीं असें वाटतें. आज आपणांस नुसती कल्पना करावयाची आहे; पण, खरोखर, अशा महंतांच्या संगतींत राहून हजारों शिष्य ज्ञानार्जन करून कृतार्थ होत असतील यांत मला कांहीं शंका वाटत नाहीं. स्वानुभवदिनकराच्या प्रस्तावनेंत श्रीदिनकरमहंतांचें आपण विद्यापीठ पाहिलें आणि आतां हे श्रीगिरिधरांचें विद्यापीठ पहात आहोंत. त्या काळीं हीं विद्यापीठें केवढालीं तरी असलीं पाहिजेत ! या प्रत्येक रामदासी विद्यापीठांत मोठा थोरला ग्रन्थसंग्रह असे. पूर्वकालीन यच्चयावत् सर्व साधुसंतांच्या संस्कृत प्राकृत ग्रन्थांचा संग्रह या विद्यापीठांतून केलेला असे. श्रीसमर्थांचा सर्व कवितासमुद्र या पीठांतून सांठविला असे, हें सांगावयास च नको. श्रीज्ञानेश्वर, मुकुंदराज, नामदेव, मुक्ताबाई, एकनाथ, तुकाराम, श्रेष्ठ, पूर्णानंदांचे शिवराम, मुक्तेश्वर, उद्धवचिद्घन, वामन पंडित, केशवस्वामी, रंगनाथस्वामी, वेणीस्वामी, राघवरंक, शिवदिनकेसरी, मालो, बोधला, कृष्णदयार्णव, चिंतामणिसुत मुद्गल, विष्णुदासनामा, शिवतनय, कोकिळगंगाधर, हरिहर, शाम, वासुदेव, नृहरिसुत,

राघवसुत, रंगेशात्मज, शिवात्मज रघुनाथ, बहिरा, किंकर, महिपति, इत्यादि ज्ञात आणि अज्ञात अशा कित्येक सत्पुरुषांचे ग्रन्थ आज हि गिरिधरांच्या मठांत आहेत. शक १५६७ त लिहिलेली वाल्मीकिकृत रामायणाची प्रत या मठांत आहे. भीम, नरहरि इत्यादिकांची गिरिधरावर अष्टकें आहेत. आणखी एक अपूर्व वस्तु या मठांत मला पहावयास मिळाली. गिरिधरांना सर्व दासबोध मुखोद्गत होता ! दोन अडीच बोटें रुंद व आठ बोटें लांब अशी एक उभी शिवलेली, मुठींत राहण्यासारखी, त्यांची वही आहे. तींत क्रमशः, एकाखालीं एक, दासबोधांतील ओव्यांच्या आरंभीचे दोन दोन तीन तीन शब्द लिहिलेले आहेत. ही वही गिरिधर बहुतेक नेहमीं हातांत ठेवीत असत व चालतां, बोलतां, धंदा करितां, तिच्याकडे पाहून सर्व दासबोधाचें, न जाणों प्रत्यहीं, एक पारायण करीत असत ! अशी ही गिरिधरांच्या मुठींतली पूजार्ह वस्तु आहे !

याहून जास्त गिरिधरमहंतांचें चरित्र कांहीं सांगतां येत नाहीं, याचें वाईट वाटतें. वर जी थोडीशी माहिती आली आहे तिच्या सहाय्यानें वाचकांनीं आपापल्या कल्पनाशक्तीप्रमाणें गिरिधरांना पहावें ! श्रीगुरुचरणसेवेंत आपलें सर्व तनमनधन खर्चून शके १६५१ च्या वैशाख शुद्ध अष्टमीला शुक्रवारीं सकाळीं श्रीगिरिधरांनीं समाधि घेतली. त्यांची समाधि बीडास च आहे. बीडास गांवाबाहेर नदीच्या कांठीं उंचवट्यावर गर्द झाडींत एक मोठें थोरलें आवार चौफेर मजबूत कोटवजा भिंती बांधून केलेलें असून त्यांत गिरिधर व त्यांच्या मागून झालेले मठपति यांच्या समाधि आहेत. त्या आवारांत एकंदर आठ समाधिमंदिरें आहेत. पैकीं सात दगडी आहेत व एक विटांचें होतें, तें पडलें आहे. स्थान रम्य व निवांत आहे. सर्व समाधिमंदिरें सारखीं व लहान लहान आहेत. प्रत्येक मंदिरावर लेख होते, पण उत्तम लागतो असा गिरिधरांचा च लेख, आणखी तीन अपूर्ण लागतात व बाकीच्या लेखांचे दगड झिजले आहेत. गिरिधरांच्या समाधिमंदिरावर लेख कोरलेला आहे, तो असाः—

श्रीराम ॥ श्रीमत्सन्नृपशालिवाहनश
के चंद्रेषु भूपोन्मिते सौम्ये माधवशुक्लशु
क्रदिवसेष्टम्यां प्रभाते विभुः ॥ श्रीरामानुचरा
ग्रगो गिरिधरस्त्वासीत्समाधिस्थितो यस्तस्या
नुजभीमनिर्मितमिदं रम्यं तदीयं स्थलं ॥ श्री ॥

त्या ठिकाणीं भोंवती प्रदक्षिणा घालतां येईल एवढा ओटा, त्यावर समाधि व पादुकांवर मस्तक ठेवितां येईल इतका लहान कोनडा समाधीवर आहे.

हल्लीं बीडास जे दोन मठ आहेत त्यांपैकीं एक गिरिधरांचे धाकटे बंधु भीम यांच्या वंशजांचा व दुसरा त्यांची कन्या नामें, बहुधा, साळुबाई ( साळुबाईच्या नांवाचा शके १६८६ तील एक कर्जरोखा आहे, त्यावरून ह्मणतों ) यांच्या वंशजांचा आहे. उभय मठांची परंपरा अशी:—




गिरिधरांच्या पश्चात् यशवंतांनीं परंपरा चालविली. यशवंत ब्रह्मचारी होते. ते शक १६८० त समाधिस्थ झाले. त्यांच्या पश्चात् माणिक्य आणि गोविंद अशा दोन शाखा उद्भवल्या. लौकिकांत गिरिधरांना गिरमाजी ह्मणत ( अशी दंतकथा हि आहे व शक १६४८ तील एका कागदपत्रावर असें नांव दिलें आहे ) व भीमांना भिवाजी ह्मणत. एक सनद शके १६९२ तील आहे, ती भिवाजी नाईकजी या नांवानें आहे, यावरून गिरिधरांच्या

वडिलांना नाईकजी ह्मणत, असें दिसतें. शक १६९३ तील एक सनद गोविंदबावा भिवाजी यांच्या नांवची आहे. यावरून शक १६९२–९३ दरम्यान भिवाजीबावा समाधिस्थ झाले असावे असें वाटतें. शक १७०६ तील एक सनद व शक १७३२ तील चकबंदीचा एक कागद असे नारायण गोविंद यांच्या नांवानें आहेत. यांशिवाय इतर ऐतिहासिक कागदपत्रें मठांत मिळालीं, त्यांचा विचार पुढें केव्हां तरी करूं.

या परंपरेसंबंधानें एक महत्त्वाची गोष्ट येथें नमूद करून ठेवावयाची ती अशी कीं, उभय मठांत परंपरेचे जे श्लोक ह्मणण्यांत येतात, त्यांत बाइयाबाईचा निर्देश नाहीं. हें असें कां, कोण जाणे. गिरिधरांनीं आपल्या कवितेंत जेथें जेथें परंपरा दिली आहे, तेथें तेथें बाइयाबाईचा उल्लेख केला आहे. मग मी अर्थ करण्याला चुकत आहे, कां परंपरेच्या श्लोकांत बाइयाबाईना स्थान विस्मरणानें मिळालें नाहीं, याबद्दल आज मी निश्चयानें कांहीं च सांगूं शकत नाहीं.

येथें हें श्रीगिरिधरचरित्र संपलें.

**गिरिधर चतुराक्षरी मंत्र । भावें जपतां अहोरात्र ।**
**कृपा करील जानकीकलत्र । दासाभिमानी ॥**



॥ श्रीराम ॥

# २

# श्रीसमर्थांच्या कांहीं गोष्टी

**अनंत समर्थांचीं प्रतापचरित्रें । अल्प स्वल्प सांगिजेतीं वक्त्रें ।**
**गुरुसंप्रदाई गुरुदेवस्तोत्रें । श्रवण असावीं सद्भाविका ॥**

श्रीसमर्थप्रतापाचें महत्त्व ऐतिहासिक दृष्ट्या विशेष आहे व ज्या वेळीं आपल्या हातून श्रीसद्गुरुसमर्थ आत्मचरित्र लिहवितील, त्यावेळीं त्याचा जो उपयोग व्हावयाचा असेल तो होईल. तूर्त श्रीसमर्थप्रतापांत श्रीसमर्थांच्या ज्या कित्येक गोष्टी आल्या आहेत त्यांचा च विचार करण्याचा हेतु आहे. ह्या गोष्टींपैकीं कांहीं आपण पूर्वीं ऐकिलेल्या आहेत व कांहीं अश्रुतपूर्व आहेत. गिरिधरांचा काल व परंपरा हीं श्रीसमर्थांपासून फार दूरचीं नस-

त्यामुळें आपण पूर्वी ऐकिलेल्या गोष्टींपैकीं देखील कोणकोणत्या गोष्टींचा श्रीगिरिधर उल्लेख करितात हें हि विचार करण्यासारखें आहे. परंतु अशा हि गोष्टी सांगण्याचा आज हेतु नाहीं. आज फक्त पूर्वी ऐकण्यांत न आलेल्या किंवा फार तर आल्या असून हि ज्यांत कांहीं विशेष गोडी आहे तेवढ्या च गोष्टी देण्याचें योजिलें आहे.

**समर्थदेवें जें जें केलें । तें कोण्हीं नसेल ऐकिलें देखिलें ।**
**भक्ति ज्ञान वैराग्य गाजलें । न भूतो न भविष्यति ॥** १९/५२

श्रीसमर्थांचें सारें चरित्र कोणास च ठाऊक नाहीं. अशा स्थितींत ज्याला जितकी माहिती आहे तितकी च त्याजपासून घेऊन श्रीसमर्थांचें स्वरूप ओ-ळखण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. लहानपणीं गिरिधरांचा कांहीं काळ श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष सान्निध्यांत गेला असल्यामुळें त्यांनीं सांगितलेल्या कांहीं गोष्टी त्यांच्या पाहण्यांतल्या आहेत व कांहीं श्रीवेणाबाईसारख्यांकडून ऐकलेल्या आहेत; त्यामुळें या सर्व गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत.

( १ ) श्रीराणादेवी यांच्या उदरीं श्रीसमर्थ अवतरण्यापूर्वी श्रीसमर्थ-मातेला जे डोहळे होत होते, ते ऐकण्यासारखे आहेत. तुह्मांस काय अपेक्षित आहे तें सांगा, असें श्रीसूर्याजीपंतांनीं विचारल्यावरून श्रीराणादेवी ह्मणतात:-

**गिरिकंधरें मज आवडती । घरें मंदिरें मज नावडती ।**
**हनुमानरूपें मी नरवानराकृति । नरनारायण निर्धारें ॥** १/२७

**मुख्य प्राणनाथ मी सर्वव्यापक । मजला प्रिय येक श्रीरघुनायक ।**
**काय रे उगे चि पाहता विश्वलोक । रघुनाथस्मरणें करा रे ॥ २८ ॥**
**सर्व माया मिथ्या बाजीगारी । काय तुह्मी हे मानिली आहे खरी ।**
**आत्माराम मी येक सत्य चराचरीं । नित्य शाश्वत निरंजन ॥ २९ ॥**
**मज पुनीत करणें रे श्रीकृष्णातीरा । अखंड व्यापक मी चराचरा ।**
**मज नावडे संसारपसारा । आश्रम सर्व हि श्रमरूप हे ॥ ३१ ॥**
**जय जय राम ह्मणा रे स्वानंदें । आत्मविचार पाहा रे ब्रह्मानंदें ।**
**काय भुललां अहां रे विषयानंदें । परमानंदें गर्जा रे ॥ ३२ ॥**

( २ ) श्रीसमर्थ अवतरले. जरा मोठे झाले. लहानपणापासून च रामावनांत एकटे च फिरण्याचा त्यांना फार छंद असे. पंतोजीनें जें काय शिकवावयाचें तें एकदां सांगितलें ह्मणजे पुरत असे. घरचें फक्त बारा गांवांचें कुळकर्णपण होतें, पण यांना चालवावयाचें होतें साऱ्या ब्रह्मांडाचें कुळ-

कर्णपण ! ती सर्व तयारी बाळपणीं च झाली होती. कोणी वर पहावयास आले ह्मणजे श्रेष्ठांदेखत यांनीं मौन धारण करावें. प्रपंचाची चिंता मुळीं च करूं नये; तेव्हां एकदा सहज मातुःश्री ह्मणाल्या, बापा, पुरुषानें कांहीं चिंता करीत जावी. तेवढे च शब्द ऐकून नारायण कोठीच्या खोलींत एकांतांत अंधारांत जाऊन बसले. बरा च वेळ झाला, नारायण कोठें दिसेना, ह्मणून मातुःश्रींनीं सर्वत्र शोध केला, पण कोठें पत्ता लागेना. तेव्हां सहज कांहीं कामानिमित्य त्या अंतर्गृहीं गेल्या तों तेथें समर्थांना ध्यानस्त बसलेले पाहून विचारिलें:—

**बापा काय हें करितोसी येकांतस्थळीं ।**
**आई चिंता करितों विश्वाची ॥ २ ॥**

( ३ ) मातुःश्रींनीं केव्हां केव्हां कांहीं काम सांगावें तों यांची अघटित च करणी दिसून येऊं लागली. एकदा घरीं कांहीं उत्सवानिमित्य प्रयोजन होतें त्यासाठीं ताक पाहिजे होतें; मातुःश्री नारायणास ह्मणाल्या, तुला तर कांहीं काम सांगण्याची सोय नाहीं; ते शब्द ध्यानांत ठेवून दुसऱ्या दिवशीं कोठींतील धान्याचीं मडकीं सर्व जमिनीवर ओतून ताकानें च भरून ठेविलीं ! अशा एक कां दोन, अनेक कथा बाललीलेच्या आहेत. एका रात्रींत एकदां श्रीनारायणांनीं सभामंडपासह बैठक सिद्ध केली होती. परंतु यां सर्वांपेक्षां श्रीसद्गुरुसमर्थांच्या हातून एक मोठा चमत्कार झाला. हे बाकीचे चमत्कार आणखी कोणाच्या हातून घडतील किंवा घडले असतील; पण मी जो आतां सांगणार आहे तसला चमत्कार अवतारादिकांच्या हि हातून घडला नाहीं ! सांगण्याला आणि ऐकण्याला असला चमत्कार हा एवढा च. लग्नाची सर्व तयारी झाली, देवदेवक बसले, घटिका भरत आली, अंतःपट उभयतांमध्यें धरून ब्राह्मण मंगळाष्टकें ह्मणूं लागले व मधून मधून " सावधान " शब्द ऐकूं येऊं लागला. अशा गडबडीच्या वेळीं—ज्या वेळीं मन उलटें गोंधळून जातें अशा वेळीं—कोणी सावध झाल्याची गोष्ट कोणीं तरी ऐकिली आहे काय ?

**ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें । पूर्वीं अवतारादिकांसी न जालें ।**
**मायामोहनीनें ब्रह्मादिकां भुलविलें । नाना पुराणें आह्मीं ऐकिलीं ॥ ३/४१**
**समर्थदेवें ख्याति केली । सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली ।**
**मूळ हनुमानमूर्ति प्रत्यया आली । समर्थमाता बोलिली तें जालें ॥ ४२**

(४) साऱ्या ब्रह्मांडाची चिंता करणारे महापुरुष स्वतःचा प्रपंच सोडून निसटले ते अकरा दिवसांत पंचवटीस येऊन पोंचले. तेथें कृपानिधि श्रीराम वाट पहात च होते. श्रीसमर्थांना श्रीरामसमर्थ भेटले! मजसारख्या किंकरानें तो प्रसंग काय वर्णावा! श्रीरामानें श्रीसमर्थांच्या कानांत कोणतें गुजगोप्यवचन सांगितलें कीं जेणेंकरून श्रीसमर्थांचें अत्यंत समाधान झालें, तें आपल्या स्वामीचें वचन श्रीसमर्थांनीं आत्मबोधाच्या पांचव्या दशकाच्या सहाव्या समासांत प्रगट केलें च आहे.

**श्रीदासबोधीं गुरुवाक्य प्रगट केलें।**
**कर्म उपासना ज्ञान विज्ञान विवरिलें।**
**संतसज्जनासी अनुभवा आलें।**
**मी काय जाणे निजवर्म ॥** [३/१६]

(५) तपश्रम बहुत करून व अद्भुत प्रताप दाखवून नाना पंथ शोधण्यासाठीं, नाना लोक बोधण्यासाठीं, तीर्थक्षेत्रें पावन करण्यासाठीं, श्रीसमर्थ भरतखंडांत पर्यटणास निघाले. त्या पर्यटणांतील एक गोष्ट सांगतों. पर्यटण करीत करीत श्रीसमर्थ हिमालयांत गेले. प्रपंच मिथ्या आहे, वैराग्यापरतें भाग्य नाहीं, आपण स्वतः परब्रह्मस्वरूप आहोंत, हें सिद्ध करण्यासाठीं, हा देह राहिला काय आणि गेला काय, त्याची काय पर्वा आहे, असा पूर्ण निर्धार करून श्रीसमर्थांनीं आपला देह हिमालयकुंडांत झोंकला, तों श्रीरघुनाथजींनीं समर्थांना वरच्यावर धरिलें! कां धरिलें,; या देहाचें काय प्रयोजन आहे, कां विनाकारण या देहांत राहूं, असा प्रश्न सहज मुखांतून निघतांना श्रीसमर्थांचे नेत्र प्रेमाश्रुपूर्ण झाले होते. श्रीरामांनीं उत्तर दिलें—

**तुह्मासीं जगोद्धार करणें आहे। तुमची तनु ते आमुची तनु पाहें।**
**दोनी तपें तुमची रक्षिली काया हे। धर्मस्थापनेकारणें ॥** [३/८] **॥**

असें सांगून व इतर उपदेशाच्या गोष्टी कळवून त्या च वेळीं, मागें आपण वनवासास जातांना जो हुर्मुजी वस्त्रलपेटा जटाकलापीं बांधिला होता व जो सिंहासनाधिष्ठित होतांना श्रीमारुतीपाशीं दिला होता, तो श्रीसमर्थांच्या हवालीं केला, आणि ह्मणून

**तो समर्थें चालविला हुर्मुजीवस्त्रबाणा ॥** [३/२८]

(६) तेथून श्रीसमर्थ परतले. दोघे धनुर्धारी श्रीसमर्थांचें रक्षण करण्यासाठीं नेहमीं गुप्तपणें बरोबर असत. त्यांनीं श्रीसमर्थांना केव्हां हि आणि कोठें हि विसंबूं नये. वनांत, डोंगरांत, झाडाखालीं, अवघड स्थळीं, मन

मानेल तेथें श्रीसमर्थांनीं मुक्काम करावा. तीर्थें करीत करीत ते पंढरीस आले. कटीवरचे कर काढून श्रीपांडुरंग श्रीसमर्थांसाठीं कोदंडपाणी श्रीराम झाले! तेथून कृष्णातीराकडे श्रीसमर्थ यावयास निघाले. मौन धारण केलें होतें त्याचें

पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी ।

हें पद प्रथम ह्मणून विसर्जन केलें. पिसाट आला दूर व्हा, असें यांनीं ह्मणावें, तों लोकांनीं जवळ यावें आणि जे जवळ येत त्यांना श्रीसमर्थ वेड लावीत.

आतें भेटों येती त्यास वेड लावीतो ।
रामीरामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥

हें अबद्ध कसें, सुबद्ध च आहे! प्रपंची जनांच्या दृष्टीनें जो वेडा झाला, तो च खरोखर परमार्थीं शहाणा झाला! कृष्णातीरीं श्रीसमर्थ आले. बाहोक्षेत्रीं श्रीमारुतीची पुरातन मूर्ति कृष्णेमधें भीमकुंडांत होती ती बाहेर काढून तिची श्रीसमर्थांनीं पूजा केली. तेथें श्रीसमर्थांनीं श्रीमारुतीची स्थापना केली. तेथून पुढें अवतारचरित्रास सुरवात झाली. शिवराजांच्या कानीं वृत्तान्त गेला. ते श्रीसमर्थदर्शनासाठीं डोंगरोंडोंगर हिंडूं लागले, तरी दर्शन होईना, तेव्हां शिवराजांचें मन उदास झालें, राजकारण त्यांना कांहीं सुचेनासें झालें. राजदर्शनासाठीं कोणाला अनुष्ठानें करावीं लागतात, परंतु श्रीसमर्थांच्या चरणीं राजराजेंद्र लागतात. श्रीसमर्थांचा अवतार च त्यांच्यासाठीं.

समर्थांसी सर्वदां पर्वतीं राहाणें। शिवराजासी सदां पर्वतदुर्गें बांधणें।
समर्थदर्शनें माळा छत्र पावणें। छत्रपति होणें समर्थप्रतापें ॥ ३/६९
दीर्घदंड नमस्कार घालूनि। चरणपादुका मस्तकीं धरूनि।
राज्य पावला क्षात्रिय दाक्षणी। द्विजराज्य दिधलें समर्थें ॥ ७० ॥

(७) नंतर श्रीसमर्थांनीं चांफळास श्रीराममूर्तीचें संस्थापन केलें. ती मूर्ति एकदां च फक्त तेथून एक वर्षी उत्सवास पारगांवीं नेली होती. उत्सव संपून मूर्ति चांफळास परत आणली ती तेव्हांपासून चांफळखेरें सोडून पुन्हां कोठें गेली नाहीं.

जेणें केलें श्रीराममूर्तिसंस्थापन। तें चि ध्यान वर्णीन हो ॥

असें ह्मणून गिरिधर श्रीसमर्थांचें ध्यान वर्णन करितात तें असें :-

माथां निर्मळ केशरी पाग लपेटिली आहे।
सुमनावतंसें मुक्तलग तुरे पाहें।
केशर कस्तुरी भाळीं झगमगिताहे।
रत्नाक्षता झळकती ॥ ४/२७

आकर्ण नयन कृपावलोकन ।
कर्णीं मुक्तमुद्रा विराजमान ।
नास्तिकांसी देऊनि आस्तिक ज्ञान ।
सरळ नासिका विराजे ॥ १८ ॥
निजबोधमुखें बत्तिसी झळकली ।
अधरामृतें स्वर्गामृतें निवालीं ।
कंठीं मुक्तलग मेखळा आपाद शोभली ।
कांची मेखळा कटिसूत्रें ॥ १९ ॥
कौपिनावरुता पीतांबर ।
लीळा कासिला चिदंबर ।
आपाद मुक्तमाळा मनोहर ।
मुक्तपणा नातळती ॥ २० ॥
आपाद सुमनमाळा विराजती ।
नाना पर्णमाळा हरित शोभती ।
नवरत्नमाळा नवविधा दिसती ।
करांगुळीं झळकती निजमुद्रिका ॥ २१ ॥
नाना त्रिविध त्रिपुटी तापशमन ।
केवळ निर्मळ बावन चंदन ।
समर्थासी सर्वांगीं जाला लीन ।
अव्यंग अंगदर्शन दावितसे ॥ २२ ॥
उत्तर सिद्धांत उत्तरीय वस्त्र ।
निर्मळपणें सूक्ष्म स्वतंत्र ।
सर्वांगध्यान दावी विचित्र ।
दिव्यांगभूषणें विभूषणें ॥ २३ ॥
निजपदीं पादुका झळकती ।
निजकरीं मोक्ष कैवल्य विराजती ।
बद्धता मुक्तता नित्यमुक्त विसरती ।
मननशीळ गुरुपाईं ॥ २४ ॥
कोटिपूर्णचंद्र कळंकरहित ।
पूर्णीं पूर्णपणाविरहित ।
नाना ज्ञानप्रकाशें उदईं येत ।
उपमे न येत श्रीगुरुपाईं ॥ २५ ॥

अशा त्या श्रीगुरुपादुकांचा रात्रंदिवस मनाला सारखा ध्यास लागावा !

(८) चांफळखोऱ्यांत व कृष्णातटाकीं श्रीसमर्थांचा वास सुमारें तीन तपें होता. त्या अवधींत जगदुद्धाराचीं अनेक कामें त्यांच्या हातून झालीं. अकरा ठिकाणीं श्रीमारुतीची स्थापना झाली, अनेक मठ स्थापन झाले, हजारों शिष्य दीक्षा घेऊन जगदुद्धारार्थ सर्व भरतखंडभर संचार करिते झाले. डोंगरोंडोंगरीं गुहा निर्माण केल्या, मोठमोठीं पाण्याचीं टांकीं बांधिलीं, प्रसंगीं देवार्चन ठेवण्यासाठीं पर्वतांवर गुप्त सदनें केलीं. शिवाजी-महाराजांनीं अकरा हजार होन अर्पण केले, त्यांची श्रीसमर्थांनीं ब्राह्मणांवर सुवर्णवृष्टि केली. एकदा आवर्षणाचे वेळीं भिकाऱ्यांकडून तर त्यांनीं राज-अंबार लुटविलें. कोणी जें कांहीं अर्पण करीत तें ते दुसऱ्यास देऊन टाकीत.

(९) सांप्रदायिकांना त्यांची मोठी कडक शिक्षा असे. शिष्यांची ते वारंवार परीक्षा पहात. एकदा हातांत तरवार घेऊन ते उग्रवृत्ति धारण करून बसले. जो कोणी जवळ येऊन श्रीपदस्पर्श करील त्यास जीवें मारूं, असा त्यांनीं बहाणा केला, सर्व लोक भीतीनें दुरून च नमस्कार करूं लागले, परंतु श्रीकल्याणादिकांसारखे जे निष्ठावंत शिष्य होते ते काय अशा धम-कीला भितात! प्रत्यक्ष शिवाजी राजे हि श्रीसमर्थांना फार भीत असत व त्यांच्या देखत विनयानें वागत; ते च भोळारामादि भोळे शिष्य लडिवाळ-पणें जवळ बसून खलबत्त्यांत विडा कुटून श्रीसमर्थांना देत.

थोरथोरां महंतांस धारकीं धरिती।
श्रीगुरु मर्यादा रक्षविती सिकविती।
भाविक भोळ्यां लोकांसी जवळी बैसविती ।
तांबुलसेवा घेती त्यांचेनि हस्तें ॥ १० ॥

(१०) सांप्रदायिकांना त्यांनीं वर्तनाचे अनेक नियम घालून दिलेले होते. ते कोणाकडून उल्लंघिले जात च नसत, पण जर कदाचित् एकादे वेळीं एकाद्याच्या हातून कांहीं चुकी झाली तर त्याला शासन होत असे. एका महंतानें एकदा मंत्रभेद केला तर त्याला श्रीसमर्थांनीं वेताच्या छडीनें मारिलें होतें. रामदासी होणें फुकाचें नसे. श्रीरामापुढें फक्त साष्टांग नम-स्कार, इतरांसी वंदन करावयाचें तें हात जोडून; चांफळास उत्सवांत काले वर्ज केले; या सांप्रदायांत एकंकार नाहीं, पण सर्वांचा विचार मात्र एक च असावयाचा; उन्मत्तद्रव्याचें सेवन या सांप्रदायांत सर्वथैव वर्ज आहे; स्व-देशांतील शिष्यांनीं तीन वर्षांत व परदेशांतील शिष्यांनीं अकरा वर्षांत निदान

एकद श्रीसमर्थदर्शनास आलें च पाहिजे, असा त्यांचा दंडक होता, कित्येक महंतांनीं कांहीं तरी कामना धरून होमहवन करावें व त्यामुळें श्री-रामनवमीच्या उत्सवाचा हि लोप करावा व जवळच्या जवळ हि चांफळास उत्सवास जाऊं नये, तर त्यांच्या यज्ञमंडपास च आग लागावी; पण याचा अर्थ असा नाहीं कीं होमहवन कोणीं करूं नये, तर त्यापायीं गुरुआज्ञेचा भंग होता कामा नये. श्रीराम यासारखा मंत्र नाहीं. विश्वाचीं मातापितरें जीं गौरीहर त्यांनीं हि या च नांवाचा ध्यास घेतला होता.

**ज्या देवांच्या कराव्या पंचविध उपासना ।**
**त्या देवांसी श्रीरामब्रह्मउपासना ।**
**ह्मणोनि श्रीरामेंविण कोठें न बैसों वासना ।**
**अनंत ब्रह्मांडीं व्यापक श्रीराम ॥** ४/८
**श्रीराम आमुचा परमार्थ । श्रीराम आमुचा तत्त्वार्थ ।**
**श्रीराम आमुचा गुह्यार्थ । संचितार्थ सर्वार्थ श्रीराम येक ॥**

( ११ ) शिवराजांच्या आग्रहावरून श्रीसमर्थ सज्जनगडीं रहावयास गेले. गडावर समर्थांसाठीं राजांनीं एक स्वतंत्र आश्रम बांधविला. श्रीसमर्थांची सर्व प्रकारें बरदास्त ठेवण्याची गडपतीस सक्त ताकीद असे. गडावर पाऊस फार पडतो व एका पावसाळ्यांत तो आश्रम किंचित् गळाला. हें वर्तमान शिवाजीमहाराजांस कळतांच दुर्गाधिपतीला कडक शासन करण्याविषयीं महाराजांनीं हुकुम फर्माविला. हल्लीं श्रीचा सभामंडप एकाद्या वर्षीं च नव्हे तर प्रतिवर्षीं, किंचित् नव्हे तर अत्यंत गळत असून हि, आपण जी त्याची उपेक्षा चालविली आहे, त्याबद्दल आपणांस शिक्षा करण्याविषयीं कोणी हुकुम सोडणार नाहीं ह्मणून बरें, नाहींतर आमची काय दशा झाली असती ! असो, या निष्काळजीपणाबद्दल श्रीसमर्थांनीं त्या दुर्गाधिपतीस जशी क्षमा करविली, तशी कृपावंत होऊन आपणांस करावी व आपल्या हि हातून सेवा घ्यावी.

**सज्जनगडीं समर्थआश्रम किंचित् पर्जन्यीं गळाला ।**
**शिवराजें दुर्गाधिपत्यासी पर्वतपात आरंभिला ।**
**समर्थें सेवेसी सेवक मागोनि घेतला ।**
**स्वामी क्षमासिंधु दीनबंधु ॥** ६/१३

(१२) श्रीसमर्थकालीं दशावताराचे खेळ होत असत. एकदां ते खेळ श्रीसमर्थांपुढें चालले असतां श्रीरामावताराचा प्रसंग आला, तेव्हां

श्रीसमर्थ राजप्रधानादि सर्व मंडळीसह उभे राहिले, ते तो खेळ संपेपर्यंत खालीं बसले च नाहींत. श्रीरामाचें सोंग आणणें बरें नव्हे असें श्रीसमर्थांस वाटलें. ते त्या खेळ करणारांस ह्मणाले, तुह्मी पोटासाठीं हे खेळ करता, त्या तुह्मांस मी विपुल द्रव्य देऊन तुमचें दारिद्र्य विछिन्न करितों आणि तुह्मांस अशी आज्ञा करितों कीं, तुह्मीं पुन्हां श्रीरामाचें सोंग आणूं नये, असलें सोंग आणण्यांत श्रीराममर्यादा रहावी तशी रहात नाहीं.

**समर्थांची शपित वाणी वद्‌ली। श्रीरामअवतार खेळतां निर्वंश ॥** (९/२६)

( १३ ) कोणीं एकानें कपटाचीं साखरपानें आणलीं होतीं तीं नाहींशीं करून त्याऐवजीं खरीं साखरपानें श्रीसमर्थांनीं आणविलीं (६/२४), गलोलानें शुक पाडून तो पुन्हां जिवंत केला (१२/२८), शिवाजीमहाराजांना प्रत्यक्ष दर्शन देण्यापूर्वीं पराशरपर्वतावर आधीं योगबलानें दर्शन देऊन व अजून प्रत्यक्ष भेटीची वेळ आली नाहीं असें सांगून पर्वतावरून उड्डाण करून हनुमानस्वरूप सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें होतें (३/५३), चंद्रगिरीवर पंचाननाशीं श्रीसमर्थांनीं भांडण केलें (३/६१), कृष्णेच्या वाळवंटांत पुरून घेऊन, वरून पूर जाऊन हि कालांतरानें योगबलेंकरून श्रीसमर्थ प्रगट झाले होते (३/६२), आपण असावें एके ठिकाणीं व वाटेल त्यास वाटेल तेथें दर्शन द्यावें (१९/५६), "इच्छेचा दाता देव" असें ह्मणून ज्याला जी इच्छा व्हावी ती त्याची तत्काळ पुरवावी. (९/३८), यवनानें शिष्यांचा छळ केला असतां हनुमानानें यवनगृहें जाळावीं (१८/७५), भक्ताचें जहाज बुडत असतां तें तारावें (१९/६), इत्यादि अनेक यथार्थ घडलेले चमत्कार गिरिधरांनीं सांगितले आहेत, ते हल्लींच्या काळीं सर्वांना पटतील च असें नाहीं, कारण

**समर्थासी पाहेल तो समर्थ। इतरांसी न कळे हा गुह्यार्थ ॥**

( १४ ) वाटेल तेव्हां व वाटेल तेथें अन्नसामुग्री काढण्याचा चमत्कार पुष्कळ वेळां घडला आहे.

**समर्थें पर्वतपाषाण उलथविले। सिद्ध सामे सिधे काढिले।**
**भोजनपदार्थमात्र पर्वतें दिधले। सामर्थ्यकौतुक प्रभूचें ॥** (१८/६५)

( १५ ) फिरत फिरत श्रीसमर्थ एकदा करंजगांवीं गेले व सर्व गांवकऱ्यांना तुह्मीं आज आमच्या घरीं भोजनास यावें ह्मणून त्यांनीं आमंत्रणें दिलीं आणि आपण गेले डोंगरांत निघून. तिसऱ्या प्रहरीं परत आले. मंडळी जमूं लागली व वाढत वाढत अकराशें पात्र झालें.

**लाहान थोर दुबळीं पाबळीं । गांवजेवण सकळ सकळीं ।**
**अन्नें पुरवलीं आळमाळीं । केली चहपाळी पंचामृतें ॥ ९/१५**
**कामधेनु भिक्षाभोजन । तृप्त जाले संतसज्जन ।**
**जिकडे तिकडे तृप्त संपूर्ण । सद्गुरुसमर्थपंगति ॥ १६ ॥**

एकंदर समारंभ आटोपतो तों तिन्हीसांजा व्हावयाची वेळ आली. आज रात्रीं येथें कथाकीर्तन व्हावयाचें ह्मणून लोकांना आज्ञापून आपण पुन्हा अदृश्य झाले ते पुन्हां कथेच्या ठिकाणीं मध्यरात्रीं प्रगट झाले. मग अद्भुत कीर्तनें झालीं. त्यांचें सुख भोगण्याचें आपल्या कोठें नशिबीं आहे ! अशा तऱ्हेनें एक मास श्रीसमर्थांनीं करंजगांवीं क्रमिला. ही हकीकत प्रत्यक्ष वेणाबाईनीं गिरिधरांना सांगितली.

**जगदोद्धारक पुण्यमूर्ति । हनुमान अवतार उत्कट कीर्ति ।**
**काय वदवेल वाचास्फूर्ति । समर्थभिक्षाकौतुक निवेदिलें ॥ १४/२१**

( १६ ) दुसरी गोष्ट चेरगांवच्या आंबराईतलि आहे. त्या आंबराईत श्रीसमर्थ एकदां उतरले होते. गांवांतील जो तो त्यांना आमंत्रण देण्यास आला. त्यांनीं कोणास नाहीं ह्मटलें नाहीं, नैवेद्याचें ताट वाढून आणा ह्मणून ज्याला त्याला सांगितलें. पात्रें आलीं तीं ठेवायास सांगून लोकांना जावयास सांगितलें आणि

**येकांत राम समर्थ जेविले । हनुमानरूपें सर्वत्र हो ॥ १४/२८**

हें आडून एकानें पाहिलें तों त्याची दृष्टि च मंद झाली. मग श्रीसमर्थांनीं तीर्थानें त्याचे डोळे धुववून त्यास दिव्य दृष्टि दिली.

**दिव्य तेज नेत्रासी आलें । सर्वीं सर्वत्र यात्रेसी कळलें ।**
**समर्थें भिक्षाकौतुक विचित्र केलें । काय ह्मणोनि वर्णावें ॥ १४/२८**

( १७ ) तिसरी गोष्ट वरुणगांवची. वरुणगांवीं श्रीसमर्थ गेले आणि गांवच्या लोकांत

**आतां आमंत्रणें सांगा आह्मी तुह्मी । प्रीतिभांडणें सकळांचीं ॥ १४/३०**

अशीं भांडणें लागलीं. श्रीसमर्थांनीं अक्रा घरचीं आमंत्रणें घेतलीं, पण एकाचें दुसऱ्यास कळूं दिलें नाहीं. घरोघरीं तयारी सुरू झाली व मागें पुढें बोलावणीं आलीं. व्हा पुढें, आलों, ह्मणून सर्वांना वाटे लावून एका गरीब भोळ्या भाविकाकडे आपण स्वतः गेले व तेथील आंबट ताकभात मोठ्या आनंदानें जेवीत बसले, तों

**इकडे घरोघरीं अक्रा ठाईं गेले । श्रीहनुमानस्वामी समर्थ ॥ १४/३२**

ज्याला त्याला श्रीसमर्थ आपल्या च घरीं आले, असें वाटलें. कोण भाग्यवान् लोक ते होते.

> **मुख्य प्राणनाथ निधान ।**
> **समर्थस्वामींचें रूप महिमान ।**
> **भाविकांसी भावासारिखा देव फळद्रूप आपण ।**
> **संकल्प विकल्प जाण न धरावा ॥ $\frac{१४}{३४}$ ॥**

( १८ ) आणि चवथी गोष्ट आहे शहापुराची. हें शहापूर ह्मणजे मसूरजवळचें. तेथें सतीबाईसाठीं श्रीसमर्थांनीं मारुतीची स्थापना केलेली आहे व तेथें च श्रीसमर्थांचा संध्यामठ आहे. श्रीसमर्थांचा उद्धव नांवाचा एक लडिवाळ बालसेवक होता, त्यानें आपल्या आईकडून श्रीसमर्थांस आमंत्रण देवविलें. आई ह्मणाली बरोबर पंगतीस वासुदेवबावा असावेत ह्मणून त्यांना आमंत्रण दिलें. उद्धवबाळक ह्मणालें आणखी आमुचे उद्धवबावा हि पाहिजेत, त्यांना हि अवश्य बोलवावें. अशा रीतीनें मारुतीच्या शेंपटीप्रमाणें वाढतां वाढतां सर्वांना च अनुक्रमें आमंत्रणें दिलीं; आणि मग

> **उद्धवजननी विस्मयें समर्थचिंतनीं बैसली ।**
> **कर्ता भोक्ता श्रीराम ह्मणे ॥ $\frac{१४}{३८}$ ॥**

पण श्रीसमर्थांनीं कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. जें लागलें तें मसुराहून आणविलें. एक हजार पात्र झालें.

> **समर्थस्वामी सर्वांतरीं अभिन्न । येकांत भोजन करिती जाण ।**
> **श्रीहनुमानरूपें लोकांसी दर्शन । पुण्यवंतासी जालें हो ॥ $\frac{१४}{४३}$ ॥**

( १९ ) एकदां कल्याणस्वामींची परीक्षा पाहण्यासाठीं, नैवेद्य तयार झाला असून तो तसा च टाकून श्रीसमर्थ घोर अरण्यांत निघून गेले. कल्याणांनीं बरा च वेळ वाट पाहिली, पण श्रीसमर्थ आले नाहींत. सूर्यास्ताची वेळ व्हावयास आली. शेवटीं शुद्ध धोतरांत अन्नाचीं भांडीं बांधून घेऊन कल्याणस्वामी श्रीसमर्थांच्या शोधार्थ अरण्यांत प्रवेश करिते झाले. पुढें कोयना नदी लागली; तिला पूर आला होता. कल्याणस्वामी पोहण्यांत फार च पटाईत होते. एकएका बगलेंत एक एक शिष्य घेऊन ते खुशाल पुरांत उड्या मारीत; तेव्हां कोयनेचा पूर त्यांचा मार्ग थोडा च कुंठित करणार! ते पलिकडे गेले. पुढें घोर अरण्य लागलें व काळोख चांगला च पडला होता, तेव्हां दोघे वनचर धनुर्धारी भिल्ल चुड्या घेऊन कल्याणांना वाट दाखविण्यास आले. ते दोघे दुसरे कोण असणार! श्रीसमर्थांची भेट कल्या-

णास करवून ते गुप्त झाले. कल्याणांनीं श्रीसमर्थांस साष्टांग नमस्कार घालून पुढें अन्नपात्रें ठेवलीं. सहा प्रहरापूर्वीं तें अन्न शिजविलेलें होतें. समर्थांनीं तें स्वतः वाढून घेतलें व पात्रें झुगारून दिलीं. श्रीसमर्थांचें भोजन झालें. कल्याणस्वामी पहातात तों तेथें शेष अन्न हि उरलें नाहीं व पात्रें हि नव्हतीं.

**सद्गुरुनाथजी बोलती हास्यवक्त्रें ।**
**कल्याणा परलोकासी गेलीं तीं सत्पात्रें ।**
**वैकुंठ कैलास सत्यलोक पावलीं चर्मनेत्रें ।**
**पुन्हा आतां दृष्टि दिसेतिना ॥ १५/१८**

( २० ) भोजन सारून कंथा मेखळा आंथरून श्रीसद्गुरुसमर्थ पहुडले. तों कोणी देवभक्त बरोबर हजार पदाति मंडळी घेऊन दिवट्या, हिलाल यांच्या लखलखाटांत येतांना कल्याणांनीं पाहिले. इतका थाट दुसऱ्या कोणाचा असावयाचा ? श्रीरंगनाथस्वामी श्रीसमर्थांच्या सेवेसाठीं येऊन दाखल झाले. कनाता, पडदे, पलंग, समया, अनेक तऱ्हेचे खाद्य पदार्थ, वगैरे रंगनाथांनीं श्रीस्वामींस समर्पण केले. श्रीसमर्थांनीं त्यांचा स्वीकार करून कल्याणास हि निराहारी पाहून " नैवेद्य करावा बलभीमार्पण । " ह्मणून आज्ञा केली. रंगनाथांनीं केळें सोलून द्यावीं व कल्याणांनीं तीं सेवावीं ! कल्याणांचे सर्व श्रम परिहार झाले. बाकी त्यांना श्रम कसचे ह्मणा, श्रीसमर्थांनीं एक कौतुक दाखविलें इतकें च.

**गुरुभक्तासी कैंचे श्रम कोठें । समर्थप्रतापाचें नवल मोठें ।**
**घोर अरण्यीं साहित्य नेटें । समर्थें दाविलें सेवकां ॥ १५/२७**

असे सेवक व असे स्वामी आपणांस कोठें पहावयास सांपडतील ?

( २१ ) श्रीसमर्थप्रतापाच्या अठराव्या व एकोणिसाव्या समासांत श्रीसमर्थांच्या पुष्कळ कथा दिल्या आहेत व त्या सर्व वाचकांनीं मूळावरून च वाचल्या पाहिजेत. तथापि त्यांपैकीं दोन चार निवडक गोष्टी व त्यांतल्या त्यांत, आज विजयादशमी आहे, तेव्हां विजयादशमीची एक गोष्ट सांगितली च पाहिजे. श्रीछत्रपति शिवाजी महाराज व इतर मराठे सरदार यांचा परिपाठ असा असे कीं, विजयादशमीस ज्यानें त्यानें आपआपले घोडे साज घालून उत्तम शृंगारून श्रीसमर्थांच्या भेटीस जावयाचें. श्रीसमर्थांच्या मनांत येईल त्या घोड्यावर ते स्वार होत. ज्याच्या घोड्यावर ते स्वार होत त्या सरदारानें आपला भाग्योदय आहे ह्मणून समजावें.

समर्थांचा प्रतिवर्षीं शकुन घेती ।
विजयादशमीसी दर्शनासी येती ।
ज्याचा अभ्युदय त्याच्या अश्वावरी स्वार होती ।
भोंवते चालती सरदार ॥ $\frac{१८}{२३}$ ॥

( २२ ) श्रीगुरु व श्रीराम यांची सेवा करण्यांत लवमात्र कसूर नसावी. गुरुघरीं अमुक काम मी कसें करूं अशी शंका सुद्धां मनांत येतां कामा नये. प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीं या बाबतींत एकदां एक उदाहरण घालून दिलें.

समर्थें येकदां सेवाप्रेम दाविलें केवळ ।
कोण्हासी न कळतां अरुणोदईं निर्मळ ।
स्वहस्तें झाडोनि काढिलें सभास्थळ ।
दुशाला संमार्जनी करूनियां ॥ $\frac{१८}{२८}$
समर्थ ह्मणती रे जो देवद्वार झाडी ।
तो नर चढे वैकुंठपाहाडीं ।
थोरपणें धरितील तें ज्ञातीं वेडीं ।
सर्वां सर्वत्र हें सांगितलें ॥ २९ ॥

आणि ह्मणून तर आज आपणांस ह्या पुण्यकथा गिरिधरांच्या तोंडून ऐकाव- यास मिळत आहेत.

( २३ ) परंतु श्रीसमर्थांचें अंतरंग सर्व च जण ओळखत होते असें मात्र नाहीं. एकदां काय झालें, पावसाळा होता, मांडवीनदीला महापूर आला होता. श्रीसमर्थ पूर पहात कांठाशीं बसले होते. त्यांचा थाट पाहून एका अप्रबुद्ध गृहस्थाच्या मनांत आलें कीं, हे महाराज विलासी च दिसतात. अशी कल्पना त्याच्या मनांत आली मात्र, तों एक दीन दुबळा रंक पुरांत वाहवत चालला ह्मणून हाहाःकार झाला. त्याला काढण्यासाठीं श्रीसमर्थांनीं तत्काळ मांडवीनदींत उडी घातली व त्या रंकासह उंब्रजेस, मांडनदीचा कृष्णेशीं संगम होतो तेथें, बाहेर निघाले.

समर्थासी कोण्ही येक ह्मणे हे विळासमूर्ति शोभली ।
समर्थें क्षणयेक गोष्टी मनीं ठेविली ।
येका रंकासाठीं बुडतां मांडवीनदींत उडी घातली ।
उदुंबरग्रामीं निघाले कृष्णासंगमीं ॥ $\frac{१८}{३४}$

तो गृहस्थ तदनंतर श्रीसमर्थचरणीं अत्यंत लीन झाला व श्रीसमर्थांनीं हि त्याला मायानदींतून सुखरूप परतीरास नेलें, हें सांगावयास च पाहिजे असें नाहीं.

( २४ ) तसें च एकदां काय झालें, एका शिष्याच्या घरीं लग्नसमारंभ होता. त्याला साहजिक वाटलें कीं श्रीसमर्थांनीं आपल्या घरीं समारंभास यावें. त्याप्रमाणें त्यानें फार आग्रह करून श्रीसमर्थांस घरीं नेलें. तेथें लग्नमंडपांत नाच चालला होता, त्या ठिकाणीं श्रीसमर्थांना त्यानें नेऊन बसविलें ! श्रीसमर्थांनीं जें एकदां एक आसन ठोकून दृष्टि खालीं घातली, ती सहा प्रहर वर केली च नाहीं ! प्रपंची जन खजिल झाले हें काय सांगावें ?

समर्थांसी आग्रहें विवाहमंडपीं बैसविलें ।
ब्रह्मचर्यापुढें नाचणीध्यान मज्यालसींत मांडिलें ।
समर्थें साहा प्रहर अधोदृष्टी आसन घातलें ।
कवतुकें फजित केले प्रपंचीक जन ॥ १८/४० ॥

( २५ ) आतां एक दोन गोष्टी श्रीमत् दासबोधाविषयीं सांगितल्या पाहिजेत. पहिली गोष्ट अशी कीं एकादा महंत फार दिवसांनीं श्रीसमर्थदर्शनास आला ह्मणजे, श्रीसमर्थ त्याची नाना प्रकारांनीं परीक्षा पहात. आज्ञा घेऊन गेल्यापासून तों परत भेटीस येईपर्यंत काय काय केलें ह्मणून त्यास विचारीत व त्यावरून आपोआप च त्याचा व्याप कळून येत असे. महंताची परीक्षा पहाण्याची त्यांची एक तऱ्हा अशी असे कीं, त्याची नित्य पाठांतली पोथी आपण घ्यावयाची व तींतील इकडचा दशक तिकडे व तिकडचा समास इकडे अशी व्यस्ताव्यस्त पोथी करून त्यास द्यावयाची, त्यानें ती त्वरित लावून दिली तर ठीक, जर कां विलंब लावला तर केवळ ग्रंथपूजन मात्र यानें संपादिलें असें समजावयाचें.

महंत निस्पृह येती देशांतरींचे ।
समर्थ ग्रंथ मंचकीं घेती तयांचे ।
दशक समास व्यस्ताव्यस्त लाऊनि ग्रन्थाचे ।
होती महंताचे परीक्षक ॥ १/६ ॥

सध्या ग्रंथ महंतें विल्हे लाविला ।
तरी शुद्ध विवरणें पूर्ण परमार्थ केला ।
विलंबें ग्रंथ विल्हे लावित महंत बैसला ।
तरी ग्रंथपूजन मात्र संपादिलें ॥ १/७ ॥

यावरून श्रीमत् दासबोध ग्रन्थ कसा वाचला असतां आपण श्रीसमर्थांच्या परीक्षेंत उतरूं याचा बोध घेण्यासारखा आहे. पारायणें अवश्य व्हावींत पण अर्थ समजल्यावांचून किंवा अर्थाकडे लक्ष दिल्यावांचून नुसतीं पारायणें

केल्यास फक्त ग्रंथपूजनाचें पुण्य लाभेल पण परमार्थ हातीं येणार नाहीं. तात्पर्य, श्रीमत् दासबोध ग्रन्थ असा वाचावा कीं, ग्रन्थ बाजूस ठेवून हि पहिल्या समासापासून तों दोनशाव्या समासापर्यंत क्रमशः कोणकोणत्या विषयांचें प्रतिपादन कसकसें केलें आहे हें आपलें आपल्या मनाला सांगतां यावें.

( २६ ) तसें च आपली नित्य परिपाठाची पोथी कोठें ठेवावी, कशी ठेवावी, वाचावयास कोठें व कसें बसावें, याविषयींचे नियम हि आपण अवश्य पाळले पाहिजेत. नित्यश्रवणमननाची आपली पोथी शुद्ध व पवित्र जागीं ठेवावी, व्यवस्थित ठेवावी, पवित्र व निर्मळ अशा एकांत स्थळीं ती वाचावयास हातीं घ्यावी व श्रीसमर्थांनीं च शिकविलेलें सिद्धासन घालून ती मननपूर्वक वाचावी ! तात्पर्य आपली पोथी श्रीसद्गुरुरूप आहे अशी अचल भावना असावी. पोथी कोठें हि ठेवली व कसें हि बसून वाचली म्हणून काय बिघडतें, समजली म्हणजे झालें, असल्या भ्रष्ट कल्पनेचा मनाला स्पर्श हि होऊं देऊं नये. वेणाबाईपेक्षां तर आपणांस जास्त समजत नाहीं ना ! एक गोष्ट सांगतों. एकदां काय झालें, एक महंत दासबोध वाचीत पलंगावर उताणे पडले होते. तिकडून वेणाबाई आल्या. त्यांनीं हा प्रकार पाहून पलंगापुढें साष्टांग नमस्कार घातला. महंताला वाटलें वेणाबाईनीं हा नमस्कार आपल्याला च घातला. तो अधिकारानें व वयानें वेणाबाईपेक्षां लहान होता, तेव्हां त्याला याचें जरा आश्चर्य वाटलें पण तें फार वेळ टिकलें नाहीं. श्रीमत् दासबोध म्हणजे प्रत्यक्ष श्रीसमर्थ च आहेत, अशी वेणाबाईची निष्ठा पाहून महंत ओशाळला, त्याला आपल्या अव्यवस्थितपणाची लाज वाटली व पुन्हां त्याच्या हातून असलें अमर्याद वर्तन घडलें नाहीं.

**समर्थग्रंथ मंचकावरी कोण्हीयेकें घेतला ।**
**महंत थोरपणें वाचित बैसला ।**
**अकस्मात वेणाबाईनें देखोनि साष्टांग नमस्कार घातला ।**
**समर्थ मंचकीं दासबोधरूपें म्हणोनियां ॥** $\frac{१८}{३०}$

हा वेणाबाईनीं घालून दिलेला धडा कल्याणेच्छु सेवकांनीं अक्षरशः पाळला पाहिजे.

( २७ ) श्रीमत् दासबोधाचें सामर्थ्य वेणाबाईनीं च जाणावें. त्यांच्या स्वतःसाठीं जरी नाहीं तरी त्यांच्या मिषानें तुम्हां आम्हांस कळावें म्हणून वेणा-

बाईनीं श्रीसमर्थांस एकदां सप्रेम विनविलें, महाराज, श्रीरामापुढें केव्हां केव्हां आह्मी आपलें हितगुज सांगतों व श्रीराम हि आमच्या जीवींच्या गोष्टी ऐकून घेऊन आह्मांस धीर देतात आणि आमचें तेणेंकरून समाधान होतें, पण, महाराज,याप्रमाणें आह्मीं आमचीं सुखदुःखें श्रीसमर्थग्रन्थार्चनीं जर निवेदन केलीं, तर त्यापासून कांहीं साक्षात्कार होतील काय ? त्यावर श्रीसमर्थांनीं वेणाबाईस ह्मटलें, आह्मीं जाणतों, तुह्मांला हें सर्व माहित आहे, तुह्मी हा प्रश्न स्वतः- साठीं करीत नसून लोकसंग्रहार्थ करीत आहां, तथापि आपल्या प्रश्नाचें उत्तर इतकें च कीं याविषयीं आपण लवमात्र शंका बाळगण्याचें कारण नाहीं !

**श्रीरामदेवार्चन सिद्ध चि आहे।**
**श्रीग्रंथराजदासबोधसामर्थ्य सिद्ध चि पाहें।**
**जो जो महंत येथें निश्चयें राहे।**
**तो तो लाहे साक्षात्कारु ॥ १/३८**

श्रीमत् दासबोधग्रन्थाचें हें सामर्थ्य श्रीसमर्थांनीं स्वतः वेणाबाईस सांगितलें व वेणाबाईनीं आपल्या शिष्यमंडळीस सांगितलें, तें गिरिधरांनीं प्रतापांत लिहून ठेविलें आहे. या वचनावर पूर्ण विश्वास टाकून प्रतीति पाहण्याचें काम आपलें आहे.

**समर्थसद्गुरुनिजबोध। दासबोधरूपें सर्वत्र प्रसिद्ध।**
**नाना साक्षात्कार होती विविध। येकनिष्ठ गुरुभक्तांसी ॥ ३०/३३**

( २८ ) आतां शेवटची गोष्ट प्रत्यक्ष श्रीसमर्थांविषयीं सांगून हें कथा- प्रकरण संपवूं. गुरुभक्तांना साहजिक आतुरता वाटते कीं, श्रीसमर्थ कसे दिसत, कसे चालत, कसे बोलत, कसे पहात, हें सर्व कांहीं आपणांस कळावें, नखशिखांत श्रीसमर्थांची आपण प्रत्यक्ष मूर्ति पहावी, सूर्योदयापासून सूर्या- स्तापर्यंत व सूर्यास्तापासून पुन्हां सूर्योदयापर्यंत आपण त्यांच्या जवळ राहून त्यांची एकंदर दिनचर्या अवलोकन करावी, तसें च जन्मापासून तों समाधी- पर्यंत त्यांच्या प्रत्येक क्षणाचा आपणांस इतिहास कळावा ! ही गुरुभक्तांची जिज्ञासा तृप्त करण्याचें सामर्थ्य आज कोणांत असणार ! याला सांगायाला सुगम उपाय ह्मणजे गुरुभक्तांनीं च गुरुरूपीं मिळून जावें ह्मणजे झालें ! हा उपाय सुगम असो वा दुर्गम असो, यावांचून पूर्ण समाधान होण्यास अन्य उपाय मात्र नाहीं. तथापि तोंपर्यंत गिरिधरांसारख्या अनन्य भक्तांनीं याविषयीं जें लिहून ठेविलें असेल तें पाहून आपण आपली तृप्ति करून घेतली पाहिजे. बाकी होतें असें कीं, तृप्ति करून घेण्यासाठीं श्रीसमर्थकथामृताचें जों जों प्राशन

करावें तों तों तृप्ति न होतां उलट तृष्णा वाढत च जाते. पण ह्मणून प्रयत्न सोडूं नये, तळमळत असावें, श्रीसमर्थ केव्हां तरी कृपा करतील! तूर्त गिरिधर काय सांगतात तें पाहूं.

( १ ) **श्रीसमर्थ कसे चालत** ? भरभर चालत.

> **समर्थ हनुमानस्वरूप वायोरूप निर्धारें ।**
> **जातां तीर धरिती मागिलया करें ।**
> **समुद्रीं जहाज चाले जेवी त्वरें ।**
> **तेवीं सत्वरें श्रीसमर्थगमन ॥ १९/२२ ॥**

( २ ) **कसे बोलत** ? सामान्यपणें फार थोडें बोलत. तेराव्या समासांत सीतारामसंवाद दिला आहे, त्यांत राम सीतेला ह्मणतात, तुह्मांला जें काय विचारावयाचें असेल तें श्रीसमर्थांना च विचारावें. त्यावर जगन्माता ह्मणते,

> **दिसताती देवा अनिर्वचनी ॥ १३/९ ॥**

मोठेंपणा स्वतःकडे घेऊन त्यांच्याकडे कोणी गेल्यास त्या-च्याशीं तर ते मुळीं च बोलत नसत; परंतु नेणतेपणा घेऊन त्यांना कांहीं विचारल्यास मात्र ते मोकळेपणानें बोलत. कोणी हि प्रथम त्यांच्याकडे गेल्यास ते फार थोडें बोलत, पण कांहीं काळ त्यांचा सहवास घडल्यास ते विशेष सलगीनें बोलत १०/३५-३६

( ३ ) **कसे पहात** ? खालीं पहात. श्रीसमर्थांची नेहमीं अंतर्दृष्टि असल्यामुळें ते साहजिक अधोदृष्टि दिसत. महाराज, आपण नेहमीं अधोदृष्टि कां असता, असा एकदां एकानें त्यांना प्रश्न च केला होता, त्याचें त्यांनीं उत्तर दिलें:

> **समर्थासी कोण्हीयेक लोक ह्मणती ।**
> **स्वामी अखंड अधोदृष्टि अंतर्दृष्टि कां असती ।**
> **अरे अंतरीं पाहतसों श्रीराममूर्ति ।**
> **तुह्मासी सगुणमूर्ति हे लक्षावया ॥ १९/७०**

( ४ ) **कसे दिसत** ? बहुधा ध्यानस्थ दिसत.

> **समर्थ दिसती बहुधा ध्यानस्थ मनें ॥ १३/४१**

आणि त्यांनीं स्वतः आत्मबोधांत सांगितलें च आहे,

> **जनास दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित ।**
> **अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १४-७-१५**

( ५ ) काय खात ? श्रीसमर्थांना अन्नभोजन मुळीं च आवडत नसे, फळें कांहींशीं आवडत.

**समर्थासी अन्नभोजनीं इछा नाहीं ।**
**वनफळभोजनीं इछा कांहीं ॥ $\frac{३}{४}$**

त्यामुळें ज्या ज्या ऋतूंत जीं जीं फळें होत, तीं तीं श्रीसमर्थांना शिष्य मंडळी अर्पण करीत.

**षण्मास आंबे गोमंतपर्वतींचे ।**
**समर्थासी येती अपाड पाडाचे ।**
**नाना ऋतुकाळीं नाना फळांचे ।**
**आहार सर्वदां समर्था ॥ $\frac{१}{२१}$**

शिवाय दिवसांतून एकदां च जेवीत असें या पुढच्या ओवी- वरून दिसतें.

**कोण्हीयेक दिवसीं प्रेमसद्भावें ।**
**वेणाबाईनें प्रार्थिलें जे श्रीगुरुदेवें ।**
**आजि विजयादशमीसी उत्तरभोजन अगत्य करावें ।**
**लडिवाळपणें विनवितसे ॥ $\frac{१५}{२}$**

वेणाबाईसारख्या अपत्यानें लडिवाळपणा केला तर एकाद्या विज- यादशमीला दुसऱ्यांदा श्रीसमर्थ जेवीत, बाकी नेहमीं एकदां च.

( ६ ) विडा खात काय ? होय, असें श्रीकल्याणांना सर्पदंश झाला त्या वेळीं ते रामघळीहून मठांत रात्रींचे चंची आणाव- यास जात होते व विडा कुटून देण्याचें काम भोळारामाकडे असे, वगैरे गोष्टींवरून दिसतें; आणि शिवाय गिरिधर हि सांगतातः—

**रुद्रशतसंख्या सेवणें नागपणें ।**
**उत्तम कर्पूर सुपारी दंतें किंचित चर्वणें ।**
**पिकपात्रें शुद्ध शोधून सेवकें पुढें धरणें ।**
**लोकीं अलभ्य लाभणें प्रसादु ॥ $\frac{१}{२२}$**

त्यावरून हि दिसतें.

( ७ ) केव्हां आणि कशावर निजत ? उगीच दुपारीं थोडेंसें निजत, रात्रीं क्वचित च निजत. रात्र बरी च झाली म्हणजे महंतांना म्हणावयाचें, चला रे उठा, आतां निजा, आम्ही हि

विश्रांति घेण्यास जातों; असें ह्मणून सर्वांना निजावयास जाण्याची आज्ञा करावयाची आणि आपण एकाद्या डोंगराची वाट धरावयाची !

समर्थासी माध्यान्हीं निद्रा कांहीं ।
रात्रीं निद्रा कचित नाहीं ।
आह्मी निद्रेसी जातों ह्मणोनि पाहीं ।
लोकांसी आज्ञापिती जावया ॥ १८/३

काय ही वृत्ति, कोण हें तप ! रात्रीं अरण्यांत जाऊन काय करीत हें त्यांचें ते जाणोत ! कशावर निजत हा प्रश्न च कोठें उरतो ह्मणा; पण जें थोडेंसें निजत तें तरी कशावर ?

आतां शयनाकारणें केवळ भूमि ।
कंथा मेखळा मात्र आंथुरिली ॥ १५/२०

( ८ ) आसन कोणतें घालीत ? सिद्धासन.

माहापुरुषाचें कोण जी आसन ।

असें सीतेनें विचारलें व

जानकी यांचें सिद्धासन ॥ १३/२७ ॥

असें श्रीरामांनीं च सांगितलें आहे. अर्थात् सांप्रदायिकांचें आसन हें च असणार.

( ९ ) कोठें रहात ? एका ठिकाणीं ह्मणून नाहीं.

समर्थांचें येके ठाईं स्नानसंध्यावंदन ।
येके ठाईं फळाहार अथवा भोजन ।
येके ठाईं उदकप्राशन तांबुलचर्वण ।
विश्रांति शयन येके ठाईं ॥ १८/२

शहापुरास स्नानसंध्यावंदन तर मसुरास फराळ, उंब्रजेस कृष्णोदकप्राशन तर चरेगांवास तांबूलचर्वण आणि रामघळींत थोडीशी विश्रांति ! असा क्रम श्रीसमर्थांचा असे. उत्तरवयांत श्रीसज्जनगडावर राहूं लागल्यानंतर या क्रमांत कांहीं फेरफार झाला असल्यास न कळे ! केव्हां केव्हां श्रीसमर्थ एकांतांत कोठें तरी जाऊन बसत, तर दहा दहा महिने कोणास च दर्शन होत नसे. ९/४९

**समर्थासी गिरिकंधरीं गुप्त राहाणें ।**
**लोकानुग्रहें प्रगट होणें ।**
**प्रगट होतां जनीजनार्दनें ।**
**वरुषाव करिजे पूजेचा ॥ २०/२२**

( १० ) कसे वागत ? उदासवृत्तीनें व निस्पृहपणानें वागत.

**कोण हो यांची दिसते वृत्ति ।**

ह्या रीतिच्या प्रश्नाला

**यांची केवळ उदास वृत्ति ॥ १३/१५**

असें च श्रीरामांनीं उत्तर दिलें आहे. श्रीसमर्थांचा निस्पृहपणा तर जगविख्यात आहे. श्रीशिवराजांनीं सारें राज्य अर्पण केलें तरी तें त्यांनीं तृणतुल्य मानिलें. फार काय, पण चांफळास श्रीरामाचें देवालय आपण बांधून देतों अशी शिवराजांनीं केलेली विनंति हि मान्य न करतां सामान्य भिक्षेवर श्रीसमर्थांनीं शिष्यांकरवीं तें देवालय बांधविलें.

**समर्थआज्ञा पुसे शिवराजा ।**
**श्रीरघुनाथदेवालय मी बांधेन वोजा ।**
**समर्थ ह्मणती शिष्यसमुदाय माझा ।**
**देवालयें करवीन अनंत हस्तें ॥ १९/१६**

( ११ ) श्रीसमर्थ चिंता कसली करीत ? जी लहानपणीं आईल सांगितली ती च चिंता अखेरपर्यंत श्रीसमर्थांनीं केली.

**श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती ।**
**प्रांतींचे लोक दर्शनासी येती ।**
**सकळ प्रांतींचा स्वामी परामृश घेती ।**
**चिंता करिती विश्वाची ॥ २०/५८**
**देशकाळवर्तमानें ।**
**आपण चिंताग्रस्थ होती मनें ।**
**ह्मणती कैसीं वांचतील जनें ।**
**कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ ३०/५९ ॥**
**कैसी क्षेम राहेल जगति ।**
**कैसीं देवदेवालयें तगतीं ।**
**कैसे कुटुंबवछल लोक जगती ।**
**कोणेकडे जातील हे ॥ ३०/६० ॥**

अशी श्रीसमर्थांनीं चिंता केली ह्मणून आपण बरे दिवस पाहिले !

# ३
# उपसंहार

श्रीसमर्थप्रतापाच्या आह्मांस दोन प्रती मिळाल्या, एक पोथीवजा व दुसरी शिवलेली. दोन्ही प्रति बीड येथें " सीताराम " मठांत च मिळाल्या. प्रस्तुत ग्रन्थ पोथीवरून छापला आहे व बाडांतील महत्त्वाचीं पाठांतरें टीपांत दर्शविलीं आहेत. " श्रीराम " मठ व " सीताराम " मठ या दोन्ही मठांतील विद्यमान मठपति श्रीगुरुभक्तिपरायण श्रीरामबुवा व श्रीगुरुभक्तिपरायण सीतारामबुवा या उभयतांनीं आपआपल्या मठांतील सर्व संग्रह दाखवून माझ्या कार्याला उपयुक्त तेवढा मजबरोबर दिला, याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. व्यावहारिक ऋण फिटेल पण हें ऋण फेडणें शक्य नाहीं ! ज्यांच्या कृपाप्रसादानें श्रीसमर्थप्रताप, श्रीनिवृत्तिराम, सीतास्वयंवर, रामायणें इत्यादि, मागील प्रकरणांत निर्दिष्ट केलेले अप्रतिम ग्रन्थ मला वाचावयास मिळाले त्यांचे उपकार किती आठवावे ! बीडास मला दोनदां जावें लागलें, त्या दोन्ही प्रसंगीं तेथील सुखवस्तु गृहस्थ रा. रा. कृष्णाजी विश्वनाथ जोशी ऊर्फ किसनराव कुंडल व त्यांचे बंधु रा. रा. शंकरराव जोशी यांची जर मला मदत न होती तर, गिरिधरांची कविता इतक्यांत प्रकाशित होणें दुर्घट च झालें असतें. रा. शंकरराव जोशी हे वकील असून जोगाईच्या अंब्यास असतात. तेथील व इतर जवळपासच्या ठिकाणचा संग्रह मिळवून देण्यांत रा. शंकररावांनीं निरलसपणें साहाय्य केलें. उभयतां बंधु साधुवृत्तीचे असून अशांचा स्नेह संपादण्यांत कोणाला हि भूषण वाटेल.

प्रस्तुतच्या भागांत आरंभीं श्रीसमर्थांची प्रतिमा देऊन शिवाय दोन नवीन महत्त्वाचीं चित्रें दिलीं आहेत. श्रीक्षेत्र चांफळ येथें श्रीसमर्थांनीं श्रीराममूर्तिसंस्थापन केल्याची हकिकत चवथ्या समासांत आली आहे, ह्मणून त्या ठिकाणीं, चांफळास लाकडी पुलावरून जो देखावा दिसतो त्याचें चित्र दिलें आहे. चित्रांत तळाशीं ५ अंकाच्या जागीं मांडनदीचें पात्र असून, घाटाच्या पांच पायऱ्या अंक ४ च्या ठिकाणीं आहेत. त्यावर आणखी पन्नास पायऱ्या बांधावयाच्या आहेत, तो भाग मोकळा दिसत च आहे. मध्यभागीं एकाद्या किल्ल्याच्या बुरुजाप्रमाणें जो भाग दिसतो, तो च श्रीकल्याणस्वामींचे शिष्य डोंब्रजमठपति श्रीकेशवस्वामी यांनीं बांधविलेला तट होय.

**चाफळीं केशवाची नदीतटरचना ।**
**नाना कार्यभागाची विवंचना ॥**

असा त्याचा उल्लेख प्रतापांत दहाव्या समासाच्या ८४ व्या ओवींत आलेला आहे. वर डाव्या बाजूस अंक २ चा जो शिखराचा थोडा भाग दिसत आहे तो श्रीदासमारुतीच्या मंदिराचा होय व त्याच्या उजव्या बाजूला अंक १ चें मोठें शिखर आहे तें च श्रीराममंदिराचें होय ! हें च शिखर श्रीसमर्थ डोंगरावरून पहात असत !

**भोंवता डोंगराचा फेर । मध्यें देवाचें शिखर ॥**

त्या शिखराचें आज आपणास दर्शन घडत आहे. शिखरावरून दृष्टि काढून ती बऱ्या च अंतरावर उजव्या बाजूला दोन वृक्षांच्या मध्यभागीं नेली म्हणजे, ३ अंकानें दर्शविलेला जो डोंगराचा थोडासा भाग दिसत आहे, तो च भैरवाचा डोंगर होय. तो मंदिरापासून खरोखर दीड कोस लांब आहे. या च डोंगरांत श्रीसमर्थांची दोनमजली रामघळ व श्रीशिवरायांची तृष्णा भागवून त्यांचें समाधान करणारें कुबडीतीर्थ आहे.

आतां आपण दुसरें चित्र पाहूं. एकविसाव्या समासांत श्रीसमर्थांच्या अधिष्ठानाचें म्हणजे श्रीसज्जनगडाचें वर्णन आहे, त्या ठिकाणीं हें चित्र दिलें आहे. हें श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष समाधीचें होय ! गेल्या उन्हाळ्यांत चौबे भाग्यवान् श्रीगुरुभक्त गडावर अहोरात्र श्रीसमर्थसेवेंत राहून प्रत्यहीं समाधीला गंधलेपन करीत असत. श्रीगिरिधरांच्या कवितेपैकीं अकरावें प्रकरण जें "श्रीस्वामीदर्शन" त्यांत गंधलेपनाचा जो उल्लेख आला आहे तो पाहिला म्हणजे, या चौघा श्रीसेवकांनीं किती पुण्य संपादिलें असलें पाहिजे, याची कल्पना होते. अशा गंधलेपन केलेल्या समाधीचें हें चित्र गेल्या वैशाख वद्य ७ स घेतलेलें आहे. सर्व अंगाला चंदन लाविलेलें असून चंपकपुष्पें वाहिलेलीं आहेत. पुढें श्रीसमर्थांच्या पादुका ठेविल्या होत्या. "पादूकांवरि शेष शोभत असे" इत्यादि जें अनंतकवींनीं वर्णन केलेलें आहे, ती शेषासह पादुकांची पेटी मागच्या बाजूस असलेली तसबिरींत दिसत आहे.

मालेंतील सातवा भाग एकेहाळीमठपति श्रीआत्मारामहाराजकृत "श्रीदासविश्रामधाम" छापत आहे. सदरहु-ग्रन्थ विस्तारानें श्रीमत् दासबोधाच्या तिप्पटीहून हि जास्त मोठा असल्यामुळें तो संपूर्ण होण्यास कालावधि बरा च लागणार, यासाठीं तो खंडशः प्रकाशित करण्याचें योजिलें आहे. श्रीदासविश्रामधाम छापून पुरा होईतोंपर्यंतच्या अवधींत इतर भाग

निघतील तितके काढावयाचे असें ठरवून आज हा आठवा भाग "श्रीसमर्थ-प्रताप" महाराष्ट्रास सादर करून, नववा भाग "श्रीसमर्थसांप्रदायाचीं कागदपत्रें" आजच्या च सुमुहूर्तावर हातीं घेत आहे. निरनिराळ्या मठां-तून व श्रीरामदासी घराण्यांतून मिळालेला फार च महत्त्वाचा पत्रव्यवहार या भागांत यावयाचा आहे. या एकंदर कागदपत्रांवरून श्रीसमर्थांचें चरित्र व श्रीसमर्थसांप्रदाय यांवर विशेष प्रकाश पडणार आहे. महाराष्ट्राच्या इतिहा-साला व इतिहासाच्या साधनांना या पत्रांनीं पूर्तता येणार आहे. या पत्रां-वांचून महाराष्ट्राचा खरा इतिहास कळणार च नाहीं. हीं पत्रें कोणाच्या हि अंतःकरणाला रिझवितील, मग सांप्रदायिकांना तर तीं अत्यंत बोधप्रद होतील हें काय सांगावें! दहाव्या भागांत "श्रीकरुणाष्टकें" द्याव-याचीं आहेत. कमींत कमी हीं शंभर करुणाष्टकें असून, कशा हि खडतर बद्धाच्या ठिकाणीं तीव्रतर मुमुक्षुत्व उत्पन्न करून त्याला सन्मार्गावर आणून सोडण्याचें सामर्थ्य या करुणाष्टकांत आहे. अकरावा भाग "श्रीसमर्थांचीं लघुकाव्यें" योजिला आहे. अशी अकरा भागांची योजना निश्चित केली आहे. अकरा अकरा भागांचा एक एक सर, असे अकरा सर एकत्र करून त्यांना श्रीसमर्थांच्या चरित्राची गांठ देऊन, ही माला श्रीसद्गुरूंच्या कंठीं घातलेली डोळे भरून पाहावी अशी इच्छा आहे! श्रीचरणीं अंतरींचा हेतु निवेदन करीत असावा!! तो सफल करणें हें सर्वस्वीं त्यांच्या कृपेवर अवलंबून आहे!!!

धुळें, विजयादशमी, शके १८३४ } शंकर श्रीकृष्ण देव



## ॥ श्रीसद्गुरुस्तवन ॥

पद

चाल–स्वामी माझा योगिराज०

वैराग्य हें भाग्य आमुचें समर्थस्वामीचें । आमुचें० ।
तेणेंकरितां पोषण जालें भक्तिज्ञानाचें ॥ ध्रु० ॥

भाग्य वैभव सांडुन वनासी उदास चालिले । वनासी० ।
जगदोद्धारासाठीं जनास उपयोगा आले ॥ १ ॥

हटयोगी ते नव्हती दीक्षा भिक्षा सांगती । दीक्षा० ।
ग्रंथविचारें शुद्ध अपारें जनांत वर्तविती ॥ २ ॥

आशापाश तोडुनि निर्वीकल्प वासना । निर्वीकल्प० ।
ऋणानुबंधावारी अवघे निरसित कल्पना ॥ ३ ॥

निरूपणाचे अंतर्त्याग बाह्य दीक्षेचे । त्याग० ।
स्वतंत्र निस्पृह केले साधु उदासवृत्तीचे ॥ ४ ॥

चहूं आश्रमाचे गोवे तोडुन टाकिले । गोवे० ।
अरण्यमठ हे देवाश्रम हे देवें करवीले ॥ ५ ॥

पिंडब्रह्मांडाचा आश्रम जेणें उडवीला । आश्रम० ।
दीर्घ स्वप्न भूगोळ अवघा विवरुनि टाकिला ॥ ६ ॥

स्वधर्मरक्षणिं प्रेम ज्यासी मोहछायाचे । ज्यासी० ।
रामोपासक गिरी बालक शरणागत त्याचें ॥ ७ ॥



# ॥ श्रीसमर्थप्रताप ॥



## ॥ समास पहिला ॥



॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे श्रीरामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

ॐ नमो सद्गुरु प्रारंभा । गणेश शारदा स्वयंभा ।
मूळपुरुषा मुळारंभा । आत्मयारामा जगद्गुरु ॥ १ ॥
गुरु शिष्य आपण आत्माराम । देवभक्तपण आत्माराम ।
स्वामी सेवक आत्माराम । श्रोते वक्ते सुखमूर्ति ॥ २ ॥
संत सज्जन सौख्यदायक । विरक्त योगी कवि गायक ।
विश्वात्मा हा त्रैलोक्यनायक । आत्माराम सुखमूर्ति ॥ ३ ॥
समर्थ सद्गुरु सिंधोदक । समर्थासी अर्घ्य देईन सम्यक ।
सिद्ध साधक सभानायक । ब्रह्मवृंदें अभिवंदिलीं ॥ ४ ॥
समर्थस्वामीचीं चरित्रें । कांहीं देखिलीं ऐकिलीं पुण्य श्रोत्रें ।
परम पावनें परम पवित्रें । सृष्टीमध्यें विस्तारलीं ॥ ५ ॥
ऐका समर्थप्रताप ग्रंथ । सभानायक साधु संत ।
सर्वज्ञ तुम्ही संत महंत । बोबड्या बोलें वर्णीन जी ॥ ६ ॥
मागां श्रीराम अवतार सूर्यवंशीं । शुद्ध स्वयंप्रकाश भानुवंशीं ।
क्षेत्रें क्षेत्रज्ञ क्षात्रियवंशीं । पूर्ण परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ७ ॥
आत्मलिंग आत्माराम । हनुमान स्वामी आपण श्रीराम ।
यावत् ब्रह्मांड तावत् नाम । तारक ब्रह्म चराचरीं ॥ ८ ॥

---

१ देह. २ जीव.

सांप्रत कलयुगीं सर्वब्रह्में चालिलीं । विषयधर्में सत्कर्में लोपलीं ।
सकाम उपासनें ज्ञानविज्ञानें हारपलीं । वेदांतमार्ग उछेदिला ॥ ९ ॥
शुद्ध संप्रदाय राहिला । शबेल येकंकार चालिला ।
मग येक विचार संतीं केला । कोण्हि येक अवतार प्रार्थिजे ॥१०॥
मग सर्व संतांच्या शुद्ध संकल्पें । हनुमान अवतार कल्पिला सामर्थ्यरूपें ।
हनुमान राम आपण स्वस्वरूपें । ब्राह्मणरूपें जगद्गुरु ॥ ११ ॥
ब्रह्मांडकोशीं जंबुद्वीपाभीतरी । भरतखंडीं श्रीरामक्षेत्रीं ।
दंडकारण्यदेशीं गोदावरी । उत्तरतीरीं पंचक्रोशीं ॥ १२ ॥
जांबुवंती नामें रामराजधानी । भोंवतीं आरामें शोभती चक्रध्वनि ।
उभय सरिता जेवि जनस्थानीं । पंचवटिका विराजे ॥ १३ ॥
नगरींत श्रीमंत च्यारी वर्ण । अनन्य ब्राह्मणीं तिन्ही वर्ण ।
विद्या तप शौच्यादि गुणें ब्राह्मणवर्ण । ब्रह्मानंदें संतुष्ट हो ॥ १४ ॥
ग्रामवासी भले लोक । ग्रामपाळक पुण्यश्लोक ।
यहलोकीं साधिती परलोक । नीतिन्यायें वर्तती ॥ १५ ॥
देव देवालयें देवदर्शनें घेणें । नित्य हरिकथा पुराणश्रवणें ।
नित्य नैमित्य कर्में आचरणें । परमार्थ बुद्धि करूनियां ॥ १६ ॥
देवब्राह्मणाची आराधना । घरोघरीं समाराधना ।
रंगमाळा दीपमाळा दीपाराधना । सुमनगंधमाळा वसंतपूजा ॥१७॥

---

१ ' अवघें ब्रह्मरूप आहे ' असें ह्मणून सर्वत्र एकंकार करूं पाहणारा भुललेला वर्ग. श्रीग्रन्थराज १७-४-२०।२९ पहा. २ अशुद्ध. ३ जांब गांव. मोगलाईंत अवरंगाबाद जिल्ह्यांत आंबड परगण्यांत परतूरपासून सात कोस हें गांव आहे. ती श्रीसमर्थांची जन्मभूमि होय. विशेष वर्णनासाठीं मालेंतील तिसऱ्या भागाची प्रस्तावना पहावी. ४ श्रीरामोपासकांची दक्षिण अयोध्या. ५ बागा. ६ चक्रवाक पक्ष्याच्या ध्वनीनें किंवा चक्र ह्मणजे सोसाट्याचा वारा असा अर्थ घेतल्यास वाऱ्याच्या ध्वनीनें. ७ नाशकास टांकळीजवळ जसा संगम आहे तसा येथें हि दोन लहान नद्यांचा संगम आहे. ८ श्रीसमर्थांचे वेळीं जांबेस एका ठिकाणीं पांच वटवृक्ष होते. त्या ठिकाणास पंचवटी ह्मणत. समर्थांना प्रथम श्रीरामदर्शन झालें तें या पंचवटिकेंत होय.

ब्राह्मणाची रक्षिती प्रतिष्ठा । संतसज्जनीं केवळ निष्ठा ।
परदार परद्रव्य मानिती वमन विष्ठा ।
स्वप्नीं हि अनिष्टा नातळेती[1] ॥ १८ ॥
ग्रामसेवक जाति विजाति फिरती । आलयाचीं आतिथ्यें करिती ।
कष्टल्यांभागल्यांचे श्रम हरिती । क्षुधिस्थ कोण्हि राहेना ॥ १९ ॥
ग्रामसीमेमधूनि संतमूर्ति । डावलोनि[2] कोण्हि च न जाती ।
पवित्र पुरीसी पवित्र करिती । चरणस्पर्शें करूनियां ॥ २० ॥
देशकाळवर्तमानें । ग्रामस्थ वर्तती प्रसंगमानें ।
पिकें पिकती अतिमानें । पर्जन्य वर्षती यथाकाळीं ॥ २१ ॥
शुद्ध राजभाग राजयोगें देती । विवेकविचारें प्रपंच परमार्थ करिती ।
अंबापुरीं[3] अधिष्ठानीं ऐक्य राहती । सत्य ध्वज लाऊनियां ॥ २२ ॥
ऐसीये जांबुवतिये नगरीं । नगरलेखकांच्या[4] दिव्यमंदिरीं ।
जामदग्निवछगोत्रीं श्रीराणादेवीउदरीं । स्वयें नारायण समर्थ अवतरले ॥ २३
समर्थमातेचे ऐकतां डोहळे । संतसज्जनासी स्वानंदसोहळे ।
संतीं जे जे शुद्ध संकल्प होते केले । ते ते फळासी आले श्रवणद्वारें ॥ २४ ॥
सूर्यकांतें[5] कांतेसी पुसिलें । तुह्मासी काय अपेक्षित आहे वो भलें ।
तें तें सांगा मी सिद्ध करीन वहिलें[6] । श्रीरामसमर्थकृपेकरूनियां ॥ २५ ॥
श्रीरामकृपावाक्य ऐकोनि कानीं । सीघ्र राणादेवी भरतॅसेवनी[7] ।
ह्मणे टाळ मृदांग उपांग[8] ध्या रे यंत्रध्वनि । कथाकीर्तनीं मज प्रेमा ॥ २६
गिरिकंधेरें[9] मज आवडती । घरें मंदिरें मज नावडती ।
हनुमानरूपें मी नरवानराकृति । नरनारायण निर्धारें ॥ २७ ॥
मुख्य प्राणनाथ मी सर्वव्यापक । मजला प्रिय येक श्रीरघुनायक ।
काय रे उगे चि पाहतां विश्वलोक । रघुनाथस्मरणें करा रे ॥ २८ ॥

---

१ स्पर्श करीत नाहींत. स्वप्नांत देखील पाप करीत नाहींत. २ टाकून. ३ आंबड गांवीं; तेथें डोंगरांत देवीचें स्थान आहे व. ४ कुळकर्ण्यांच्या. ५ समर्थांचे वडील सूर्याजीपंत त्यांनीं. ६ सत्वर, लवकर. ७ भर्तृसेवनी, पतिव्रता. ८ उपसाहित्य. ९ गिरिकंदरें, गुहा, खोरीं.

सर्व माया मिंथ्या बाजिगोरी¹ । काय तुह्मी हे मानिली आहे खरी ।
आत्माराम मी येक सत्य चराचरीं । नित्य शाश्वत निरंजन ॥ २९ ॥
ऐकोनि कांत ह्मणे आणा जी वेगीं गंगोदक ।
कांतेसी सिंचन करूं मूळमंत्रें² सम्यक ।
राणादेवी ह्मणे मज आणणें कृष्णेचें उदक ।
गंगाधर बंधु सिंचणें गंगोदकें ॥ ३० ॥
मज पुनीत करणें रे श्रीकृष्णातीरा । अखंड व्यापक मी चराचरा ।
मज नावडे संसारपसारा । आश्रम सर्व हि श्रमरूप हे ॥ ३१ ॥
जय जय राम ह्मणा रे स्वानंदें । आत्मविचार पाहा रे ब्रह्मानंदें ।
काय भुललां अहां रे विषयानंदें । परमानंदें गर्जा रे ॥ ३२ ॥
ऐकोनि आश्चिर्य जालें सकळांसी ।
राणादेवी कोण्या उपायें उमजेल कैसी ।
पाचारा हो वेगीं रामजोसियासी । आहे गुंणिया देवरसी³ जाणता ॥३३॥
सीघ्र रामजोसी येऊनि देवमाता पाहे । ह्मणे इसी हनुमान अंतर्दशा चालताहे
आत्माराम महर्दशा येथून लागली पाहे । सासष्टि वर्षे गर्भासी ॥३४॥
मातादर्शनीं जोसियासी⁴ आनंदमूर्छना आली ।
नेणों सगर्भ माता अंतर्बाह्य भरली ।
श्रीरामजाणियासी समाधी लागली ।
गुंणिया ग्रासिला महद्भूतें रामें ॥ ३५ ॥
जय जय अंबे तुळजे भवानि । येकदां कांता उमजवी वो जननि ।
येरि ह्मणे मी श्रीरामवरदायिनी । माझें आत्मरामायण तुह्मी ऐका रे ॥३६॥
नाना सरयुतिरीं गंगातिरीं मज अवतरणें ।
नाना ज्ञानयज्ञकर्में मज सिद्धीसी नेणें ।
नाना अहंधनुं⁵ भंगोनि आत्मसमाधी वरणें । भार्गवगर्व हरणें सन्मार्गी ॥३७
राजश्री त्यागूनि ब्रह्मारण्यीं । नाना रज तम सारूनि दंडकारण्यीं ।
नाना खर दूषण त्रिशिरे⁶ दुर्गुण वारुनि । मरीचँ⁷ कांचनी मृगतृष्णा ॥३८॥

---

१ बाजीगरी, गारुडविद्या. २ पंचाक्षरी. ३ देवऋषी, देवर्षी. ४ रामजोश्यास. ५ अहंकाररूपी धनुष्य. ६ दुर्गुणरूपी त्रिशिरखरदूषणादि राक्षस. ७ चमकणाऱ्या सोनेरी पाठीच्या मृगाच्या चर्माची चोळी घालण्याची सीतेला झालेली इच्छा.

माझी आत्मसमाधी आहे मज अंतरीं । मिथ्या अहंरावण सीताज्ञप्ति हरी ।
निःकामसुग्रीवेंसीं मी सख्य करी । सकामवाळी वधावया ॥ ३९ ॥
त्रिगुण त्रिकुट मज दहन करणें । भवसिंधुवरी हेळा सेतु धरणें ।
जड मूढ पाषाण आत्मलीळा तारणें ।
अहंकाररावण मारणें सहपरिवारीं ॥ ४० ॥
अनंत जीवाचे भवस्वर्गबंध । तोडोनि टाकीन मी स्वानंदकंद ।
नाना त्रिदश देव करीन निर्द्वंद । भागवत स्थापीन ब्रह्मांडीं ॥४१॥
स्वानंदपुष्पकीं उत्तर प्रांत मानी । सद्भावभरतासी भेटि देईन निदानीं ।
नाना लक्ष लक्ष्मण षड्वर्ग शत्रुघ्नि । स्वानंद मिळणी सकळांसी ॥४२॥
माहा मंगळस्नानें ब्रह्मभोजनें । सहज सिंह्यासनीं स्वानंदें मज बैसणें ।
येकैयेक सहस्राब्दें साम्राज्य करणें । गुप्त प्रगट समाधी ॥४३॥
नाना नरवानरेंसीं विश्वैपुरी । मज स्वधामा नेणें आहे निर्धारी ।
पूर्ण व्यापकपणें राहणें मज चराचरीं । हनुमान राम मी होऊनियां ॥४४॥
ऐकोनि सगर्भ मातेचीं वचनें । ह्मणे हे बोलिली आत्मरामायणें ।
काय आहे नेणों देवासी करणें । त्रिंबकराजा पावें रे ॥ ४५ ॥
येरि ह्मणे मी त्रिंबकीं जनस्थानीं । पुन्हा बैसेन पंचवटिके अनुष्ठानीं ।
श्रीरामरूपें मी प्रगटेन हनुमानीं । जगदोद्धार करावया ॥ ४६ ॥
आतां बोलण्याची जाली सीमा । कैसी गृहासी जाईल हे मनोरमा ।
कोण्हि येक ग्रहगति खरें आली आह्मा । आत्मयारामा पावें रे ॥४७॥
तव जयजयकारें गर्जती सकळ । नाना करताळिका नामकल्लोळ ।
कथाकीर्तनें होताती केवळ । जालें लंबमान मणिमंडळ भानूचें ॥४८॥
नाना सुगंध धूसरें सुमनें वर्षती । जांबुवति पुरीसी आश्चिर्यें वाटती ।
सगर्भ मातेची विचित्र गति । कोण गर्भ आहे काय जाणों ॥४९॥
दिवस चालिला अस्तमाना । समर्थमाता आली आत्मसदना ।
नगर नागरीक लोक नाना । नमस्कार करूनि चालिले ॥ ५० ॥

---

१ अहंकाररूपी रावण शुद्ध ज्ञानस्वरूप सीतेचें हरण करितो तो भास होय.
२ लीलेनें. ३ एकावर एक अकरा. ४ अयोध्या.

पुढें प्राप्त जाली श्रीरामनौमी । समर्थमाता बैसली जपध्याननेमीं ।
कथाकीर्तनें होती स्वधामीं । आत्मयारामीं स्वानंदें लोक ॥ ५१ ॥
उपाध्यायासी करीं दिधली सुपारी । ब्रह्मसंतर्पणें होती देवघरीं ।
तव माध्यान्ह नौमीचे अवसरीं । समर्थगर्भ प्रगटला ॥ ५२ ॥
जयजयकार सर्वत्रीं केला । श्रेष्ठासी समर्थ बंधु जाला ।
श्रीरामराज केवळ हनुमानरूपें अवतरला । ब्राह्मणरूपें जगद्गुरु ॥५३॥
पूर्व संकल्प सिद्धीसी पावले । साधुसंत सर्वेहि मिळाले ।
आपआपणासी स्तविते जाले । आत्माराम सुखमूर्ति ॥ ५४ ॥
जय जय देवा ब्राह्मण्य गुरु । जय जय देवा परम गुरु ।
जय जय देवा परात्पर गुरु । नरनारायण अवतरसी ॥ ५५ ॥
जय जय देवा धरामरा । जय जय देवा मायाभूभारहरा ।
जय जय देवा सहस्रकरा । बोधभास्करा दिनमणी ॥ ५६ ॥
जय जय त्रिकांडवेदरक्षणी । जय जय कर्मउपासनासंरक्षणी ।
जय जय ज्ञानविज्ञानपूर्णलक्षणी । अलक्ष लक्षणीं परब्रह्म ॥ ५७॥
जय जय सकामकर्मदळणी । जय जय निःकामकर्मप्रतिपाळणी ।
जय जय धर्म अर्थ काम मोक्ष प्रदानी । कैवल्य ब्रह्मदानी जगद्गुरु ॥५८॥
जय जय दंडकारण्यनिवासा । जय जय मायारण्यनिवासा ।
जय जय ब्रह्मारण्यनिवासा । मायातीता निरंजना ॥ ५९ ॥
जय जय ब्रह्मचर्यशिखामणी । जय जय परब्रह्म निर्वाणी ।
जय जय विमळ ब्रह्म निर्गुणी । छात्रजनसंरक्षका ॥ ६० ॥
जय जय भरतवर्षविभावना । जय जय भरतखंडजनपावना ।
जय जय ब्राह्मण्यकुळसद्भावना । पावनपावना हनुमान जी ॥ ६१ ॥
जय जय वैराग्यभाग्यउदया । जय जय ज्ञानविज्ञानसूर्योदया ।
जय जय अनंत अपार स्वरूपोदया । उदयअस्तेंविण विराजसी ॥६२॥
जय जय गिरिकंधरनिवासा । जय जय देवा जगन्निवासा ।
जय जय मुनिमानसहंसा । आत्मयारामा सुखमूर्ति ॥ ६३ ॥

ऐसें संतमुखें समर्थें स्तवन ऐकिलें । मग अपूर्व तेथें येक वर्तलें ।
हास्यमुखें सकळ संतांसी संन्मानिलें । गोप्य देवें केलें निजवर्म ॥६४॥
कैसें संतस्तवनाचें कौतुक । ऐक्यभावें समर्थें केलें हास्यमुख ।
कां जे स्तव्य स्तवन स्तविता येक । आत्माराम सर्व देख ह्मणोनियां ॥६५॥
एवं जगद्गुरुरूपें संतमूर्ति । राणादेवी सूर्यनारायण सन्मानिती ।
नमस्कारासी वारी नाहीं अंतुति । रात्रिदिवस पूजनार्थ ॥ ६६॥
आधींच श्रीरामनौमीचा ब्रह्मानंद । विशेष समर्थ अवतरले सच्चिदानंद ।
नाना दानप्रसंगें परमानंद । जो जो विधें तो जाला स्वानंदें ॥ ६७॥
एवं सद्गुरुसमर्थआख्यानकथन ।
समर्थसंप्रदाई कोण्हीयेक करी हरिजन ।
समर्थचरित्रफळें विचित्रें जाण । ब्रह्मरसाळें सेवितसे ॥ ६८ ॥
स्वर्गस्थासी वांकुल्या दावितसे । देखोनि स्वर्गस्थ वानर जाले प्रेमपिसे ।
मग समर्थआख्यानफळरसाचा वाटा देतसे । संतसभेसी स्वानंदें ॥६९॥
स्वर्गीं दुल्लभ हें पावनें चरित्रें ।
देवराज्यें टकमक सांगती संतसत्पात्रें ।
म्हणोनि बुडी दिधली ब्रह्मचिन्मात्रें । या भरतखंडीं ब्रह्मांडीं ॥ ७० ॥
ब्रह्मानंदं या श्लोकार्थें । सद्गुरुध्यान कीजे यथार्थें ।
परि सगुणस्वरूपें आर्षभावार्थें । समर्थअवतार वाखाणिला ॥७१ ॥
एवं समर्थअवतारचरित्र । गोदातीरीं वर्तलें पवित्र ।
वेणीगिरिधर पुढें चित्रविचित्र । समर्थ ॐपुण्यआख्यान सांगेल जी ॥७२॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥ ७३ ॥
समास प्रथम ॥ १ ॥ जय जय राम ॥ छ ॥

---

१ उत्सवांतील विधि, कार्य. २ प्रेमानें वेडे. ३ स्वर्ग किंवा देवराज इन्द्र. ४ ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं । इत्यादि, या श्लोकानें सद्गुरूचें ध्यान करावें खरें, परंतु मी सद्गुरूचें सगुण रूप जें श्रीसमर्थ त्यांच्या अवताराची कथा भोळ्या भावानें सांगितली हें च माझें श्रीसद्गुरुचें ध्यान होय.

## ॥ समास दुसरा ॥



॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

मागां समर्थअवतारवर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां समर्थबाळचरित्रादि वैराग्य वर्द्धमानें । संतसज्जनें परिसिजे ॥१॥
समर्थ वर्धमान दिवसेंदिवस । इंदुउपमा न साजे समर्थांस ।
चंद्र पूर्णपणें अपूर्ण अमावास्येस । श्रीरामचंद्र समर्थ पूर्ण पूर्णत्वें ॥२॥
मुख्य आदिनारायण नाम । कटिसूत्रादि चौलकर्म ।
शिखारक्षण ब्राह्मणधर्म । मातृभोजन समागमें ॥ ३ ॥
समर्थासी अन्नभोजनीं इछा नाहीं । वनफळभोजनीं इछा कांहीं ।
वैराग्यचिन्हें दिसतीं देहीं । संतसज्जनीं जाणितलें ॥ ४ ॥
नाना अळंकार अंगलेणीं । लेंकुरासी देताती तोडोनि ।
समर्थकळा दिव्यनयनीं । अनंगलेणीं सर्वांगें ॥ ५ ॥
सदा सर्वदा अंतरंगें । बाह्य लीळा चरित्रप्रसंगें ।
चंचळ सर्वदां सर्वांगें । येके ठाईं न बैसती ॥ ६ ॥
तातभ्राताची परम मर्यादा । वेगळे वेगळे असती सर्वदा ।
श्रीरामनामस्मरण करणें सदा । हनुमानक्रिया दिसतसे ॥ ७ ॥
ब्राह्मण पुरींत अध्यनें करिती । समर्थासी ब्रह्मविद्या अंतरीं स्फुरती ।
समर्थ मान्यता आंगीं न धरिती । अनावरपणें वर्ताविया ॥ ८ ॥
समर्थ आले उपनयनमानीं । उपाध्याहिं देखिलें रूप हनुमानी ।
कासोटीं पुछ दाखाविलें मुंजिबंधनीं । गौप्य कराविलें चराचरीं ॥ ९ ॥
समर्थहस्त पाहिला सामुद्रिकें । ब्राह्मण नृत्य करूं लागला कौतुकें ।
समर्थदेवें पुसिलें हास्यमुखें । कां जी भूदेवा नृत्य करितसां ॥ १० ॥

---

१ वृत्तान्त, कथा. २ अध्ययन.

बापा स्वस्ति साम्राज्यें वैराज्यें भोगिसी ।
येकींयेकछत्री रामराज्य करिसी ।
विश्वजनासी तूं उद्धरिसी । काय बोलों प्रताप ॥ ११ ॥
विश्वाचे शमिसी त्रिविध ताप । विश्वाचा तूं मायबाप ।
आत्माराम तूं आपेंआप । काय सांगों सामुद्रिकें ॥ १२ ॥
अपार भाग्यें भोगिसी स्वभावें । तेंव्हां मज ब्राह्मणासी आठवावें ।
समर्थ ह्मणती जी तुह्मी भूदेवें । गौप्य करावें सांप्रत हें ॥ १३ ॥
ह्मणोनि श्रीसमर्थें कंठमाळा । प्रेमें घातली ब्राह्मणगळां ।
श्रीरामप्रसाद घेऊनि ब्राह्मण गेला । ब्रह्मानंदें स्वानंदें ॥ १४ ॥
समर्थक्रीडेचें अद्भुत लक्षण । अष्ट ¹जुत्पाति संवगडे जाण ।
गोव्या बोटें टिंचिती पूर्ण । येकेक सेर सेर संपूर्ण संभारें ॥१५॥
वृक्षसरोवरीं उड्या घेती । रानीं वनीं सर्वदां असती ।
यथा स्वलीळा ग्रामांत येती । परम प्रतापी अनावर ॥ १६ ॥
समर्थें अक्रा घड्यांत केलें धूळाक्षर । अक्रा प्रहरांत वळिलें अक्षर ।
अक्रा दिवसें केला जमाखर्च सुंदर । ब्रह्मांडकुळकर्ण चालवावया ॥१७॥
समर्थासी च्यारि वेळ पाहावया आले वर । श्रेष्ठां देखतां समर्थ निरोत्तर ।
गृहस्थांसी ह्मणती येवोनि बाहेर । गंगाधरपंत बंधु गृहस्थाश्रमी ॥१८॥
आपणासी आश्रम करणें नाहीं । श्रीरामआज्ञा समर्थ कांहीं ।
चतुर्²विधा कांता वरूनि गेलों पांहीं । निर्मळ निश्चळ निरंजनी ॥१९॥
समर्थासी गृहकृत्य कांहीं करणें नाहीं ।
माता ह्मणे बापा पुरुषें चिंता करणें कांहीं ।
बरें माये ह्मणोनि येकांत गृहीं बैसोनि पाही । चिंतन मांडिलें अवतारें ॥२०
समर्थासी घरीचीं धुंडिती घरेंदारें । नाना रानें वनें गिरिकंधरें ।
तंव कांहीं कार्यभागानुसारें । माता अंतर्गृहीं प्रवेशली ॥ २१ ॥
तंव समर्थमूर्ति धन्यवाणी देखिली । ब्रह्मांडवरीची चिंता देवें मांडिली ।
बापा काय हें करितोसी येकांतस्थळीं ।आई चिंता करितों विश्वाची ॥२२॥

---

१ मल्ल. २, चत्वार मुक्ति.

समर्थासी मातेनें नेऊनि जेऊं घातलें । कांहीं समर्थेसीं बोलों नये ऐसें जालें ।
जें जें बोलणें तितुकें प्रत्यया आलें । अवतारमार्गें करूनियां ॥२३॥
सर्वें चि समर्थमातेसी विस्मरण पडिलें । येके दिवसीं देवगृहीं प्रयोजन मांडलें
बापा तक्र शक्रासी दुर्लभ ह्मणती भले । तुज तों कार्य सांगों नये॥ २४॥
समर्थें मातृवचन ऐकोनि कानीं । सीघ्र कर्मकुलालासी आज्ञा करूनि ।
अकरा अकरीं पात्रें नेउनी । घरोघरीं देवें देवविलीं ॥ २५ ॥
समर्थें सर्वत्रांसी रात्रीं आज्ञा केली । संपूर्ण तक्रें पाहिजेती उषःकाळीं ।
प्रहर रात्रीं उठोनि सकळीं । नवनीत तक्रें ब्राह्मणीं सिद्ध केलीं पाहा हो॥२६
समर्थें परसद्वारें अंतर्गृहीं । तक्रें समस्त आणविलीं अरुणोदईं ।
आठरा धान्यें रिचउनि महीं । शुद्ध तक्रें भरिलीं भाणवेसीं ॥ २७ ॥
समर्थमाता भ्रातृपत्नि येऊनि पाहे । तव जेथें तेथें तक्र चि तक्र आहे ।
कोण हें विचित्र बापा करिसी काये ।
ह्मणे माये मातृआज्ञापरिपाळण हें ॥ २८ ॥
समर्थ आणितील स्वर्गींचें वैभव । नाना कामधेनु दुहुनि सर्व ।
परि कलयुगीं होईल लौकिक अपूर्व । देवगृहीं उपाधी कामा नये ॥२९॥
कोण्हियेक ग्रामाधिपति ह्मणे बाहेर बैठक नाहीं ।
देवगृहीं अववे अध्यात्मि जालेती सर्व हि ।
कोण्ही गृहासी येती गृहस्थ पाहीं । त्यांसी मान सन्मान पाहिजे ॥३०॥
समर्थें अष्ट जुत्पति संवगडे सवें घेतले ।
दों प्रहररात्रीं काष्ठसंभार तोडविले ।
भिंती घालोनि रात्रीं प्रताप किंचित दाखविले ।
अरुणोदइं बैठक सिद्ध केली ॥ ३१ ॥
ग्रामाधिपतीनें सूर्योदईं अवचिति पाहिली ।
अरे बा येके रात्रीं मोठी बैठक कैसी केली ।
अवतारपुरुषाची क्रिया देखिली । येके रात्रीं आणिला द्रोणाचळु ॥३२॥

---

१ हा शब्द समासांत मागाहून घातलेला आहे. २ भाणवसा=उतरंडीची खोली. उतरंडींतील निरनिराळा सर्व धान्यें जमीनीवर ओतून सर्व मडकीं ताकानें भरून ठेविलीं. ३ भ्रातृजाया, भावजय. ४ दोहन करून. ५ परमार्थी, वेदांती.

नेणों सुवर्णमंदिरें रात्रीं करिती । स्वर्गसंपति आणूनि भरिती ।
देशकाळप्रसंगें समर्थ वर्तती । उपाधि होईल ह्मणोनिया ॥ ३३ ॥
समर्थांचें भविष्य अवतारमहिम्न । ग्रामाधिपतिरूपें श्रीरघुवीरें जाण ।
गंगाधरपंतांकरवीं लेहून । रात्रीं वटवृक्षातळीं दिधलें ॥ ३४ ॥
समर्थवटवृक्ष अद्यापि आहे । हनुमान मुळीं बैसला पाहे ।
गंगाधरस्वामि तीन दिवस समाधिस्थ राहे ।
समर्थचरित्रपत्रें हस्तीं घेऊनियां ॥ ३५ ॥
समर्थांसी वर्तमान कळलें । बापें उपार्जिलें तें आह्मासी लाधलें ।
श्रेष्ठीं आपणासी पत्रवंचन केलें । बरें रघुवीर आहे समर्थ ॥ ३६ ॥
समर्थांची प्रेमअवस्था परम श्रेष्ठांसी लागली ।
लग्नविचारणा न पुसतां मांडिली । समर्थें हि मौनमुद्रा धरिली ।
कां जें मनीचें करणें आहे ह्मणोनियां ॥ ३७ ॥
आतां लग्नविस्तार ग्रंथीं करणें । तरी समर्थांसी येथें नाहीं राहणें ।
आह्मासी कळलें भविष्य पूर्णपणें । डोहळे आह्मी पूर्वीं ऐकिले ॥३८॥
समर्थलग्नआइती जाली संपूर्ण । देवदेवकघटिका भरली नसतां पूर्ण ।
सावधान अंत्रपाटीं ऐकतां परिपूर्ण ।
ॐ पुण्या अनिर्वचनीं समर्थ निघाले ॥ ३९ ॥
समर्थांसी फावली मध्यरात्री । समर्थ कोण्हासी दिसतील चर्मनेत्रीं ।
समस्त लोक हाहाकारिती वग्त्रीं ।
सकळ साधुसंत ह्मणती धन्य धन्य ॥ ४० ॥
ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें । पूर्वीं अवतारादिकांसी न जालें ।
मायामोहनीनें ब्रह्मादिकां भुलविलें । नाना पुराणें आह्मी ऐकिलीं ॥४१॥
समर्थदेवें ख्याति केली । सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली ।
मूळ हनुमानमूर्ति प्रत्यया आली । समर्थमाता बोलिली तें जालें ॥४२॥

---

१ यापुढें मात्र तो वृक्ष दिसणार नाहीं ! सात वर्षांमागें त्याला दोन चार नूतन पल्लव फुटले होते पण ते हि पुढल्या वर्षी कोमेजून गेले ! २ मिळविलें. ३ सामग्री. ४ ॐ पुण्याहवाचनाचे वेळीं.

योगमाता राणाबाई अनंदाभिराम । कांहीं हि पावली नाहीं विराम ।
आदिपुरुष आत्माराम । मायातीत निरंजन उदरीं ॥ ४३ ॥
श्रेष्ठासी कांहीं श्रम जाले । परि बोलोनि नाहीं दाखविले ।
धीर गंभीरपणें डोळां अश्रु आले । साधु संत संमोखिंती ॥ ४४ ॥
जेष्ठ वैराग्यभाग्यवाटा अनुजें घेतला । कनिष्ठ प्रपंच अग्रजा दिधला ।
ह्मणोनि श्रेष्ठीं शोक मांडिला । स्वामी कनिष्ठ तुमचा प्रपंच नोहे ॥४५॥
गृहस्थाश्रमीं ऐशा मूर्ति । निर्माण होती पुण्यकीर्ति ।
पुत्रपौत्राभिवृद्धि सत्कीर्ति । गंगाधरस्वामि विस्तारिजे तुह्मी ॥ ४६ ॥
ह्मणोनि समाधान केलें संतसज्जनीं । आशिर्वाद दिधले द्विजजनीं ।
तव समर्थकथा राहिली कविमनीं । संतसज्जनीं परिसावी ॥ ४७ ॥
समर्थामागें लोक धांविले मध्यरात्रीं । समर्थ कोणासी न दिसती नेत्रीं ।
पंचक्रोशीं गोदावरीपात्रीं । शुद्ध हरिभक्तिं हरिद्रागात्रीं प्रवेशले ॥४८॥
समर्थाचें लागलें शुद्ध हरिद्राआंग । विमळ गोदावरीचें जालें दिव्यांग ।
आपुले हृदयह्रदीं ठेऊं ह्मणे समर्थांग । श्रीरामरायें कृपापांगें वोढिलें ॥४९॥
समर्थ लागले गोदावरीच्या दक्षिणतिरीं ।
माहा वैराग्यप्रताप तीव्रतर अंतरीं ।
केवळ स्मशानवासी सर्वेश्वर अवतारी ।
गोदातीरीं प्रेत येक जळतां देखिलें ॥ ५० ॥
समर्थासी आधीं च आंगीं बाणलें तीव्रतर वैराग्य ।
विशेष स्मशान देखिलें ईश्वरभाग्य ।
धन्य मृत प्राणी तो समर्थसंसर्गें सभाग्य । मुक्तीसी गेला निसंशय ॥५१॥
सद्गुरुसत्संगें काय येक नोहे । जीव शिव ब्रह्मपदीं बैसताहे ।
जगदोद्धार समर्थें सुचिला पाहे । प्रेतप्राणी उद्धरिला ॥ ५२ ॥

---

१ संबोखिती, समजाविती. २ धाकट्या भावानें. ३ वडील भावाला. ४ जांबेपासून दक्षिणेस गोदावरी तीन कोस आहे. ५ ही तृतीया आहे. भक्तीनें. ६ हाळद लावल्यानें आंग पिंवळें झालेलें होतें, तसें च गंगेंत उतरले. ७ समर्थांना आपल्या हृदयाच्या आंत कायमचें ठेवावें असें गोदावरीनें मनांत आणलें होतें, पण श्रीरामांनीं कृपाबळें करून त्यांना बाहेर काढले.

सदाशिव स्वामीचा सहचर जाला । जीव शिवपदीं ऐक्य ठेला ।
पुढें समर्थप्रसंग काय वर्तला । तो संतसज्जनीं परिसिजे ॥ ५३ ॥
अंत्रपाटीं लक्ष्मीपतीचें केलें अंघ्रियुग्मस्मरण[1] ।
समर्थ वर्तमान जाणोनि सीघ्र केलें प्रस्थान ।
लक्ष्मीकांत पावले असतील जनस्थान । अष्टदिगपाळें[2] इकडे पाठविले ॥५४
पंच पंच उषःकाळ जाले । त्रिदश देव दर्शना आले ।
ह्मणती आत्माराम स्वयें अवतरले। जेणें बंध सोडविले हनुमानरूपें ॥५५॥
समर्थस्वामी अंतरज्ञानी । म्हणती देव आले अतितदर्शनी[3] ।
परस्परें सप्रेम अभिवंदनीं । आत्माराम सर्व ह्मणोनियां ॥ ५६ ॥
कुशळ स्वागत सर्व पुसिलें । समर्थें अपूर्व तेथें येक केलें ।
केवळ मानसपूजेनें अर्चिलें । समस्त सुरवरांसी ॥ ५७ ॥
आश्चिर्य जालें सकळ सुरांसी । कोण संपत्ति हे समर्थापासीं ।
मनसा संकल्पें अर्घ्या निमिषीं । सांग पूजिलें पाहा हो ॥ ५८ ॥
समर्थाची सपर्या[4] घेणें । स्वर्ग येणें अक्षई भोगणें ।
अहो स्वर्गसंपत्ति हे कुरवंडी करणें[5] । श्रीगुरुचरणावरुनियां ॥ ५९ ॥
इंद्र म्हणे जी गुरुदेव राजेंद्र । भक्त भूपति भूदेव महींद्र ।
परत्रपावन श्रीरामचंद्र । सूर्यनारायण नमो नमो ॥ ६० ॥
अग्नि ह्मणे जी ज्ञानवैराग्यवन्हि । नाना ज्ञानाग्निदग्धकर्माणि ।
शुद्ध ज्ञानयज्ञीं संतृप्त करितां विज्ञानी । विज्ञानब्रह्म नमो नमो ॥६१॥
यम ह्मणे जी सत्यधर्मा । नित्यानित्यस्वरूप स्वधर्मा ।
समस्त निरसितां जन्मकर्मा । निष्कर्मकर्मा नमो नमो ॥ ६२ ॥
नैऋति ह्मणे जी ज्ञानशस्त्रें । असुरसंपत्ति वारितां ब्रह्मास्त्रें ।
नाना ब्रह्मराक्षस मुक्त करितां ब्रह्मचिन्मात्रें । नित्यमुक्ताय नमो नमो॥६३
वरुण ह्मणे जी करुणानिधि । ज्ञानविज्ञानआत्मबुद्धि ।
तुमच्या दर्शनें आत्मसिद्धि । जगजीवन नमो नमो ॥ ६४ ॥

---

१ चरणांचें स्मरण. २ अष्टदिक्पाल=इन्द्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम व ईशान. ३ अतित=अतिथि, पाहुणा. ४ पूजा. ५ ओवाळून टाकणें.

वायुदेव ह्मणे जी मुख्य प्राण । आत्माराम तूं सर्व सुजाण ।
त्रैलोक्यव्यापक परिपूर्ण । मुख्य प्राणनाथ नमो नमो ॥ ६५ ॥
कुबेर ह्मणे जी मोक्षश्रीमंत । आत्माराम देव अनंत ।
तुझ्या स्वरूपाचा न कळे अंत । अंतप्रांत नमो नमो ॥ ६६ ॥
ईशान ह्मणे जी महेशान । नाना विरूपाक्ष ऊर्ध्वलोचन ।
तुमचें सर्वां सर्वत्र कृपावलोकन । अनंतलोचन नमो नमो ॥ ६७ ॥
अधोर्ध्वदिग्पति म्हणती जी चिदंबर । तुह्मी पावन करितां जगडंबर ।
नाना देव ऋषि मुनि दिगंबर । समस्त नमनें करिताती ॥ ६८ ॥
तुह्मी श्रीराम समर्थ अवतार । हनुमानरूपें सर्वेश्वर ।
तुह्मासी त्रेतायुगीं सामर्थ्यें लाधले वर । कलयुगीं कार्याकारण ऐका जी ॥
सीत उष्ण वात पर्जन्य वन्हि ।
भय रोग पीडा दैन्य शस्त्रपात न करी कोण्ही ।
नाना अमृतफळें प्राप्त विपिनविपिनीं ।
आमुचो दिग्पाळसेवा चरणीं असो ॥ ७० ॥
समर्थें सर्वसंगपरित्याग केला यथार्थ । समर्थासी आज्ञा करितील श्रीरामसमर्थ
धर्मस्थापना भरतखंडीं कृतार्थ । शुद्ध परमार्थ दिसतसे ॥ ७१ ॥
आतां समर्थप्रस्थान पंचवटिकेस आहे । आत्माराम तुमची वाट पाहे ।
तुम्ही आत्माराम सच्चिद्घन सदा हे । आपआपणा भेटावें ॥ ७२ ॥
ऐसें देवस्तवन ऐकोनियां समर्थदेवें । समस्त देवांसी सन्मानिलें सद्भावें ।
म्हणताती तुमचें अर्चन करणें आहे प्रभावें ।
पुनरागमन व्हावें कृष्णातीरीं ॥ ७३ ॥
एवं समर्थमुखीचीं ऐकोनि अमृतोत्तरें । देव अंतर्धान पावले सत्वरें ।
मग प्रस्थान करिजे जगदीश्वरें । जनस्थानत्रिंबकाकडे ॥ ७४ ॥
जनस्थानीं वाट पाहे श्रीराम कृपानिधि ।
अक्रा दिवसें चि हो सीघ्र जाली दर्शनसिद्धि ।
आत्माराम पूर्णकाम हरिहरविधी । पंचायतनी प्रगटले ॥ ७५ ॥

---

1 मोक्षश्रिया आलंकृत.

श्रीरामस्वामि देखिले चतुर्भुज । श्रीरामस्वामि देखिले दिव्य द्विभुज ।
श्रीरामस्वामि करीं धनुर्बाण तेजःपुंज । शंखचक्रगदापद्महस्ती ॥ ७६ ॥
आंगीं भूषणें शत सहस्त्र भानु । कर्णी कुंडलें लक्ष लक्ष भानु ।
मस्तकीं मुकुट किरीटि कोटि भानु । अनंत भानु अंगप्रभा ॥ ७७ ॥
घननीळ कांति इंद्रनीळ कांति । दुर्वादळ कांति तमाळनीळ कांति ।
शुद्ध निर्मळ निश्चळ स्फटिक चंद्र कांति ।
चिदंबरें उजळती ब्रह्मगोळ ॥ ७८ ॥
नाना रूपें वेदशास्त्रीं पुराणीं ऐकिलीं ।
श्वेत लोहित कृष्णें समर्थें देखिलीं ।
सगुण निर्गुण रूपें अनुभविलीं । गंध धूसरीं सुमनमाळीं ॥ ७९ ॥
दिव्य पादुका श्रीचरणकमळीं । रमा वामांगीं जनकबाळी ।
भरत शत्रुघ्न शेष[1] जवळी । श्रीहनुमानस्वामि अभिवंदिती ॥ ८० ॥
नंद सुनंदादि पार्शदगण[2] । सनकादिकादि योगीगण ।
नारदतुंबरादि ऋषिगण । अनंत सुरगण समागमें ॥ ८१ ॥
समर्थें मिठी घातली श्रीचरणकमळीं । येक मुहूर्त मानसपूजा संपूर्ण केली ।
उठोनि सप्रेमें डोळां जव देखिली ।
तंव ब्रह्मगोळीं परिपूर्ण श्रीराम पूजिला ॥ ८२ ॥
श्रीराम पूजूनि पूजाहेतु उरला । आकल्प पूजनाचा संकल्प केला ।
आत्माराम अंतरसाक्षी लाभला । समर्थ कांहीं स्तवनीं प्रवर्तले ॥८३॥
जयजया जी आदिपुरुषा । जयजया जी परमपुरुषा ।
जयजया जी सर्वेशा । उत्पत्तिस्थितिलया व्यापक तूं ॥ ८४ ॥
जयजया जी आदिमूर्ति । जयजया जी मूर्ति अमूर्ति ।
जयजया जी पावनकीर्ति । वेद वाचा स्फूर्ति मौनावले ॥ ८५ ॥
जयजया जी सगुण सगुणा । जयजया जी अगुण अगुणा ।
जयजया जी निर्गुण निर्गुणा । जैशासि तैसा भासती[3] ॥ ८६ ॥

---

१ शेषावतार लक्ष्मण. २ पार्श्वद, अनुचर, सेवक. ३ सगुणाला सगुण, अगुणाला अगुण व निर्गुणाला निर्गुण असा तूं भासतोस.

जय जय मछावतार आदिकूर्मा । जय जय वाराह नृहरि उग्रकर्मा ।
जय जय वामन विक्रमा भार्गवशर्मा । श्रीराम कृष्णवर्मा बोध्य कल्कि ॥
समर्थें द्वापरीं दर्शन दिधलें द्वारकाभुवनीं ।
सांप्रत कल्युगीं दर्शन जनस्थानीं ।
तुझें स्वयंभ बिंब मी हनुमानी । हनुमानस्वामी जाणतसां ॥ ८८ ॥
श्रीरामदास आम्हीं सर्व हि त्वद्रूपें । देव दानव मानव तुझीं च स्वरूपें ।
आत्माराम तुह्मी निजात्मरूपें । धर्मस्थापना करावी ॥ ८९ ॥
ऐसें श्रीरामस्तवन समर्थें केलें ।
श्रीरामसमर्थें कृपावलोकनें आलिंगन दिधलें ।
अवघें राममय ब्रह्मांड जालें । श्रीराम काय अनुवादती ॥ ९० ॥
श्रीरामदास तुह्मी सर्वहि मद्रूपें । देव दानव मानव माझींच स्वरूपें ।
आत्माराम मी निजात्मरूपें । धर्मस्थापना करीन हे ॥ ९१ ॥
आतां धर्मस्थापना करावी तुह्मी । सेव्यसेवकभावें ऐक्य तुह्मी आह्मी ।
सकळ साधुसंतसंकल्प कर्मभूमीं । सिद्धीसी नेईन निर्धारें ॥ ९२ ॥
मज वैकुंठींहूनि जालें येणें । तुमच्या अनुग्रहाकारणें ।
सेव्यसेवकभावें हें बोलणें । येर्‍हिं आत्माराम मी परिपूर्ण ॥ ९३ ॥
ऐसें आत्माराम आपआपणा स्तवन करिती ।
आपण आपणा प्रसन्न होती ।
हनुमानकरीं हनुमानमूर्ति देती ।आकल्प संकल्प सिद्धीसी न्यावे ॥९४॥
श्रीरामसमर्थें कर्णीं उपदेशिलें गुजगोप्यवचन ।
समर्थाचें समर्थें केलें गुरुवाक्यश्रवण ।
तेथील कोण सांगेल महिमान । ग्रंथगर्भीं वदतां न ये ॥ ९५ ॥
श्रीदासबोधीं गुरुवाक्यें प्रगट केलें ।
कर्म उपासना ज्ञान विज्ञान विवरिलें ।
संतसज्जनासी अनुभवा आलें । मी काय जाणे निजवर्म ॥ ९६ ॥

---

१ एरव्हीं. २ जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन । जेणें माझें समाधान । अत्यंत जालें॥ ५६/४७. असें तें वचन ह्मणजे अहं ब्रह्मास्मि माहावाक्य ॥ हें होय.

श्रीरामसमर्थउपासना । आकल्प संकल्प परंपरा जाणा ।
धर्मस्थापना जगजीवना । भरतखंडीं करणें असे ॥ ९७ ॥
आतां जे जे धर्मस्थापनायोग होती ।
ते ते वैकुंठकैलासासी वाक्यार्थ जाती ।
स्वर्गस्थ देव मोहछाहासी येती । आवाहन करितां समर्थें ॥ ९८ ॥
समर्थअवतार निरोपमा । आचार्यस्वामीची[1] साजे उपमा ।
ब्रह्मचर्याश्रमीं परमहंसमहिमा । ब्राह्मण्यरक्षणीं अवतारु ॥ ९९ ॥
ब्रह्मसूत्र आचार्यदेवें रक्षिलें । ब्रह्मारण्य समर्थदेवें संरक्षिलें ।
कलयुगीं संन्यासग्रहण आचार्यें चालविलें । विचारसंन्यास समर्थांचे ॥
आचार्यस्वामी शंकरमूर्ति । समर्थस्वामी महारुद्रमूर्ति
आत्मलिंग आत्माराममूर्ति । दक्षिणामूर्ति दक्षिणें ॥ १०१ ॥
स्मार्त भागवत ऐक्य दोन्ही । श्रीराम समर्थ ऐक्यपणीं ।
भगवत्स्वरूपीं[2] साधुसंतमिळणी । ब्रह्मानंदें स्वानंदें ॥ १०२ ॥
एवं श्रीराम समर्थ जनस्थानीं । अंतर्धानीं ऐक्य जालें धर्मसंस्थापनीं ।
श्रीगुरुचरणीं ऐक्य त्रिवेणी । वेणीगिरिधर विनवीतसे ॥ १०३ ॥
इति श्री समर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥ १०४ ॥
समास द्वितीय ॥ २ ॥ जय जय राम ॥ ७ ॥ छ ॥

---

## ॥ समास तिसरा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे श्रीरामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

सभानायक संतसज्जन बोलिले । समर्थ हनुमानरूपें कलयुगीं प्रगटले ।
समर्थें काय काय प्रताप केले । कृपा करूनि सांगा जी ॥ १ ॥

---

१ जगद्गुरु श्रीशंकराचार्य स्वामींची. २ साधु दिसती वेगळाले। परी ते स्वरूपीं मिळाले । अवघे मिळोन येक चि जाले । देहातीत वस्तु ॥ ७$\frac{३}{३१}$.

समर्थें लोकोद्धारें अवतार धरिले । संतीं लोकोपकारें प्रश्न केले ।
समर्थसेवकें वाक्यार्थ लिहिले । संतसज्जनीं परिसावे ॥ २ ॥
समर्थें प्रताप अद्भुत केले । समर्थें तपश्रम बहुत केले ।
समर्थें रघुनाथसादृश्य केलें । आत्माराम श्रीजगद्गुरु ॥ ३ ॥
समर्थें नाना पंथ शोधिले । समर्थें नाना लोक बोधिले ।
समर्थें नाना लोक वेधिले । हनुमानस्वामी सर्वेश्वरु ॥ ४ ॥
समर्थें भरतखंडीं आटणें केलीं । समर्थें तीर्थें पावन केलीं ।
समर्थें गुप्त प्रगट सामर्थ्यें दाविलीं । सद्गुरुनाथ जगदीश्वरु ॥ ५ ॥
प्रपंचमाया मिथ्या आहे । वैराग्यभाग्य अचळ पाहें ।
ज्ञान विज्ञान सिद्ध चि राहे । परब्रह्म स्वयें निजवस्तु ॥ ६ ॥
ह्मणोनि हिमाळयकुंडीं समर्थ बुडी देती ।
रघुनाथजी समर्थासी वरिच्या वरी धरिती ।
समर्थ समर्थासी गाळिप्रदानें समर्पिती । काय प्रयोजन या देहाचें ॥७॥
तुह्मासी जगोद्धार करणें आहे । तुमची तनु ते आमुची तनु पाहे ।
दोनि तपें तुमची रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणें ॥ ८ ॥
केवळ वैराग्य तीव्रतर केलें । अन्नवस्त्रविवर्जित भलें ।
आतां लोक पीडा पावतील दुष्काळें । कां जे तुह्मी ईश्वरतनु ह्मणोनियां ॥९॥
अग्निहोत्री राजा संन्यासी । देव द्विज मुनि संत साधु उपवासी ।
तरि राष्ट्रभंग होईल निश्चयेंसीं । कां जे आत्माराम सर्व हे ह्मणोनिया ॥१०॥
समस्त देवांसी उपवास पडले । समस्त भूदेव वस्त्रहीन जाले ।
समस्त जीव दरिद्रें पीडिले । तुह्मी अन्न वस्त्र भूषणें धरावीं ॥ ११ ॥
येक वेष तुह्मी न धरावा । येक वेष तुह्मी न करावा ।
भोग त्याग विवेकें विवरावा । त्यागात्याग सर्वज्ञपणें ॥ १२ ॥
श्रीरामआज्ञा दयाळें न मोडिली । समर्थें वस्त्रें भूषणें अन्नें अंगिकारिलीं ।
विश्व आनंदविलें सुकाळीं । सुर नर पन्नग त्रिभुवन हें ॥ १३ ॥

---

१ प्रतापकार वेणीगिरिधरांनीं. २ अटन, पर्यटण, प्रवास. ३ शाश्वत.

मुख्य ७४ पुण्यावचनी योग समर्थाचा । कौपीनी वेष योग हनुमानाचा ।
आजन्म नैष्ठिक योग ब्रह्मचर्याचा । केवळ वैराग्य योग सामर्थ्यपणें ॥ १४ ॥
समर्थरामें मागें वनवास केला । जटाकलापीं हुर्मुजी वस्त्रलपेटा बांधिला ।
भेद्रीं बैसतां हनुमानापासीं दिधला ।
श्री समर्थें चालविला हुर्मुजी वस्त्रबाणा ॥ १५ ॥
काशायांबर नग्न वेत्र । संन्याशासी हें पवित्र ।
समर्थासी दिधलें स्वतंत्र । हुर्मुजी रंग वस्त्र रघुनाथें ॥ १६ ॥
क्षीरशयनें शिरोवेष्टणें अर्पिलीं । पीतांबर भूषणें महालक्ष्मीनें वाइलीं ।
जगदांतरीं अर्चनें चालिलीं । कर्ता भोक्ता श्रीराम ॥ १७ ॥
मुख्य हुर्मुजी रंग मेखळा श्रीरामप्रसाद भारी ।
शशांक मेखळा केवळ शांकरी ।
कृष्णवर्ण ऊर्णमेखळा वातसे मल्हारी । पिवळे धागे भंडारी भरूनियां ॥
गोकुळवृंदावनासी समर्थ गेले । कृष्णकान्हयासी परम प्रीति भेटले ।
कृष्णें घोंगडी कांठी कुब्रडी प्रसाद दिधले । कृष्ण जाडी आवडे समर्था ॥
करवीरक्षेत्रीं दत्तात्रयें सिद्धपादुका । भोजनांतीं समर्पिल्या सम्यका ।
दत्तात्रय केवळ समर्थस्वामीसखा । येकें पात्रीं भोजन केलें ॥ २० ॥
श्रीपांडुरंगयात्रेसी समर्थ आले । कटीं कर काढोनि कोदंडपाणी श्रीराम केले
आत्माराम सर्वी सर्वत्र देखिले । संतसज्जनीं संकीर्तनीं ॥ २१ ॥
कथासमाप्तीं अदृश्य समर्थ जाहाले ।
संतसज्जन ते चि दीक्षा चालऊं लागले ।
विशेष येकांत रामसंतीं सेविले । नमस्कारासी उबगोनियां ॥ २२ ॥
नाना कंठमेखळा श्रीरामकवचें । हुर्मुजी वस्त्र निशाण समर्थाचें ।
नाना प्रतापलीला चरित्र साचें । प्रगट होईल भूमंडळीं ॥ २३ ॥
चित्रविचित्र जाला श्रीराम परेश । चित्रविचित्र समर्थवेष ।
अनंतरूपी आत्माराम जगदीश । स्वसंवेद्य जगद्गुरु ॥ २४ ॥

---

१ 'मागें' हा शब्द बाडांत नाहीं. २ सिंहासनावर. ३ कषायांबर, भगवें वस्त्र. ४ लंगोटी. ५ श्रीविष्णूनें

समर्थासी जगोद्धार करणें आहे । समर्थतनु ते श्रीरामतनु पाहें ।
दोनि तपें श्रीरामें रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणें ॥ २५ ॥
समर्थासी रक्षित दोनि धनुर्द्धारी । समागमें गुप्त असती विपिनविहारीं[1]।
कोठें न विसंबती येक क्षणभरी । आत्माराम समर्थस्वामी ॥ २६ ॥
समर्थासी प्रीति वनफळभोजनीं । नाना आंब्र जांबळें विपिनेंविपिनीं ।
लोकानुग्रहें अन्नभोजनीं । श्रीमंत वस्त्रें प्रावर्णें ॥ २७ ॥
येक वेष नाहीं समर्था । श्रीमंतता आणि उदासीनता ।
निरुपम हे निस्पृहता । औदार्य सर्वसमर्पणीं ॥ २८ ॥
समर्थवाणी प्रथम वदली । पळों पळा ब्रह्मपिसा येतो जवळी[2] ।
येथूनि मौनमुद्रा देवें विसर्जन केली । जगदोद्धाराकारणें ॥ २९ ॥
मागें कित्तेक दिवस भक्षिलीं पुराण चूर्णें ।
कित्तेक दिवस अरद्र[3] शुष्कपर्णें ।
कित्तेक दिवस जळ प्राशन कर्णें । वायो प्राशन केलें नाहीं ॥ ३० ॥
वायोरूप हनुमान आपण । वायो प्राशन न करिती जाण ।
अक्रा दिवसें किंचित अन्नग्रहण । प्रसंगानुसारें समर्था ॥ ३१ ॥
पूर्णपणें पूर्ण न भक्षिती । नाना वरान्न भक्ष भात भक्षिती ।
दधि युक्षुदंडरसावरी[4] प्रीति । लेंकुरें आवडती निराभिमानें ॥ ३२ ॥
हनुमानअवतार सूचनामूर्ति । नाना नागपर्णें सर्वदां सेविती ।
गुरुउचिष्टप्रसाद लोकिकी शिष्य लाभती । त्रयोदशवर्णी तांबूल हे ॥
गिरिकंधरीं समर्थ आसनें । दरीं दर्कुटीं मंचकशयनें ।
कडेकपाटीं धांवती जनें । वैभवआर्चनें करावया ॥ ३४ ॥
वैभवें सांडोनि दुर्गम वनीं । गिरिगुहांतरीं तरुतळ उष्ण शयनीं ।
कोदंडपाणी स्वयें पीतांबरें छाया करूनि । नाना फळीं जीवनीं सान्निध्यें ॥
कठीण स्थळीं अगत्य राहाणें । सिंहव्याघ्रेंसीं हरिहरेंसीं भांडणें ।
निरावलंब कड्यावरी धोत्रध्वजा लावणें । ब्राह्मण्य दावणें सृष्टीसी ॥ ३६

---

१ बाडांत " विपिनगमनी " आहे. २ श्रीसमर्थकृत हें पद सुप्रसिद्ध आहे. आर्तें भेटों येती त्यांस वेड लावितो । रामीरामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥ असा त्या पदाचा शेवट आहे. ३ आर्द्र, ओली. ४ इक्षुरस, उसाचा रस.

कृष्णावाळुवंटीं ब्रह्मचारी पूजिले । रुद्रसंख्या[1] नाभिपर्यंत पुरिले ।
हनुमान पुढें ठाईं ठाईं स्थापिले । जगदोद्धार करावया ॥ ३७ ॥
समर्थें कृष्णेमध्यें भीमकुंडीं[2] बुडी दिधली ।
हनुमानमूर्ति पुरातन निद्रिस्थ उठविली ।
ब्रह्मदेवें त्रेतायुगीं पुजूनि जे प्रासादिली ।
कल्युगीं जागी केलीसे जगदोद्धारा ॥ ३८ ॥
ब्रह्मदेवाचें भविष्यवचन । कल्युगीं हनुमान अवतार होईल जाण ।
आपआपणा जागें करून । जगदोद्धार करील ॥ ३९ ॥
गौतमीतीरीं[3] उत्पन्न होऊन । कृष्णातीरीं रहावया हें चि कारण ।
श्रीरामअवताराचें अखंड स्मरण । पूर्वाख्यान स्मरतसे ॥ ४० ॥
श्रीरामचंद्रस्वामी रावणवधाचे अंतीं । कृष्णास्नान करूनि ध्यानस्थ होती ।
तव महाबळेश्वरापासूनि कृष्णवेण्या दर्शनासी धांवती ।
जळ लोटी मारुती मागें दोनि गांवें ॥ ४१ ॥
कृष्णवेणी विभागिली दोनि बाहें । बाहुक्षेत्र पुराणीं सांप्रत ग्राम बाहे ।
समर्थें कल्युगीं हाक देऊनि लवलाहें ।
जागती जोती काढिली हनुमानरूपें ॥ ४२ ॥
श्रीराम ते चि हनुमान । गुरुपद तें चि देवपद जाण ।
हरिहरविधि ऐक्य आपण । लीळाविग्रही सर्वेश्वरु ॥ ४३ ॥
एवं ब्रह्मदेवें हनुमानमूर्ति पूजिली । पूजनांतीं मूर्ति जळशयन जाली ।
दोनि युगें निद्रा संपादिली । कल्युगीं प्रगटली सामर्थ्यरूपें ॥ ४४ ॥
समर्थें खाद्यनैवेद्यें देवाल्यें भरिलीं । हनुमानें सर्व हि स्वीकारिलीं ।
देवदुंदुभिवाद्यें वाजीनलीं । समर्थें सर्व प्रांत उद्धरिला ॥ ४५ ॥
समर्थ आचरण हनुमंताचें । भाग्य प्रगटलें शुचि श्रीमंताचें ।
केवळ मानवी शरीर ह्मणतां संताचें । वाचेसी दोष लागती ॥ ४६ ॥

---

१ अकरा. २ सातारा जिल्ह्यांत बाहेगांवीं कृष्णा दुभंगून जें बेट बनलें आहे तेथें मागच्या बाजूस हें कुंड आहे. ३ गोदावरीचे तीरीं जांबगांवीं.

समर्थदर्शनें स्पर्शनें माहा दोष नाशती ।
समर्थभजनें पूजनें अविनाश पदें पावती ।
समर्थ हनुमानरूपें आपुल्या मूर्ति । गुरुत्वें स्थापिती सृष्टीमधें ॥ ४७ ॥
प्रथम बाहेक्षेत्रीं रामलिंगीं मूर्तिस्थापना । कृष्णावेणीमध्यें केली बिराजमाना
मग ठाईं ठाईं सर्व हि हनुमाना । हनुमानस्वामी स्थापिती ॥ ४८ ॥
स्थापनेसी येतीं वानरभार । उदंड करिती भुभुकार ।
टाळ्या पिटिती सप्रेम निर्भर । जयजयकार उठती स्वानंदें ॥ ४९ ॥
पराशरपर्वतीं विचित्र वर्तलें । समर्थासी शिवराजें भावें विनविलें ।
स्वामी प्रवर्षगिरिवरि येक रात्रीं राहिलें । पाहिजे आतां गुरुदेवें ॥५०॥
शिवराज्ञा राजाब्रह्मरामआज्ञा आजि नाहीं ।
स्वामी राजाब्रह्मराम तुह्मीच मी पाही ।
हनुमानस्वामी तुह्मी लीलाविग्रहदेही । अनुमान कांहीं असेचिना ॥५१॥
निकें ह्मणोनि सोमतीर्थी केलें संध्यावंदन ।
पुढें अमात्यसदनीं जालें कथानुकीर्तन ।
कथासमाप्तीं समर्थे केलें उड्डाण । पर्वतावरूनि स्वानंदें ॥ ५२ ॥
शिवगणासी परम विस्मय जालें । हनुमानस्वामी प्रत्यया आले ।
अष्ट प्रधान समाधान पावले । लाधलें निधानें जगदोद्धारा ॥ ५३ ॥
समर्थस्वामी जगतारणी । समर्थ हनुमान विचित्र करणी ।
समर्थ सद्गुरु बोधितां श्रवणीं । समर्थ होती सेवकजन ॥ ५४ ॥
अनंत गुण समर्थाचे । काय वदवतील येकि वाचे ।
श्रीगुरु रामचंद्र हनुमान साचे । जगदानंद जगद्गुरु ॥ ५५ ॥
अनंत समर्थाचीं प्रतापचरित्रें । अल्प स्वल्प सांगिजेती वग्त्रें ।
गुरुसंप्रदाईं गुरुदेवस्तोत्रें । श्रवण असावीं सद्भाविका ॥ ५६ ॥
श्रीगुरुभक्तांसी समर्थध्यान । इतरांसी श्रवणसमाधान ।
सर्वांतर्याम प्राणनाथ निधान । षड्गुणसंपन्न कृष्णातीरीं ॥ ५७ ॥

---

१ वरें, २ आश्रय.

बाहोग्रामीं शेंक्तिग्रामीं । मसुराग्रामीं पूर्वग्रामीं ।
उदंबरग्रामीं श्रृंगेग्रामीं । हनुमान स्थापिले समर्थें ॥ ५८ ॥
बाहीग्रामीउपग्रामीं स्थान । मानसग्रामीं पारग्रामीं हनुमान ।
अर्धिष्ठानीं महारुद्र मुख्य प्राणनाथ निधान ।
पूर्वपश्चिमे स्थापिले समर्थें ॥ ५९ ॥
श्रीरामप्रासादपूर्वें माहाद्वार उत्तम । श्रीरामप्रासादवेष्टित संतमहंतआश्रम।
श्रीरामदेवालईं राजांगणें परम । श्रीराम जगन्निवास वृंदावनी ॥६०॥
समर्थें चंद्रेगिरीं निवास केले । पंचाननेसीं समर्थ भांडले ।
कैलासनाथ प्रगट जाले । श्रीरघुनाथस्थापना करावया ॥ ६१ ॥
समर्थासी महारुद्रें कौतुक दाविलें । रुद्रसंख्या अर्भकीं वाळुवंटीं पुरिलें ।
समर्थें योगधारण तेंव्हां प्रगटिलें । कृष्णांपूर गेले आंगावरुनि ॥ ६२॥
मग अक्रारुद्र ब्रह्मच्यारी । समाधी उच्चाटण करिती भारी ।
आनंद जाला कृष्णातीरीं । जयजयकारीं नभ पूर्ण ॥ ६३ ॥
शिवराजासी वृत्तांत कर्णोपकर्ण गेले । दर्शनासाठीं डोंगरोडोंगर लागले।
समर्थदर्शन होय ना उदास जाले । राजकार्य कांहीं सुचेच्चिना ॥६४॥
शिवराजें शिंवतरीं चमत्कार देखिले ।
करतळस्फोटक स्मरणें तात्काळ शमले ।
स्वप्नीं समर्थ प्रसाद देऊनि गेले । महा नदी उतरूनियां ॥ ६५ ॥
कोण्ही राजदर्शनासी अनुष्ठानें करिती । समर्थपाईं राजराजेंद्र लागती ।
समर्थ केवळ अवतारमूर्ति । हनुमानरूपें सर्वेश्वर ॥ ६६ ॥
हनुमान आपण समर्थपणें । तरि वैराग्यतप कासया कारणें ।
अहो लोकांत नाहींत जें जें आचरणें । तें तें करणें समर्था ॥ ६७ ॥

---

१ बाहेगांवीं. २ माजगांवीं. ३ शहापुरास ४ उंब्रजेस ५ शिंगणवाडीस. ६ शिराळ्यास. ७ मनपाडळेंगांवीं ८ चाफळास. ९ चरेगांवच्या मागचा डोंगर. तंजावरमठपति भीमस्वामीकृत श्रीसमर्थचरित्र पहावें. चंद्रगिरीचा डोंगर । त्यांत येक गुप्त शिखर । तेथें राहे योगेश्वर । निरंजन ॥ १० कृष्णानदीचे पूर. ११ शिवथरच्या घळींत.

समर्थ हनुमान ऐक्यरूप निर्धारीं । जैशा सिंधूमध्यें द्वैतरूप लहरी ।
आपुले आपण चराचरीं । खेळ खेळती स्वानंदें ॥ ६८ ॥
समर्थासी सर्वदां पर्वतीं राहाणें । शिवराजासी सदां पर्वतदुर्गें बांधणें ।
समर्थदर्शनें माळा छत्र पावणें । छत्रपति होणें स्वामीप्रतापें ॥ ६९ ॥
दीर्घदंड नमस्कार घालूनि । चरणपादुका मस्तकीं धरूनि ।
राज्य पावला क्षत्रिय दाक्षणी । द्विजराज्य दिधलें समर्थें ॥ ७० ॥
समर्थें शिवराजाचा करारभाव पाहिला ।
शिवें वर्जिला तो तांबुल दिधला ।
शिवगणें हनुमानरूपें प्रसाद घेतला । मुखांत घातला अविलंबें ॥७१॥
पुढें करनाटक हस्तगत केलें । समर्थध्यान तेथें आठविलें ।
अभिजितीं येळूरीं दर्शन दिधलें । कृष्णातीरीं तेव्हां समर्थ ॥ ७२ ॥
शमनपीर समर्थें परीक्षिले । शमनपीरें समर्थ अजमाविले ।
मार्तंडपुरीं गिरिवरी भले । येतां जातां अभिवंदिती ॥ ७३ ॥
कोण्ही येक फकीर आंबे वांटित बैसले ।
समर्थें हजारोंहजार आंबे मागों धाडिले ।
बेजार फकीर होऊनि गेले । मग आम्रवृक्ष लाविले हजारों देवें ॥७४॥
श्रीरामअवतारीं नरापरिस वानर भले । जेहिं सुरवरबंध सोडविले ।
समर्थें नरदेह कलयुगीं थोराविलें । नर ते चि केले नारायण ॥७५॥
समर्थें येकदां कौतुकें नीच यातीस चढविलें ।
ब्राह्मणतेज प्रत्यया आणिलें ।
सहस्र अंतेजासी येकसरें पिटिलें । कल्याणनामा दूत प्रेरूनियां ॥७६॥

---

१ शके १६५१ च्या पूर्वींचा हा ग्रन्थ असल्यामुळें गिरिधरांनीं दिलेली ही साक्ष विचारांत घेण्यासारखी आहे. २ दाक्षिणी, दक्षिण देशाचें. ३ ब्राह्मणाचें राज्य. श्रीसमर्थांनीं महाराजांना परत दिलेलें. ४ महाराजांनीं विडा वर्ज केला होता असें दिसतें. श्रीसमर्थांनीं एकदां विडा दिला तो मारुतीचा प्रसाद ह्मणून त्यांनीं स्विकारला. ५ अभिजित् नक्षत्रावर किंवा मुहूर्तावर. ६ वेळूर मुक्कामीं. ७ मार्तंडपुर ह्मणजे पाली. पालीस खंडोबाचें स्थान प्रसिद्ध आहे. उंब्रजेहून पालीस जातांना वाटेंत शिरगांवाजवळ एका डोंगरावर शमनामीरपीराचें स्थान आहे.

समर्थसंगें येक नाथपंथी बाळक । गिरिगुहांतरीं तत्पर असे सेवक ।
समुदाईं मग गुप्त जाला देख । केवळ रघुनायक निर्धारें ॥ ७७ ॥
समर्थ येकदां कौळिकवचनें गुहांतरीं प्रवेशले ।
हस्तेंकडगें देऊनि कौळिकमागें फिरविले ।
शिवराजें कौळिक भांड्यौंमुखीं बांधविले ।
समर्थ धांवण्या धांविले अक्रा दिवसें ॥ ७८ ॥
अक्रा दिवस समर्थ गुहांतरीं फिरले । परमभाग्यें पुन्हा देखिले ।
समर्थाविणें लोक आंधळे होते जाले । संसारतमामाझारी ॥ ७९ ॥
आनंद जाला कृष्णातीरीं । घोष दाटला जयजयकारीं ।
समाचार गेले रायेरी । शिवराज दाटला स्वानंदें ॥ ८० ॥
मग समर्थें अवतारभूमीचें अवलोकन केलें ।
श्रीराणाबाई मातेसी दर्शन दिधलें ।
श्रेष्ठांसी समर्थें नमस्कारिलें । कीतियेक दिवसां पातले कृष्णातीरा ॥८१॥
एवं समर्थप्रताप वर्तमान । वेणीगिरिधरें केलें निवेदन ।
पुढें श्रीरामसमर्थसंस्थापन । समर्थ चांफळीं करिताती ॥ ८२ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥ ८३ ॥
समास तृतीय ॥ ३ ॥ जय जय राम ॥ ॥ ॥

---

१ कौलिक=मांत्रिक. २ हातांतील कडें (?). त्या मांत्रिकानें भारलेलें कडें समर्थांना देऊन त्यांना आपल्या मागें मागें फिरविलें असावें, असा अर्थ दिसतो. ३ तोफेच्या तोंडीं. ४ जन्मभूमि जांब. ५ ही गोष्ट शके १५७६ तील असावी असें अनुमान स्वानुभवदिनकर कलाप १६×४ वरून होतें. ६ पुढें ह्मणजे पुढच्या समासांत. कालानुरोधानें पुढें ह्मटल्यास क्रम जुळत नाहीं; कारण चाफळीं श्रीरामसंस्थापना शके १५७१ चें सुमारास झाली. बाकी कालक्रमानुसार कथा सांगितलेली हि दिसत नाहीं. कर्नाटकावर शिवाजी महाराजांची स्वारी शके १५९९ चे सुमारास झाली होती.

## ॥ समास चवथा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे श्रीरामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

समर्थें दिव्य पुरातन सामर्थ्यमूर्ति। श्रीगंडकी काढोनि आणिली मध्यरात्रीं।
ग्रामस्थ सहस्त्रावधि शस्त्रपाणि धांवती । समर्थ दृष्टि पडेतिना ॥ १ ॥
चांफळ चंपावतीसी केली श्रीराममूर्तिस्थापना ।
विमळ मांडवीनदीतीरीं जाणा ।
देव देवता देवतें भूतें नाना । समर्थें सर्व हि समजाविलीं ॥ २ ॥
अनन्य भूतें दैवतें दोनीं ठेविलीं । येक्या नारेळें संतृप्त केलीं ।
रथोत्साहापूर्वि सन्मानिलीं । इतरासी रिघों देईतना ॥ ३ ॥
पूर्वे लंबोदर समर्थें बैसविले । मागें पुढें मारुति स्थापिले ।
मध्यें देवालईं श्रीरघुनाथजी अर्चिले । आकल्प संकल्प समर्थाचा ॥४॥
चंपावतीभोंवतीं पुष्पावती तीर्थें । पावनें केलीं स्वामिसमर्थें ।
श्रीगुरुचरणीं भावार्थें । परत्र पार पावविती ॥ ५ ॥
धन्य चंपावतीपुरवासी । सुखसेजे श्रवण कीर्तनें जयासी ।
धन्य पंचक्रोशीग्रामनिवासी । ध्वनि कर्णासी यात्रेच्या ॥ ६ ॥
पारग्रामीं पाराशरप्रांतीं येक उछह केले ।
चंपावतीहुनि श्रीरघुनाथजी आणविले ।
चरेगांवीं वनीं सिबिकारूढ हटले । समर्थें विनविले पत्रार्थें ॥ ७ ॥
नृसिंहराय नामा अधिकारी । श्रीरघुनाथजीसी पत्र निवेदन करी ।
सिबिका थोपिली चंपकसुमनापरी । पारग्रामा पातले रघुनाथ ॥ ८ ॥
समर्थें रामनौमी उछह केले । पुन्हा श्रीराम चांफळासी आले ।
मग पंचक्रोशीबाहेरी राम न गेले । चांफळखोरें मानलें ॥ ९ ॥

---

१ श्रीक्षेत्र चाफळास श्रीरामाच्या पुढें दास मारुति व मागें प्रताप मारुति स्थापिले असून दास मारुतीच्या पाठीमागें पूर्वेकडे लंबोदराची स्थापना केलेली आहे.

देव देवता देवतें भूतें । अज्ञेमध्यें ठेविलीं समर्थें ।
सद्गुरु स्वामीचीं दैवी सामर्थ्यें । हनुमानरूपें कृष्णातीरीं ॥ १० ॥
दंडनाथ मार्कंडेश्वर । कोपनाथ संगमेश्वर ।
रवळनाथ सिद्धेश्वर । समुद्रेश्वर येती यात्रेसी ॥ ११ ॥
गोकर्णादि करवीर दक्षिण तीर्थें । हिमकेदारादि उत्तर तीर्थें ।
पूर्व तीर्थें पश्चिम तीर्थें । अधोर्ध्व पन्नग तीर्थें येती यात्रेसी ॥ १२ ॥
धारेश्वर मोरेश्वर चांपेश्वर रुद्रेश्वर। धोपेश्वर कोपेश्वर कोटेश्वर हरिहरेश्वर
पूर्वेश्वर पश्चिमेश्वर उत्तरेश्वर दक्षिणेश्वर। अधोर्ध्व पन्नगेश्वर येती यात्रेसी ॥
दैत्रीमंत्रें देव आव्हानिले । ते ते सर्व हि चांफळासी आले ।
समर्थें सर्व हि सन्मानिले अर्चिले । समर्थध्यान अवलोकिती ॥१४॥
नाना पंथीं पंथ जे बोलिले । ते ते सद्गुरुपंथें चालिले ।
समर्थें सर्व हि शुद्ध सन्मार्गीं लाविले । सद्गुरुध्यान विलोकिती ॥१५॥
सद्गुरुस्वामीचें निर्गुण ध्यान । लीळाविग्रहें सगुण ध्यान ।
जेणें केलें श्रीराममूर्तिसंस्थापन । तेंचि ध्यान वर्णीन हो ॥ १६ ॥
माथां निर्मळ केशरी पाग लपेटिली आहे।
सुमनावतंसें मुक्तलग तुरे पाहें ।
केशर कस्तुरी भाळीं झगमगिताहे । रत्नाक्षता झळकती ॥ १७ ॥
आकर्ण नयन कृपावलोकन । कर्णीं मुक्तमुद्रा विराजमान ।
नास्तिकांसी देऊनि आस्तिक ज्ञान । सरळ नासिका विराजे ॥ १८ ॥
निजबोधमुखें बत्तिसी झळकली । अधरामृतें स्वर्गामृतें निवालीं ।
कंठीं मुक्तलग मेखळा आपाद शोभली । कांची मेखळा कटिसूत्रें॥१९॥
कौपिनावरुता पीतांबर । लीळा कासिला चिदंबर ।
आपाद मुक्तमाळा मनोहर । मुक्तपणा नातळती ॥ २० ॥
आपाद सुमनमाळा विराजती । नाना पर्णमाळा हेरित शोभती ।
नवरत्नमाळा नवविधा दिसती । करांगुळीं झळकती निजमुद्रिका॥२१॥

---

१ पटका (?) २ हिरव्या.

नाना त्रिविध त्रिपुटी तापशमन । केवळ निर्मळ बावन[1] चंदन ।
समर्थासी सर्वांगीं जाला लीन । अव्यंग अंगदर्शन दावितसे ॥ २२ ॥
उत्तर सिद्धांत उत्तरीय वस्त्र । निर्मळपणें सूक्ष्म स्वतंत्र ।
सर्वांगध्यान दावी विचित्र । दिव्यांगभूषणें विभूषणें ॥ २३ ॥
निजपदीं पादुका झळकती । निजकरीं मोक्ष कैवल्य विराजती ।
बद्धता मुक्तता नित्यमुक्त विसरती । मननशीळ गुरुपाईं ॥ २४ ॥
कोटिपूर्णचंद्र कळंकरहित । पूर्णीं पूर्णपणाविरहित ।
नाना ज्ञानप्रकाशें उदई येत । उपमे न येत श्रीगुरुपाईं ॥ २५ ॥
अचळ सिंह्यासनीं अचळ मूर्ति । निर्मळ निश्चळ स्वरूपस्थिति ।
सर्वेश्वर ह्मणे जी सद्गुरु मूर्ति । माझी मायोपाधि स्फूर्ति चालेना ॥ २६ ॥
भोंवतीं अनंत बैसलीं सज्जनवृंदें । अनंत दाटलीं ब्रह्मवृंदें ।
सर्व हि अभेद देखती श्रीगुरुपदें । सच्चिदानंदें संतोषती ॥ २७ ॥
विशाळ मंडप गगनस्थानीं । गगनसदृशं गुरुमूर्ति ध्यानीं ।
नयनीं नयन गेले हारपोनि । सद्गुरुध्यान राहिलें ॥ २८ ॥
ऐसें सद्गुरुसमर्थध्यान । सगुण ध्यान निर्गुण ध्यान ।
सर्वत्रांचें समाधान । कृष्णातीरीं देखिलें ॥ २९ ॥
समस्त देवांचें आवाहन केलें । समस्त देवीं बीजें[2] केलें ।
समस्त देवांसी सन्मानिले अर्चिले । सद्गुरुनाथसमर्थें ॥ ३० ॥
एवं श्रीराममूर्तिसंस्थापन । वेणीगिरिधरें केलें निवेदन ।
पुढें समस्त देव देवता करिती गुरुदेवस्तवन । संत सज्जन परिसती ॥ ३१ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ३२ ॥
समास चतुर्थ ॥ ४ ॥ जय जय राम ॥ ॥ ॥

---

१ बावन चंदन=मैलागरु चंदनवृक्ष. २ निरनिराळ्या देवतांचें आवाहन करण्याचे जे विशिष्ट मंत्र असतात त्या मंत्रांतील सांकेतिक शब्दांना बीज ह्मणतात.

## ॥ समास पांचवा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

मागां सद्गुरु समर्थध्यानें । श्रीरामसंस्थापनावर्तमानें ।
पुढें कथानुसंधानें । संतसज्जनें परिसावीं ॥ १ ॥
आतां आदिमुन्ह्याचीं[1] आदिदैवतें । स्मरणरूपें स्मरण करितां समर्थें ।
प्रेमप्रीतीनें धाविलीं समस्तें । श्रीगुरु वंदुनि अनुवादति[2] ॥ २ ॥
समर्थें केली चांफळीं श्रीरघुनाथस्थापना ।
आह्मासी पूर्ण जाला आनंद मना ।
आह्मी सर्व हि लागों गुरुदेवभजना । गुरुदेवयात्रा संरक्षूं ॥ ३ ॥
आदिशक्ति सीता मूळमाया । नाना विग्रहें[3] नाना काया ।
मुळींच्या अंशांशें आह्मी सद्गुरुराया ।
आमुची उपेक्षा तुह्मी न करावी ॥ ४ ॥
प्रथम जानाई देवी ह्मणे जी जनार्दना ।
आमुची स्थापना करावी संतसज्जना ।
विध्न लागों स्वसुखें समर्थभजना । आमुचा सन्मान राखावा ॥५॥
धानाई देवी ह्मणे जी धन्य आह्मी । डोळा देखिले समर्थस्वामि ।
निःकाम भजों मंगळधामीं । आमुचा उछेद देवें न करावा ॥ ६ ॥
ज्ञानाई देवी ह्मणे जी ज्ञाननिधि । तुझ्या दर्शनें आत्मसिद्धि ।
ज्ञानविज्ञान दासबोधीं । समर्थें सर्व हि सांगितलें ॥ ७ ॥
माउल्या देवी ह्मणती श्रीगुरु माउली । तुमच्या लागों नित्य पाउलीं ।
समर्थें रघुनाथस्थापना केली । आमुची उथ्थापना न करावी ॥ ८ ॥
जळींच्या देवी ह्मणती श्रीगुरुचरणजळीं । क्रीडा करूं आह्मी आनंदकल्लोळीं ।
नाना मानससरोवरीं सकळीं । सुखस्वानंदें राहों जी ॥ ९ ॥

---

१ सह्याद्रीपर्वताजवळील प्रदेशास मुन्हें ह्मणतात. २ श्रीगुरु वंदुनि गौप्यरूपें अनुवादती ॥ असा चरण बाडांत आहे. ३ साकार देह.

आसरा देवी ह्मणती आह्मासी गुरुदेव आसरा ।
त्यावीण नेणों आणिक देव दुसरा ।
संतसंग तो चि आह्मा दिवाळि दसरा । सद्गुरुचरण सेऊं जी ॥१०॥
जखिणी देवी ह्मणे जी सर्वकर्तारा । आह्मी अंतरलों कर्मदेह भर्तारा ।
आतां जीवबुद्धि सारूनि शिवबुद्धियोगें तारा ।
श्रीगुरु परपारा भवसिंधु ॥ ११ ॥
मानविणी देवी ह्मणे जी जळो अभिमान । स्वस्वरूपें करीं निराभिमान ।
आमुचा कायसा बहुमान । मानापमान गुरुपाईं ॥ १२ ॥
मंगळाई देवी ह्मणे श्रीगुरु वरिष्ठा । ज्ञानविज्ञानबळें बळिष्ठा ।
सप्तऋषि गिरिवरि माझी प्रतिष्ठा । अनंत गिरिवरि व्यापक तूं ॥१३॥
येमाई देवी ह्मणे जी गुरुछत्रछाईं । अनंत छात्रवर्ग तुमच्या पाईं ।
मी मी बोलती नरलोक काई । व्यस्ताव्यस्त समस्त हे ॥ १४ ॥
तुकाई देवी ह्मणे आह्मी अनन्या । श्रीगुरुउदरीं परत्र कन्या ।
कलयुगीं योषिता परम धन्या । व्यासवचन मान्या मानावें ॥ १५ ॥
फिरगाई देवी ह्मणें मी विद्यारूपें फिरतां ।
ब्रह्मांड नुपुरे मज ब्रह्मीं विचरतां ।
भवस्वर्गीं कोण्ही दृष्टि फिरवितां ।
चौऱ्यासीं लक्ष योनि फिरवीन मी ॥ १६ ॥
घंटा देवी ह्मणे मी श्रीरामघाटीं । श्रीगुरूभक्तीच्या परिपाटीं ।
गुरुनिंदकाची पिळीन घांटी । बोल न बोलवीं दुसरा ॥ १७ ॥
नवलाई देवी ह्मणे गुरुदेवें नवलें केलीं ।
नाना ज्ञानशक्तीचीं संस्थानें रक्षिलीं ।
नाना औटपीठें ॐकारें दर्शना आलीं । राजस तामस सात्विका शक्ति ॥
जाखाई देवी ह्मणे जी जगदीशा । आत्मारामा स्वामी परेशा ।
आमुंची स्थापना राहों द्या सर्वेशा । सर्वस्वें होऊं अनुकूळ ॥ १९ ॥

---

१ कोल्हापुर, तुळजापुर, मातापुर अशीं तीन व सप्तश्रृंगचें अर्धें अशीं साडे तीन स्थानें.

जुगाई[1] देवी ह्मणे जी श्रीगुरुदेवा । जुगें[2] भजेन तुज देवदेवा ।
माझी चालवावी लौकिक सेवा । उच्छेद समर्थें न करावा ॥ २० ॥
पिंपळाई देवी ह्मणे जी नारायणा । अश्वस्थ[3] संसार हा स्वस्थ नाहीं जाणा
सद्गुरुकृपें कळलें आपआपणा । तुमचें भजन घडावें ॥ २१ ॥
मळाई देवी ह्मणे श्रीगुरु निर्मळा । तुझ्या लागेन चरणकमळा ।
नाना मायामळ त्यागुनि विमळा । गुरुकृपानदी सेवीन जी ॥ २२ ॥
उदगिरि देवी ह्मणे स्वामीसी । देवा तूं उदयगिरिवरि पावलासी ।
आमुचा पूजामान चालवी जनासी । तुझ्या भजनासी विश्व लाऊं ॥२३
विठलाई देवी ह्मणे सांगों काई । विठल पांडुरंग माझा भाई ।
कथाकीर्तनीं मी तिष्ठेन पांही । आवडी मजला नामाची ॥ २४ ॥
संताई देवी ह्मणे संत महंता । मोक्षश्रिया विराजमान अनंता ।
तुझी सेवा भाग्यवंता । पुण्यवंता घडेल जी ॥ २५ ॥
कुंभजाई देवी ह्मणे तूं नाना घटीं । पूर्ण व्यापक ब्रह्मांडमठीं ।
तुझ्या चरणीं मी घालीन मिठी । आत्माराम मज दावी ॥ २६ ॥
विंजाई देवी ह्मणे मी विंजवनीं । वाट पाहत होतें संतसज्जनीं ।
समर्था तूं जनीं विजनीं । दर्शन देसी स्वानंदें ॥ २७ ॥
पिसाई देवी ह्मणे जी श्रीगुरुस्वामि । स्वरूप सोवळी मी परब्रह्मीं ।
नाना राजकी स्पर्शे कर्मभूमि । दोन्हि स्तन म्या विसर्जिले ॥ २८ ॥[4]
सोमजाई देवी ह्मणे निःकळंक सोमा । सकळ संत सार्वभौमा ।
सद्गुरुनाथा सर्वोत्तमा । उत्तमोत्तमा सुखमूर्ति ॥ २९ ॥
तामजाई देवी ह्मणे तूं रजतमरहित । शुद्ध सत्वातीत अपरमित ।
तुझें कोण करील परमित । दर्शन घडलें अपूर्व जी ॥ ३० ॥
वागजाई देवी ह्मणे तूं वाग्वाणी । अगोचर तूं ब्रह्म निर्वाणीं ।
मनोवाचातीत निखळ निर्गुणी । सगुण सगुणी सर्वेश्वरा ॥ ३१ ॥

---

१ अंबा जोगाई. २ युगें, युगानुयुगें. ३ बाडांत " अश्वथ्थ " असा पाठ आहे, ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ॥ ४ मूळ स्वरूपानें परब्रह्मीं मी सोवळी आहे पण राजकारणासाठीं कर्मभूमीचा मला विटाळ झाला आहे.

खंडजाई देवी ह्मणे तूं अखंडी । व्यापूनि अससी अनंत ब्रह्मांडी ।
प्रपंच माया ज्ञानशस्त्रें खंडी । अखंडता द्यावी स्वरूपीं ॥ ३२ ॥
मुद्गला देवी ह्मणे समर्थातें । तुह्मी संस्थापिलें परमार्थातें ।
नाना विद्यारूपें आह्मातें । सद्गुरुनाथें संरक्षिलें ॥ ३३ ॥
नादलाई देवी ह्मणे मी नादेन पाई । समर्थासी मी न मगेन कांहीं ।
माझें अधिष्ठान तूं शाश्वत पांहिं । आत्माराम निरंजन ॥ ३४ ॥
निनाई देवी म्हणे मी श्रीचरण सेवीं । माझें घरीं तूं आजि जेवीं ।
पुष्पें फळें द्वीपांतरीचीं आणावीं । परत्र पारणा करवीं जगद्गुरु ॥३५॥
अंगलापुरीची अंगलाई । सज्जन पर्वतीं तुह्मासी भेटेल पांहीं ।
तुळजापुरीची तुळजाबाई । प्रतापपर्वतीं देवी भेटेल ॥ ३६ ॥
ऐसीं आदिमुख्यांचीं आदिशक्तिरूपें । समर्थासी स्तविती आपुलाल्या स्वरूपें ।
सद्गुरुस्वामीच्या प्रतापें । सर्व हि सेवेसी लागली ॥ ३७ ॥
राजस तामस सत्व शक्ति । शुद्धसत्वीं प्रवेशल्या मति ।
समर्थ सद्गुरु अवतारमूर्ति । उद्धार केला सकळांचा ॥ ३८ ॥
सकळ शक्ति अनुवादल्या पाहीं । प्रकृतिपुरुषीं भिन्नभेद नाहीं ।
कोण्ही येक वाणी अनुवादती देहीं । वाणी प्रवर्तक सर्वेश्वर ॥ ३९ ॥
प्रकृतिपुरुष अनुदिनीं अनुवादतां दिसती ।
तेथें चतुर्विधा वाणी च स्तवनीं प्रवर्तती ।
वेदमाता मूळ श्रीसरस्वती । ॐकाररूपिणी स्तवनार्थें ॥ ४० ॥
एवं अनंत ब्रह्मांडीचीं दैवतें आलीं । समर्थासी सर्व हि स्तवितीं जालीं
नाना शुभ सन्मानें सन्मानिलीं । थानकासी धाडिलीं गुरुदेवें ॥ ४१ ॥
अनंत ब्रह्मांडीचे सर्वेश्वर । समर्थासी मानिती ब्रह्म परात्पर ।
हनुमानरूपें श्रीमहेश्वर । अनंत अनंतीं स्तविले हो ॥ ४२ ॥
अनंताचें अनंत गुणवर्णन । ग्रंथविस्तारें वाढेल संपूर्ण ।
पुढें समस्त देव करितील गुरुदेवस्तवन । वेणीगिरिधर ह्मणताहे ॥४३
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ४४ ॥
समास पंचम ॥ ५ ॥ जय राम ॥ ॥

---

२ आपआपल्या स्थानाप्रत.

## ॥ समास साहावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां सद्गुरुसमर्थध्यानें । श्रीरामसंस्थापनावर्तमानें ।
सेवकें केलीं निवेदनें । संतसज्जनीं ऐकिलीं ॥ १ ॥
समस्त देवांचें गुरुदेवें आवाहन केलें । समस्त देवीं गुरुपदीं बीजें केलें ।
समस्त देवांसी गुरुदेवें सन्मानिलें अर्चिलें । आत्मयारामी आरामी ॥२॥
नाना आत्मलिंग आत्माराम मूर्ति । सद्गुरुनाथ पावन कीर्ति ।
नाना ज्योतिर्लिंगें स्तवन करिती । संत परिसती स्वानंदें ॥ ३ ॥
प्रथम हिमकेदार म्हणे जी गुरु ब्रह्ममूर्ति । त्रिविधतापशमन सत्कीर्ति ।
नाना उत्तरपंथें मायाआवर्तीं[1] । परत्र पार तुमचेनि ॥ ४ ॥
विश्वेश्वर ह्मणे तारक ब्रह्म । जगदोद्धारक पूर्ण ब्रह्म ।
दशदेहांतीं परब्रह्म । मुक्तपुरीसी[2] नादवितां स्वानंदें ॥ ५ ॥
सोरटीनाथ ह्मणे तुजकारणें । शंभुशिखरीं कोथळागिरीसी मज येणें ।
तथा दक्षिण केदारें केलें पेणें[3] । करवीरसान्निधीं सान्निधीं ॥ ६ ॥
माहाकाळ म्हणे अघटित घडे । दुर्द्धर काळ तुझिया पायां पडे ।
त्रिकाळ अबाधित स्वरूप सांपडे । उत्पत्तिस्थितिलया अतीत ॥ ७ ॥
ॐकार म्हणे अमळ विमळा । श्रीगुरुदेवा निर्मळ निश्चळा ।
ॐ पुण्यावचनीं सुलग्न सोहळा । सावधान समईं साधिला तुम्ही ॥८॥
ब्रह्मगिरि म्हणे ब्रह्मनिदानी । स्वरूप अनुष्ठिलें जनस्थानीं ।
सज्जनगिरिवरि मोक्षप्रदानी । सुखस्वानंदें नादावें ॥ ९ ॥
घुर्श्मेश्वर[4] म्हणे परम पावना । त्रिदोषहरणा ब्रह्मविभावना ।
नाना देवगिरिप्रांतीं[5] आत्मलिंगभावना । सदा सर्वदां कारितसों ॥१०॥

---

१ मायेच्या भोंवऱ्यांत. २ काशीस. ३ पेणा=मुक्काम. ४ घृष्णेश्वर.
५ देवगडाजवळ वेरूळास.

नागनाथ म्हणे तूं ब्रह्मविशेष । जेथें सर्व हि जालें अशेष ।
माया अविद्या गेली निशेष । श्रीदासबोधग्रंथार्थें ॥ ११ ॥
वैद्यनाथ म्हणे श्रीगुरुनाथ । नाना भवरोग पर्यळीं वैद्यनाथ ।
पर्यळीपर्वतीं त्रैलोक्यनाथ । सुखस्वानंदें नादसी ॥ १२ ॥
भीमाशंकर ह्मणे जी विश्व धन्य । तुम्ही आम्ही कांहीं न हों अन्य ।
भीमातीरीं साधुसंत मिळती अनन्य । निजगुह्यार्थ प्रगटिती ॥ १३ ॥
श्रीशैल्य ह्मणे मी कृष्णातीरीं । पाताळ नीळ गंगेसी निवास करीं ।
सर्वांतर्याम चराचरीं । कृष्णातीरस्थ चिंतितसें ॥ १४ ॥
श्रीरामनाथ ह्मणे तुह्मी आत्माराम । श्रीरामदासस्वामी धरितसां नाम ।
नामरूपातीत परब्रह्म । सर्वेश्वरत्वें अवतरलां ॥ १५ ॥
आत्मलिंग आत्मयारामी । नाना ज्योतिर्लिंगीं ऐक्य तुह्मी आह्मी ।
निर्मळ निश्चळ परब्रह्मीं । सुखस्वानंदें सर्वदां ॥ १६ ॥
भावासारिखे गुरुदेव फळद्रूप । अज्ञान देखती मनुष्यरूप ।
ज्ञानी देखती सत्य स्वरूप । जैशासी तैसे भासतसां ॥ १७ ॥
संत भगवंतरूप निर्धारें । काय जाणती अज्ञान पामरें ।
संतगुरुपद वंदिजे सर्वेश्वरें । मायोपाधि निरसावया ॥ १८ ॥
ऐसीं ज्योतिर्लिंगें स्वयंज्योति । समर्थ स्वामीचीं स्तवनें करितीं ।
दशावतार प्रसंगें दर्शनासी येती । निजरूपें स्तविती समर्था ॥ १९ ॥
दशावतार दर्शना आले । मछकूर्मादि स्तविते जाले ।
अपूर्व गुरुमहिमा अनुवादले । संत सज्जन परिसती ॥ २० ॥
मछावतार म्हणे मी वेदोद्धारीं । अकांड[1] प्रळई रक्षणकारी ।
ब्रह्मांडप्रळईं ब्रह्म निर्विकारी । दाऊनि देसी गुरुदेवा ॥ २१ ॥
कूर्मावतार म्हणे देवा । आम्ही मंदरभूगोळ मात्र धरावा ।
ब्रह्मीं ब्रह्मभाव सद्भावा । भार अभार हा गुरुदेवीं ॥ २२ ॥
वराहस्वामी म्हणे स्वामी । धरणीधर येक मात्र आम्हीं ।
जगदोद्धरणीं परब्रह्मीं । नाना हिरण्याक्ष तुम्ही संव्हारितां ॥ २३ ॥

१ अकालिक, अनपेक्षित.

लक्ष्मीनृसिंह म्हणे आम्ही हिरण्यकशपु । कर्मसमुच्चय वारिला[1] रिपु ।
नाना काशपसृष्टिंतमांतक दीपु । सद्गुरु तुम्ही सुखमूर्ति ॥ २४ ॥
वामन म्हणे जी आम्ही कापट्यमेळीं । याचकवृत्ति जिंकिला दैत्य बळी. ।
सद्गुरुसमर्थ तुम्ही माहांबळी । अहंकार पाताळीं घालितां ॥ २५ ॥
भार्गवराम म्हणे तुम्ही अद्भूत केलें । नाना जामदग्न्यगोत्र जग उद्धरिलें ।
ब्रह्मांश अंशीं अंशासी तुम्ही मेळविलें । आत्माराम सुखमूर्ति ॥ २६ ॥
श्रीराम म्हणे तू आत्माराम अद्वय । स्तव्य स्तवन स्तविता राममय ।
सच्चिदानंद सच्चिद्घन चिन्मय । परब्रह्म तूं सनातन ॥ २७ ॥
श्रीकृष्ण म्हणे मी सर्वांतरीं । कृष्णातीरीं रामरूपें राहिलों निर्धारीं ।
नाना गीताभागवतार्थ ग्रंथांतरीं । श्रीदासबोधीं निर्धारिला ॥ २८ ॥
बोध्यावतार म्हणे तुम्ही निजबोधरूपें ।
कर्म उपासना ज्ञान विज्ञान स्वरूपें ।
नाना पाषांड वारूनि सद्गुरुरूपें । आकल्प स्वानंदें नादतसां ॥ २९ ॥
कल्कि म्हणे जी कारण[2]कारणा । नाना असुर[3]दारणदारणा ।
पूर्णावतार लीलावतरणा । तारक ब्रह्म गुरुमूर्ति ॥ ३० ॥
ऐसें दशावताराचें गुरुदेवस्तवन । ऐक्यीं ऐक्यरूप परम पावन ।
भिन्नभेद सोडोनि संतसज्जन । सुखस्वानंदें परिसती ॥ ३१ ॥
नाना अवतार ज्योतिर्लिंगें । नाना देवावतार स्तविती प्रसंगें ।
सर्व हि वर्तती आत्मलिंगें । आत्मयारामीं आरामीं ॥ ३२ ॥
मायायोगें स्तवन स्तुति । मायायोगें सर्वेश्वर म्हणती ।
आतां अष्टधा प्रकृतिलिंगें अनुवादती । संतसज्जनीं परिसावीं ॥ ३३ ॥
भूलिंग म्हणे जी जगदोद्धरणा । माया भूभार अरिसंव्हरणा ।
स्थूळ सूक्ष्म कारणकारणा । जन्मनिवारणा जगद्गुरु ॥ ३४ ॥

---

१ कर्मसमुच्चयरूपी मी एक च हिरण्यकशिपु मारिला पण कश्यपापासून निर्माण झालेल्या बहुविध योनींतील जें अज्ञान त्या सर्वांचा नाश करणारे आपण दीप आहांत. २ कारण ह्मणजे अज्ञान, त्याचें कारण ह्मणजे परब्रह्म. ३ असुरांचा नाश करणारे इंद्रादिक त्यांचा हि लय ज्यांत होतो असें परब्रह्म.

आपोलिंग म्हणे श्रीनारायणा । नरनारायण जनस्थाना ।
तुज भक्ति नारायणी आणील अनुमाना । येर्‍हि नाकळसी कोण्हासी॥३५
तेजोलिंग म्हणे स्वयंप्रकाश स्वामी । सद्गुरुनाथ स्वानंदधामी ।
नाना मायातमलेश सहस्ररश्मि । केवि लागेल त्रिसंधे ॥ ३६ ॥
वायोलिंग म्हणे निरोधलिंगा । अनंतब्रह्मांडव्यापक श्रीरंगा ।
हरिहरव्यापका निजात्मलिंगा । हरिः ॐ वाक्यार्थें ॥ ३७ ॥
आकाशलिंग म्हणे गगनसदृशा । निरावलंब निरावभासा ।
चतुःशुन्यातीत परेशा । परब्रह्म सुखमूर्ति ॥ ३८ ॥
एवं पंचतत्त्व लिंगस्तवन । पुढें त्रिगुण लिंगें करिती अनुवादन ।
तेथें सादर संतसज्जन । समर्थसद्गुरुसान्निधीं ॥ ३९ ॥
रजोलिंग म्हणे श्रीगुरुदेवा । समस्त निरसुनि सृष्टिभावा ।
भावातीत ब्रह्म सद्भावा । शिष्यसृष्टि बोधावी ॥ ४० ॥
तमोलिंग म्हणे भूतजन्य । शून्यीं शून्यपणें सृष्टि शून्य ।
शून्यातीत स्वरूप अन्य । गुरुदेवें अनन्य बोधावें ॥ ४१ ॥
सत्वलिंग म्हणे रज तम सत्व । निर्गुणीं कैचें गुणमहत्व ।
त्रिगुणरहितं परम गुरुतत्त्व । तत्त्वातीत निजवस्तु ॥ ४२ ॥
एवं अष्टधा प्रकृति अष्टमूर्तिलिंगें । समर्थासी स्तविती आत्मरंगें ।
सद्गुरुस्वरूपीं निजात्मरंगें । आपआपणा सन्मानिती ॥ ४३ ॥
शुद्धसत्व महत्तत्त्वलिंग । चिदाकाश व्यापक अभंग ।
श्रीरामदासस्वामीचें अंतरंग । आत्मलिंग आत्माराम सर्वत्रीं ॥ ४४ ॥
तेथें संतसुखपात्रें पूजनासी । ऐक्यरूपें ऐक्यभजनासी ।
अनंत साधुसंतसज्जन बैसले अविनासी । अविनाशपदें भोगावया ॥४५॥

---

१ आपण स्वयंप्रकाश सूर्य आहांत त्या आपणाला मायारूपी अंधकाराचा लेश कसा लागेल व सकाळ, दुपार, संध्याकाळ असा संधिकाल तरी आपणांस कोठून असणार? २ चारी वेदांत जें नेति नेति म्हणून वर्णन आलें आहे त्यापलीकडचा.

ऐसें कृष्णातीरीं पंचक्रोशीं अपूर्व वर्तलें ।
संतीं देखिलें आम्ही संतमुखें ऐकिलें ।
श्रीगुरुमहिमान गुरुगीतार्थें कथिलें । शिवें सांगीतलें पार्वतीप्रति पूर्वी ॥
जगद्गुरु तुम्ही संतसज्जन मूर्ति । अपार तुमची पावन कीर्ति ।
अघटित घटणा वाचास्फूर्ति । काय येक न करितां गुरुकृपें ॥ ४७ ॥
कृष्णा[1] विष्णुतनु निर्धारें । तेथील गुरुकृपेचीं उत्तरें ।
वेण्या देवमहेश्वर विचारें । वेणी त्रिवेणी तत्त्वमसि ॥ ४८ ॥
तें चि ब्रह्म तुम्ही अविनाशी । श्रीगुरुदेवें बोलिलें निश्चयेंसीं ।
परस्परें ऐक्य पावोनि स्तुतिस्तवनेंसीं । देव स्वस्थानासी गेले स्वानंदें ॥
जे जे प्रसंग कृष्णातीरीं वर्तले । ते ते गुरुदासें सन्निध लिहिले ।
संत सज्जन ऐकोनि मानवले । श्रोते वक्ते जाले भगवद्रूप ॥ ५० ॥
ब्रह्मस्वरूप तों स्वतसिद्ध आहे । भक्तिप्रेम हें विशेष पाहे ।
अरुष वाणी कवि वदताहे । गुरुचरित्र कथिताहे प्रतापें ॥ ५१ ॥
भावें ऐकिजे संतसाधुमायबापें । मायबापें तों जन्मदायक रूपें ।
संत सज्जन निजात्मरूपें । स्वस्वरूपें संपन्न हो ॥ ५२ ॥
एवं श्रीराममूर्तिसंस्थापनकथन । देव देव्यादिकीं केलें गुरुदेवस्तवन ।
संतसज्जन विराजमान । सुखस्वानंदें श्रवणार्थी ॥ ५३ ॥
आत्माराम सच्चिदानंदघन । तेथें वेणीगिरिधर करी निवेदन ।
पुढें समर्थलीलाचरित्रमहिमान । संतसज्जन परिसती ॥ ५४ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥ ५५ ॥
समास ॥ ६ ॥ जय राम ॥

---

1 कृष्णा विष्णुतनुः साक्षात् । वेण्या देवो महेश्वरः ॥

## ॥ समास सातवा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे श्रीरामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

मागां श्रीरामसंस्थापनावर्तमानें । निवेदन केलीं सेवकानें ।
आतां समर्थलीलाचरित्र अनुसंधानें । निवेदन करणें सेवेसी ॥ १ ॥
समर्थे चांफळअधिष्ठानीं श्रीराम संस्थापिले ।
मग सुंदर मठीं समर्थाचे रहिंवे[1] जालें ।
नाना गिरिकंधरीं दास विहिरे निर्मिले ।
नाना मठ करविले लोकोद्धारा ॥ २ ॥
भीमगडीं हनुमानमूर्ति स्थापिली । बारा ज्योतिर्लिंगें पर्वतीं पूजिलीं ।
पर्वतावरूनि उदकें आणिलीं । सुस्नात लोकें करावया ॥ ३ ॥
समर्थें पर्वतीं केलें येक गुप्त सदैन[3] । प्रसंगें[4] ठेवावया देवार्चन ।
सूर्यप्रकाश उदक सन्निध ऊर्ध्वगमन । मार्ग सोपान करूनि जावें ॥४॥
जिकडे जिकडे समर्थ फिरले। तिकडे तिकडे अंगवातें ब्रह्मराक्षस उद्धरले ।
वेदपारायण ब्राह्मण ब्रह्मभुवनीं पावविले । नवल काय सद्गुरूचें ॥ ५ ॥
कर्म केलें उपासनापर । उपासना केवळ ज्ञानपर ।
ज्ञानविज्ञान परब्रह्मपर । सद्गुरुसमर्थप्रतापें ॥ ६ ॥
समर्थें गागाभट्टासी दर्शनें दिधलीं । तीन वर्षें दर्शनप्रतीक्षा श्रवणीं ऐकिली ।
शिवराजपूजेचीं अकरा सहस्र होनें उडविलीं ।
सुवर्णवृष्टि केली ब्राह्मणावरी ॥ ७ ॥
शिवराजासी आनंद जाले । रायगडीं मोठे उछह केले ।
नाना दारुयंत्रें घोष गडोगड गेले । प्रतापगडा आले समर्थ ॥ ८ ॥

---

१ रहिवास, राहणें. २ मोठमोठे पाणदुरे. ३ चाफळास रामघळींत उजव्या हाताला जें भुयार आहे त्याला अनुलक्षून कीं काय कोण जाणे ! न जाणो अन्यत्र हि अशी गुप्त सदनें असतील. ते सर्व डोंगर हिंडल्यावांचून काय सांगावें ! ४ हे प्रसंग कोणते ते इतिहासज्ञांस अवगत च आहेत.

श्री तुळजादेवीसी नवसफूल वाईलें । देवीनें कंठमौक्तिकी श्रवणभूषण दिधलें।
समर्थे भिकार आणून राजअंबार लुटविलें ।
भिक्षाकौतुक केलें सिबिकारूढ ॥ ९ ॥
शिवराजें समर्थासी बरें जांटिलें । हनुमानपुछ कटितटीं लपेटिलें देखिलें ।
समर्थे सामर्थ्यस्वरूप प्रगटिलें । लोकानुग्रहाकारणें ॥ १० ॥
शिवराजें तुरे पदकें मुक्तमाळा । अमोल्य मंदिलें अमोल्य मेखळा ।
इजारा पैजारा मुक्तलग सकळा। मंचक सेज शैय्या समर्पिल्या ॥ ११ ॥
लोकीं वैभवभजनें उदंड केलीं । समर्थे देवब्राह्मणकार्यासी लाविलीं ।
कितीयेक ब्रह्मसंतर्पणें करविलीं। धन धान्य वस्त्रें उडविलीं निस्पृहपणें॥ १२
समर्थासी नवसलेंकुरें पायावरी घालिती । समर्थ ह्मणती रे हे मृत्यु पावती ।
ऐकूनि मायबापें परम आक्रंदती । कौतुक दाविती जगद्गुरु ॥ १३ ॥
समर्थ ह्मणती रे ऐका उत्तरें । वृद्धें होऊनि मरती निर्धारें ।
मग मातापितरें दाटलीं निर्भरें । बाळलेणीं देवें देवविलीं ॥ १४ ॥
मग समर्थदेवें वृत्ति पालटिली । शिष्यसमुदायाची परीक्षा मांडिली ।
अखंड उग्रवृत्ति तरवार पजिली। श्रीपदस्पर्शनीं जीव खंडणें ॥ १५ ॥
कल्याण प्रमुख गुरुदेवगण । ज्ञानशस्त्रें उघडीं करीं घेऊन ।
श्रीपदस्पर्शनीं देहखंडण। करावें ऐसी गुरुआज्ञा ॥ १६ ॥
दर्शनासी येतां सर्वत्र शंकती । श्रीगुरुवंदनें दुरूनि करिती ।
अकरा तरवारा भोंवत्या झळकती । वेणि त्रिवेणि पदीं निरंतर ॥१७॥
कित्तेक घेतले समर्थे वेष । कित्तेक दाविले दुर्धर विलास ।
अंतरसाक्षी श्रीगुरु आत्माराम परेश । दिसे दुर्धर्ष लौकिकां ॥ १८ ॥

---

१ त्या प्रसंगीं श्रीसमर्थांनीं जें स्तोत्र केलें तें मालेंतील तिसऱ्या भागांत ३९१ पृष्ठावर आहे. २ भिंतींतील धान्याचा कोठा. ३ जे भिकारी होते ते श्रीमंत केले, इत्यर्थ. ४ जाणिलें. ५ लोकांनीं उदंड धनधान्यादि अर्पण करून श्रीसमर्थांची पूजा केली, तें पूजेचें सर्व वैभव समर्थांनीं देवब्राह्मणांच्या कार्यास खर्च केलें. ६ "मरतील" असा पाठ बाडांत. ७ लेणें=भूषण, अलंकार. ८ उग्र.

कित्तेक निर्मळें निवळें दासबोध कवित्वें चालती ।
कितियेक लोकें आश्चियें बोलती ।
समर्थस्वामि अवतारमूर्ति । दुर्धर विलास दावितसे ॥ १९ ॥
मग दशावतार खेळों बैसले । दिवाकरनाम्नें समर्थ विनविले ।
स्वामि अवतार सर्व हि देवपदीं वर्तले । समर्थगुरुपद स्वयें परब्रह्म वस्तु ॥
एवं चतुर महंतें दिवाकरें । गुरुकृपें बोलिलीं समर्थेसीं उत्तरें ।
नाना समुदाय परीक्षिलें सर्वेश्वरें । मग पूर्व वृत्ति देवें घेतली ॥ २१ ॥
समर्थें केली वृत्ति निवळ । दर्शना येती लोक सकळ ।
प्रकृतिपुरुष[1] चालिले मेळ । श्रीगुरुदेवदर्शना ॥ २२ ॥
सात शत वर्षांचा पाटगांवीं मौनी । मौन भंगोनि धांवे समर्थदर्शनीं ।
लक्षानलक्ष यात्रा वनीं । समर्थामागें लागतसे ॥ २३ ॥
कोण्हियेक माहापुरुषें कपटाचीं साकरेपानें[2] आणिलीं ।
तव पाटगावींहुनि समर्थासी साकरपानें आलीं ।
घडी येकां कपटपणें शर्करेसीं विलया गेलीं ।
समर्थें साद्धयांतें[3] वांटिलीं साकरपानें ॥ २४ ॥
समर्थ अवतारपुरुष निर्धारें । काय जाणती अज्ञान पामरें ।
चरित्रभानु प्रगटले लोकोपकारें । निस्पृह उदास वर्तले कृष्णातीरीं ॥२५
कृष्णा देखूनि समर्थ पादुका तिरीं ठेविती ।
जडित मुक्तलगा[4] विश्वलोक सेविती ।
पांथिक परमभाग्यें पूजनासी लाभती ।
अधिष्ठानीं आणिती शिरीं धरूनि ॥ २६ ॥
चांफळीं पंचानन यात्रेसी आणिले ।
सन्मुख हनुमानदेउळीं सदाशिव दाविले ।
श्रीरघुनाथ राउळींहुनि बोलाविले । ये रे रामराया संकीर्तनीं ॥ २७ ॥

---

१ स्त्रीपुरुष. २ नजराण्यासाठीं साखर व विड्याचीं पानें देतात तीं. ३ सर्वांना. ४ मोत्यांनीं युक्त.

गुरुदेवें भैरवासी येके दिवशीं संदेश केला ।
निस्पृह कल्याण अजगरें स्पर्शिला ।
तात्काळ अतितें निर्विष जाला । क्षत्रपाळें सन्मानिला समर्थें ॥२८॥
समर्थें साष्टांग नमनें येक उपासेनेसी केलीं ।
मग सर्वांसी वंदनें करकमळें जोडिलीं ।
समर्थें भाग्यवैभवें दृष्टीसी नाणिलीं । अंगिकारिलीं लोकानुग्रहें ॥२९॥
शतरुद्रसंख्या निष्क मौल्य पादुका । तीन मुहूर्त चरणीं होत्या देखा ।
समर्थें पर्वतीं उडविल्या परलोका । नेणों स्वर्गस्थ देवा पूजावया ॥३०॥
अमोल्य रत्नांबरीं मुक्तमय सम्यक । समर्थकटीचा आपाद कंचुक ।
पर्वतावरूनि लीळेनें झाडिला देख । मुक्तें विखुरलीं भूमंडळीं ॥ ३१ ॥
आपाद मुक्तमाळा उडविल्या । जाणों भूमंडळीं अवध्या विस्तारल्या ।
नाना महंतरूपें सृष्टींत देखिल्या । सगुण तंतूच्या सुखमूर्ति ॥ ३२ ॥
नाना उदास धन्य मूर्ति । नाना महंत भव्य मूर्ति ।
संत सज्जन दिव्य मूर्ति । अनंत निस्पृह स्वामीचे ॥ ३३ ॥
रुद्रशतसंख्या गणित मूर्ति । विख्यात ज्याच्या पुण्य कीर्ति ।
समर्थस्वामी अवतारमूर्ति । नाना महंतरूपें विस्तारले ॥ ३४ ॥
कोण्हि येक महंतें मंत्रभेद केले । समर्थें येकांतीं वेत्रें ताडिले ।
मूळमंत्राविरहित जे शिष्यसमुदाय जाले । ते ते भ्रष्टले मतांतरें ॥३५॥
स्वदेशी शिष्य तीन वर्षे न येती । श्रीगुरुपदीं ते भिन्न पडती ।
विदेशी अकरा वर्षें दर्शन न घेती । ते ते संप्रदाइ वेगळे ॥ ३६ ॥
कित्तेक महंतें सकाम होमहवन केलें । श्रीरामनौमीचे उछह लोपिले ।
चांफळा सन्निध आज्ञापितां यात्रेसी न आले । माध्यान्हीं चेतले मंडप ॥

---

१ आज्ञा. २ अतिथि. ३ हें भैरवाचें स्थान चाफळास रामघळ ज्या डोंगरांत आहे त्या च डोंगरांत आहे. ४ फक्त श्रीरामापुढें साष्टांग नमस्कार. ५ अकराशें. ६ सोन्याचें नाणें. ७ अंगरखा. ८ श्रीसमर्थांचे अकराशें शिष्य होते. ९ स्वदेशांतील शिष्यांनीं तीन वर्षांत व परदेशांतील शिष्यांनीं अकरा वर्षांत निदान एकदा श्रीदर्शनास आले पाहिजे असा दंडक होतासें दिसतें.

अहो सच्छिष्यें जपजाप्य होम हवन सुखें करावें ।
सकाम निःकाम भजन बरें विवरावें ।
मुख्य गुरुआज्ञे गुरुकृपे तरावें । प्रपंचीं अथवा परमार्थी ॥ ३८ ॥
समर्थें श्रीरामनौमीसी चांफळीं वर्जिले काले ।
कां जे अयोध्येसी काले न जाले ।
श्रीपांडुरंगीं गोकुळीं स्थापिले गोपाळकाले ।
श्रीवेंकटेशीं श्रीरंगीं वांटिले अन्नप्रसादु ॥ ३९ ॥
समर्थसंप्रदाईं येकंकार नाहीं । येक विचार निरंतर पाहीं ।
नाना उन्मत्तद्रव्यें न मनेती कांहीं ।
ब्रह्मचर्य श्रीरामउपासना ॥ ४० ॥
सद्गुरुब्रह्मीं मरीचिंकीर्ण प्रकाशले । ग्रंथराज दासबोधीं विंशति सूर्य निघाले
अज्ञानतिमिरांतक सृष्टींत चालिले । सप्तभूमिका द्वीपांतरीं दावावया ॥ ४१
भक्ति ज्ञान वैराग्य तिन्हि । ब्रह्मावलोक ब्रह्मसमीप देखणी ।
ब्रह्मस्वरूप ब्रह्मसायोज्य मिळणी । सप्तभूमिका परब्रह्मीं ॥ ४२ ॥
श्रीरामतारकब्रह्में मंत्रोद्धार केले । मग संतमहंतीं गुरुपदीं विचार मांडिले ।
स्वामि नाना मंत्र शास्त्रें धरूनि नाना लोक बोधिले ।
पाहिजेती श्रीरामसामर्थ्यें ॥ ४३ ॥
अरे मज मंत्र शास्त्रें न लगेती कांहीं । मतमतांतरीं मी श्रीराम येक पांहीं ।
आत्माराम मणिसूत्रे सर्वत्र देहीं । अनंत ब्रह्मांडें व्यापिलीं श्रीरामें ॥ ४४
आत्माराम माझी अद्वैत उपासना । सकाम निःकाम नाना लोक वासना ।
मुख्य तारकब्रह्ममंत्र स्वसंप्रदाईं जाणा । नाना मंत्रभेद कामा नये ॥ ४५
सप्तकोटी उपासना मंत्र विविध । त्यांत मुख्यत्वें पंचायतन पंचविध ।
त्या पंचायतनीं येक आत्माराम प्रसिद्ध । श्रीराममंत्र निर्धारें ॥ ४६ ॥

---

१ प्रकाशाचे किरण. २ अज्ञानरूपी तिमिर म्हणजे अंधकार त्याचा नाश करणारे हे वीस सूर्य. ३ भक्ति, ज्ञान, वैराग्य व सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता अशा चत्वार मुक्ति मिळून सात. ४ मण्यांच्या माळेंत एक च दोरा जसा व्यापून असतो, तद्वत् श्रीराम सर्वत्र आहे.

शिवशक्तिगणेशासी श्रीराममंत्र ।
काळकूटउपद्रवीं विष्णु उपदेशी हृदयतंत्र ।
सूर्यनारायण जपतसे वंशभूषण राम स्वतंत्र । मेरुप्रदक्षिणा करूनियां ॥
ज्या देवांच्या कराव्या पंचविध उपासना । त्या देवांसी श्रीरामब्रह्मउपासना ।
ह्मणोनि श्रीरामेंविण कोठें न बैसों वासना ।
अनंत ब्रह्मांडीं व्यापक श्रीराम ॥ ४८ ॥
ॐकार उच्चारीं रामब्रह्मउच्चार । रम रम रं बीज राम निर्धार ।
सीता राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न रुद्रावतार । ॐकारप्रणवीं ऐक्यत्वें ॥४९
ॐकार राम अकार लक्ष्मण । उकार भरथ मकार शत्रुघ्न ।
अर्धमात्रा शक्ति सीतादेवी आपण । नाद[1] हनुमान ॐकारीं ॥ ५० ॥
योगी रमती ज्या स्थानीं । सत्यानंद चिदात्मानीं ।
राम परब्रह्म अभिधानी । श्रुति गर्जती वाक्यार्थें ॥ ५१ ॥
श्रीराम आमुचा परमार्थ । श्रीराम आमुचा तत्त्वार्थ ।
श्रीराम आमुचा गुह्यार्थ । संचितार्थ सर्वार्थ श्रीराम येक ॥ ५२ ॥
श्रीराम उच्चारितां नाम । सर्व देवाचें होय चित्त आराम ।
सच्चिदानंद स्वानंदधाम । तारकब्रह्म ब्रह्मांडीं ॥ ५३ ॥
अथर्वणीं मंत्रविधान करावें । पद्मपुराणीं कांहीं न करावें ।
अधिकारपरत्वें सर्व हि असावें । संप्रदाई विधान ॥ ५४ ॥
मंत्रन्यास ध्यान जप । दशांशे[2] होम तर्पण तद्रूप ।
तर्पणांशें मार्जनरूप । मार्जनांशें संतर्पण ॥ ५५ ॥
अखंड स्मरणीं विधान नाहीं । पुरश्चरणीं विधान काहीं ।
नित्य नैमित्य निरोपिलें पांहीं । आत्मशास्त्रगुरुआज्ञा ॥ ५६ ॥
एवं श्री राम दोनीं अक्षरें । निगमागमाचीं सारें ।
ध्याताती गौरीहरें । मातापितरें विश्वाचीं ॥ ५७ ॥

---

१ "नाद बिंदु" असा पाठ बाडांत आहे. २ जितका जप त्याचा दहावा भाग होम, होमाचा दहावा भाग तर्पण, तर्पणाचा दहावा भाग मार्जन व मार्जनाचा दहावा भाग ब्राह्मणसंतर्पण करावें.

ऐसीं सद्गुरुनाथसमर्थउत्तरें । ऐकोन सच्छिष्य राहिले निरोत्तरें ।
वेणीसंप्रदाई कवि वाक्यार्थ निर्भरें । गुरुमंत्रवाक्यें लिहिताहे ॥ ५८ ॥
एवं सद्गुचरित्र नाममहिमान । सेवकें केलें निवेदन ।
पुढें समर्थलीला विचित्र वर्तमान । वेणीगिरिधर सांगेल ॥ ५९ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥ ६० ॥
समास सप्तम ॥ ७ ॥

---

## ॥ समास आठवा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे श्रीरामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागा सद्गुरुचरित्र नाममहिमानें । सेवकें निवेदिलीं वर्तमानें ।
आतां समर्थलीला विचित्र अनुसंधानें । संतसज्जनें परिसावीं ॥ १ ॥
समर्थें सुंदर मठीं गणपति केला । दोनी पुरुषे सिंधुरवर्ण अर्चिला ।
सकळ प्रांतासी मोहछह दाविला । भाद्रपदमाघपर्यंत ॥ २ ॥
शिवराजासी अक्षामुष्टि भिक्षा मागों धाडिली ।
शिवराज ह्मणे माझी परीक्षा समर्थें मांडिली ।
आकरा[३]आकरीं खंड्या कोठी पाठविली । हनुमानस्वामिमुष्टि लक्षूनियां ॥
आकरा खंड्यांची किंचित येक मुष्टि । आकराआकरीं धाडिली कोठी ।
समर्थ आज्ञा राजा मानी मोठी । शिवराज तेणें बळावला ॥ ४ ॥
समर्थाचे उत्तमोत्तम भक्तिछंद । छंदें बैसले परमार्थबंद ।
लीळाविग्रही स्वानंदकंद । सच्चिदानंद जगद्गुरु ॥ ५ ॥

---

१ "गिरिधर संतसेवेसी निवेदिल।" असा चरण बाडांत आहे. २ "पुरुष प्रमाण" असा पाठ बाडांत. ३ एकवीसाशें.

गुरुदेवदर्शनीं तस्कर विरक्त जाले ।
तस्करविद्या टाकूनि ब्रह्मविद्येवरी आले ।
समर्थापुढें माल आणूनि रिचविले । समर्थें वांटिले ब्राह्मणा ॥ ६ ॥
घोर अरण्यीं समर्थ बैसले । इछेचा दाता देव ऐसें बोलिले ।
कोण्हियेक मूर्खें तेथें आक्षेप केले । येथें घृतकेळें देव देईल किं ॥७॥
जंव पाव घडी येक लोटली । तव घृतकेळें कोल्हापुरप्रांतीचीं आलीं ।
स्वइछा अभाविकांसी वाढिलीं । मूर्खा कोण्या सेवे देवासी कष्टविलें ॥
समर्थभोजनीं जटिळ आले । गडोगडीचे सामें राजअंबारीचे उतरिले ।
आकरा सहस्र जटिळ दों प्रहरांत जेऊं घातले ।
आपण सध्यान्नें जेविले पूर्व पात्रीं ॥ ९ ॥
शिवराजासी समर्थव्रत कळलें । निस्पृह स्वामीचें जटिळें सत्व पाहिलें ।
विवेकेंचि शिवराजें समर्थासी विनविले । सैह्याद्रिशिखरीं राहावें गुरुदेवें ॥
पूर्विऋषीचें आहे गुप्त स्थान । येथें समर्थें करावें अधिष्ठान ।
जेथें श्रीचरण लागती परिपूर्ण । तेथें पुण्यपावन भूमंडळ ॥ ११ ॥
सहस्रांकित सदन संकल्प केला । समर्थसदनासी प्रारंभ जाला ।
शिवराजा आज्ञा घेऊन निघाला । सप्तऋषिदुर्गीहूनि आला येक मासे ॥
सज्जनगडीं समर्थआश्रम किंचित पर्जन्यीं गळाला ।
शिवराजें दुर्गाधिपत्यासी पर्वतपात्त आरंभिला ।
समर्थें सेवेसी सेवक मागोनि घेतला । स्वामी क्षमासिंधु दीनबंधु ॥१३॥
शिवराजसेवा पंचविंशति नित्य भोजन । समर्थसदनीं अन्नब्रह्मनिवेदन ।
गमनागमनीं दुर्गद्वारीं निर्बंधन । लक्षानुलक्ष यात्रेसी ॥ १४ ॥
सज्जनगडीं अंगलाई देवी । समर्थदर्शनीं जीव लावी ।
समर्थाचा अन्नप्रसाद जनीं सेवी । समर्थकार्यासी अनुकूळ ॥ १५ ॥
दुर्गद्वारीं साधु गोंजी । समर्थस्वामीसीं अखंड राजी ।
श्रीरामभजनीं आवडी ताजी । आत्माराम समर्थ गुरु ॥ १६ ॥

---

१ सामग्री. २ वेळेवर जटिल आले त्यांना निराळे जेवण घातलें व आपण मात्र पूर्वी च वाढून ठेवलेलें अन्न खाल्लें. ३ "गुप्त साधु" असा पाठ बाडांत आहे. "गुप्त" शब्द समासांत लिहिलेला आहे. ४ प्रतापी.

धोंममाहाबळेश्वर येवतेश्वर । समुद्रेश्वर वाटिकेश्वर ।
आत्मलिंगगोकर्णमहाबळेश्वर । समर्थातें अभिवंदिती ॥ १७ ॥
हरिहरमूर्ति शिवशक्तिमूर्ति । गुप्त प्रगट अनंत मूर्ति ।
संत सज्जन स्वानंदमूर्ति । समर्थातें आठविती ॥ १८ ॥
बारा आदित्य बारा लिंगें । दश अवतार भक्तिरंगें ।
नाना लीळा दैवतयोगें । समर्थातें सन्मानिती ॥ १९ ॥
कित्तेक गुप्त प्रगट देव येती । समर्थसदनीं सन्मान पावती ।
ब्राह्मणमुखें संतृप्त होती । कथाकीर्तनीं बहुसाल ॥ २० ॥
मार्गस्थ देवदर्शनासी आले । समर्थाचे फळप्रसाद इछिते जाले ।
अक्रा लक्ष आंबे डोंगरीं पिळिले । पाषाणपाषाणीं समर्थें ॥ २१ ॥
दैवतें भूतें पर्वतातळीं आलीं । किंचित प्रसाद इछिती जालीं ।
समर्थें तैल पक्कें[1] बोनि[2] विखुरिलीं । पर्वतपर्वतीं स्वानंदें ॥ २२ ॥
समर्थसदनासीं[3] संत आले । समर्थदर्शनासी पंथ आले ।
समर्थदर्शनासी अनंत आले । सन्मानिलें सकळांसी ॥ २३ ॥
समर्थदर्शनासी हरिदास आले । समर्थदर्शनासी दशावतार आले ।
समर्थ श्रीरामअवतार देखोनि उभे ठाकले । अद्भुत त्यांग[4] दिधलें सुवर्णी ॥
समर्थ ह्मणती रे दशावतारी हो आइका । तुमचें दरिद्र विछिन्न केलें देखा ।
पुढें श्रीरामअवतार कोठें आणूं नका । श्रीराम मर्यादा लोकां चालेना ॥
समर्थें अकरा शत होनें द्रव्यें दिधलीं । वस्त्रें भूषणें गडीचीं पूर्वींच समर्पिलीं ।
समर्थाची शपित वाणी वदली । श्रीरामअवतार खेळतां निर्वंश ॥२६॥
समर्थाचें विचित्र करणें । श्रीराममर्यादा पाळणें ।
राजप्रधानेंसीं रात्रीं उभे ठाकणें । श्रीरामकथा संपली सूर्योदईं ॥२७॥
ऐका शिवराजें कोणियेक दिवसीं धाडिलें विनतिपत्र ।
आणविलें समर्थमंचकसूत्र । येकाकी मंचक समर्थें शैय्याविला पवित्र ।
राजा ऐकोनि संतोषला ॥ २८ ॥

---

१ "तैल पक्कें घुगऱ्या" असा पाठ बाडांत आहे. २ बोने=बळी, नैवेद्य. ३ "दर्शनासी" पाठ बाडांत आहे. ४ दान.

राजा मंचकशैय्या घेऊनि दर्शनासी आला ।
राजहेरीं समाचार जाणविला ।
पारपत्ये[1] ह्मणती जी संतोष द्यावया राजयाला ।
उत्तम वस्त्रें भूषणें धरावीं ॥ २९ ॥
समर्थें उत्तम हुर्मुजी भगवा साज केला । समर्थदर्शनासी शिवराज आला ।
साष्टांग नमस्कार मुहूर्तेक घातला ।
उठोनि मुहूर्तेक अवलोकिले समर्थ ॥ ३० ॥
संत महंत निवांत सभेसी देखिले । सिद्ध साधक पुण्यश्लोक भले ।
निस्पृह ग्रंथलेखक देखतां नृपें माथे डोलविले ।
देवसभा जेथें कुरवंडिली ॥ ३१ ॥
शिवराजा ह्मणे माझें परम भाग्य साम्राज्य ।
स्वराज्यीं केवळ राजा ब्रह्म रामराज्य ।
अनंत जीवगण शिवगण पावले सायोज्य । स्वर्गस्छ देवगण उद्धरिले॥ ३२
समर्थें निस्पृह सर्व हि केले । देवें आश्रम कांहीं चालवावे भले ।
शिवराजा आश्रमधर्म आम्ही लौकिकीं चालविले ।
माझे शिष्यसंतान सृष्टिवरी ॥ ३३ ॥
प्रसाद आतिथ्य पावोनि राजा गेला । पुनर्दर्शन ह्मणोनि हेतु पाईं ठेविला।
पुढें समर्थअधिष्ठानासी सकळ प्रांत लोटला । श्रीगुरुदेवदर्शना ॥३४॥
समर्थदर्शनासी पर्वतीं लोक धांवती ।
सर्प दंशितां डोंगरी पाले भक्त पुसती ।
मुख्य भग्रसर्पदंश समर्थ उतरिती । येथें विषसर्प वारिती भैरवरूपें[2] ॥३५
समर्थ मार्तंडभैरवयात्रेसी चालिले । सिबिकेवरी बारिक पडदे घातले ।
येक शत अभंग लेहूनि दिधले । पाठ करविले महंतांकरवीं ॥ ३६ ॥
साक्षात मल्हारी वाटे यात्रेसी आला । यात्रा लोक सर्व हि गजबजिला।
देवदर्शना देव निघाला । भंडार उधळला ब्रह्मांडीं ॥ ३७ ॥

---

१ आल्यागेल्यांचें आदरातिथ्य करण्याचें काम ज्यांच्याकडे असे ते शिष्य.
२ हें भैरवाचें स्थान चाफळखोऱ्यांत रामघळीच्या डोंगरावर आहे. श्रीकल्याणांना साप चावल्याची जी गोष्ट प्रसिद्ध आहे ती येथील होय.

संपूर्ण यात्रेचा भंडार सरला । देवळामध्यें लोक भरला ।
नेणो मल्हारी लिंगबाहेरी आला । समर्थरूपें मंडपीं ॥ ३८ ॥
शत अभंग संकीर्तनें । मार्तंडभैरवीं केलीं कीर्तनें ।
आरति करूनि सप्रेम मनें । ब्रह्मांड भांडारें भरिलें हो ॥ ३९ ॥
त्रिरात्रि समर्थें स्वानंदें क्रमूनि । विश्वलोकांसी दर्शनें देऊनि ।
मार्तंडभैरवयात्रा करूनि । समर्थ सज्जनपर्वता पातले ॥ ४० ॥
संत सज्जन गुरुपदीं सर्व मिळाले । यहलोक परलोक विवरिते जाले ।
अध्यात्म[2]योग विस्तारिती भले । श्रीदासबोधग्रंथार्थें ॥ ४१ ॥
समर्थें नाना प्रबोध केले । मूर्ख[3] अवगुणी सद्गुणी जाले ।
स्वगुण[4]परीक्षा करूनि आणिले । विरक्तियोगें सन्मार्गीं ॥ ४२ ॥
भक्ति[5]योगें मुक्तिपंथें । सद्गुरुचरणीं दृढ भावार्थें ।
बहुधा[6]ज्ञानें उपदेशमतें । आत्मज्ञानीं वोसरलीं ॥ ४३ ॥
स्वरूप[7]ज्ञान उपदेश शुद्ध । बद्ध मुमुक्षु साधक सिद्ध ।
विवरण करितां श्रीगुरुबोध । सच्छिष्यासी बाणले ॥ ४४ ॥
देव[8]शोधनीं दृश्य लया नेलें । तत्वीं[9] तत्व निवेदन केलें ।
माया[10]ब्रह्मयोगें सगुण भजन घडलें । सार[11]शोधन समाधानी ॥ ४५ ॥

---

१ "भंडारें" बाडांत. २ जमलेल्या संतसज्जनांच्या सभेंत, बहुधा अध्यात्म-निरोपण ॥ केलें आहे असें प्रथम दशकांत ह्मटलें आहे त्याला अनुलक्षून. ३ दुसऱ्या दशकाचें नांव "मूर्खलक्षणनाम" असें आहे, त्याला अनुसरून. ४ तिसऱ्या दशकाचें नांव. ५ चवथ्या दशकाचें नांव. दहाव्या समासांत चत्वार मुक्ति दिल्या आहेत. ६ पांचव्या दशकाच्या पांचव्या समासांत बहुधाज्ञान निरूपिलें आहे; व उपदेशाचीं बहुविध लक्षणें चवथ्या समासांत दिलीं आहेत; हें बहुधाज्ञान व हीं उपदेशमतें यांचें पर्यवसान आत्मज्ञानांत केलें आहे. सकळ उपदेशीं विशेष । आत्मज्ञानाचा उपदेश ॥. ७ पांचव्या दशकाच्या सात ते दहा समासांत बद्धादि चत्वार जीवांचीं लक्षणें दिलीं आहेत त्यांचें विवरण केलें ह्मणजे सहाव्या समासांतील शुद्ध ज्ञान शिष्याअंगीं बाणेल. ८ सहाव्या दशकाच्या पहिल्या समासांत देव कोण याचा शोध घेण्यास सांगून देवाचें ज्ञान झालें ह्मणजे दृश्य कसें मिथ्या होतें हें आठव्या समासांत सांगितलें आहे. ९ तत्त्वें तत्त्व झाडितां सार । आत्मा च उरे ॥ हें दुसऱ्या समासांत सांगितलें आहे. १० मायाब्रह्माचें विवरण पांचव्या समासांत करून सातव्यांत सगुणभजन प्रस्थापिलें आहे. ११ सारासारविवंचना नवव्यांत करून दहाव्यांत समाधान केलें आहे.

चतुर्दशब्रह्मा[1]चें विवरण । अनिर्वाच्य[2] ब्रह्म पूर्ण ।
विमळब्रह्म[3] अखंड परिपूर्ण । निर्विकल्प कल्पनातीत[4] ॥ ४६ ॥
बद्धमुक्त[5]कल्पना जीवबुद्धि सरली । अद्वैतश्रवणीं[6] आत्मबुद्धि उरली ।
देहांतीत[7] दशा पूर्ण बाणली । समर्थसद्गुरुप्रतापें ॥ ४७ ॥
समर्थें विमळ[8] ज्ञान बाळबोध केलें । परब्रह्मीं मायाभास[9] गेले ।
मायोपाधिकर्तार सर्वेश्वर[10] देखिले । मायातीत आपण सद्वस्तु ॥ ४८ ॥
गुणातीत[11] साधु ब्रह्म निर्गुण । सृष्टिक्रमातीत[12] ब्रह्म पूर्ण ।
जीवशिवातीत[13] संपूर्ण । येकीं[14] येक परब्रह्म ॥ ४९ ॥
विवेकवैराग्यें[15] भाग्यवान जाले । नित्यानित्यें[16] साधु विवरूनि ठेले ।
मायानिरासें[17] निस्पृह शिष्य केले । सद्गुरुनाथसमर्थें ॥ ५० ॥

---

१ सातवा दशक "चतुर्दश ब्रह्मनाम". २ चौदावें अनिर्वाच्य ब्रह्म. ३ सातव्या दशकाचा चवथा समास. ४ पांचव्या समासांत द्वैतकल्पनेचा निरास केला आहे. ५ बद्धता आणि मुक्तता दोन्ही कल्पनामय च हें साहव्या समासांत सांगितलें आहे. ६ आठव्या समासांत परमार्थाचें साधन श्रवण सांगून नवव्यांत अद्वैतग्रंथ श्रवण करावें असें प्रतिष्ठिलें आहे. ७ दहाव्या समासांत देहांतनिरूपण आहे. ८ आठव्या दशकाच्या पहिल्या ओवींत च " विमळ ज्ञान बाळबोध " हे शब्द आले आहेत. तसें च ते श्रीकल्याणकृत दासबोधाच्या आरतींत हि आहेत. ९ ब्रह्म जें कां सनातन । तेथें माया मिथ्या भान ॥$८\frac{२}{२}$. १० परमात्मा परमेश्वरु । सर्वकर्ता जो ईश्वरु । तयापासूनि विस्तारु । सकळ जाला॥$८\frac{३}{१२}$. ११ नवव्या दशकांत गुणांचें रूप निरूपिलें आहे, व " परब्रह्म ह्मणिजे सकळां परतें । " हें सिद्ध केलें आहे. १२ दहाव्या दशकाच्या चवथ्या व पांचव्या समासांत सृष्टीच्या उत्पत्तिस्थितिसंहाराचा क्रम सांगून या तिन्ही अवस्थांच्या पलिकडे " परमात्मा निर्गुण निराकार ॥ जैसा तैसा ॥ " कसा आहे हें दाखविलें आहे. १३ अकराव्या दशकांत, " उपाधीनिरासें तत्वता । जीवशिवास ऐक्यता ॥" करून "येकीं येक" परब्रह्म कसें आहे तें दाखविलें आहे. १४ श्रीसमर्थसांप्रदायांत " अकरा " ही सांकेतिक संख्या कां आहे याचा या ठिकाणीं किंचित् बोध होतो. " येकीं येक " अकरा व " येकीं येक " येक च परब्रह्म, दुसरें कांहीं च नाहीं. प्रस्तुत उल्लेख हि अकराव्या भीमदशकाला अनुलक्षून येथें आला आहे. १५ बाराव्या दशकाचें नांव "विवेकवैराग्यनाम " असें आहे. १६ तेराव्या दशकाच्या पहिल्या समासांत नित्यानित्यविवेक आला आहे. १७ चवदाव्या दशकाच्या दाहाव्या समासांत मायानिरूपण केलेलें असून पहिल्या समासांत निस्पृहाचीं लक्षणें सविस्तर सांगितलीं आहेत.

आत्मरूपें[1] साधु सुखें विचरती । तत्वान्वयें[2] तत्वार्थ जाणती ।
प्रकृतिपुरुषांचें[3] स्वरूप बाणती । अनंतगुणें[4] परिपूर्ण ॥ ५१ ॥
पूर्णापूर्ण[5] पाहूनि पूर्ण । नामरूप विवरूनि संपूर्ण ।
गगनाकार परब्रह्म परिपूर्ण[6] । श्रीदासबोधग्रंथार्थें ॥ ५२ ॥
ऐसे सज्जनपर्वतीं वृत्तांत वर्तले । श्रीदासबोध सृष्टींत विस्तारले ।
सद्गुरु समर्थ भरतखंडीं प्रगटले । जगदोद्धाराकारणें ॥ ५३ ॥
श्रीरामचंद्रस्वामी वैकुंठधामा गेले । श्रीहनुमानस्वामी रामरूप ठेले ।
कलयुगीं तेचि अवतरले । ब्राह्मणरूपें जगद्गुरु ॥ ५४ ॥
हनुमंत सहस्रनामी पूर्णकाम । चतुरो ब्राह्मणो योगी समर्थ नाम ।
सद्गुरुनाथ स्वानंदधाम । सज्जनगिरिमाझारी ॥ ५५ ॥
त्रिशुद्धि[7] बोलिलें श्रीगुरुरूप निर्धारी । येथें कोण्ही संकल्प विकल्प धरी ।
तो माहापापी अपवित्र वैखरी । समर्थप्रताप ऐकतां पवित्र ॥ ५६ ॥
एवं समर्थलीला विचित्र पावन । संतसज्जनीं केलें श्रवण ।
पुढें सज्जनपर्वतनिवासवर्तमान । वेणीगिरिधर सांगेल ॥ ५७ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥ ५८ ॥
समास अष्टम ॥ ८ ॥ ॥ जय राम ॥

---

१ पंधरावा " आत्मदशकनाम ". २ सोळाव्या दशकांत पंचतत्त्वांचें विवरण आलें आहे त्याला उद्देशून या दशकाचें नांव गिरिधरांनीं येथें " तत्त्वान्वय " दिलें आहे. " सप्ततिन्वयाचा " दशक षोडश असें जें मूळ प्रतींत नांव आहे, त्याचा अर्थ गिरिधरांच्या मतें सात ( वाल्मीकि, सूर्य व पंच भूतें ) आणि तीन ( त्रिगुण ) यांचा अन्वय असा दिसतो. ३ सतरावा दशक " प्रकृतिपुरुष " नाम. ४ अठरावा दशक " बहुजिनसी " नाम, त्यांत व एकोणिसावा दशक " शिकवणनाम " यांत निस्पृह, करंट, उत्तम पुरुष, श्रोता, सदैव, साक्षेपी, राजकारणी, विवेकी, इत्यादिकांचे अनंत गुण शिकविले आहेत. ५ विसाव्या पूर्ण दशकाच्या पहिल्या समासांत पूर्णापूर्ण याचा विचार केला असून समास तिसरा, पांचवा व नववा यांत मायेचीं सूक्ष्म नामें दिलीं आहेत. ६ पक्षी अंतराळीं गेला । भोंवतें आकाश चि तयाला । तैसें ब्रह्म प्राणीयाला । व्यापून आहे ॥ अशा रीतीनें गगनाकार जें परब्रह्म त्याच्या स्वरूपाची पुन्हा एकवार दहाव्या समासांत शेवटीं बोध करून ग्रन्थराज पूर्ण केला आहे. ७ निश्चयानें.

## ॥ समास नववा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां समर्थलीला विचित्र अनुसंधानें । निवेदन केली सेवकानें ।
आतां सज्जनपर्वतनिवासमहिमानें । निवेदन करणें सेवेसी ॥ १ ॥
समर्थसदनीं भक्तिरंगें रंगमाळा । समर्थसदनीं ज्ञानप्रकाशें दीपमाळा ।
समर्थसदनीं मुक्तमय फांकती कीळा । गुरुभक्तिजिव्हाळा सकळांमध्यें ॥२॥
सुंदर मंचक आसनें ठाइं ठाइं । जेथिल तेथें सर्व सिद्धि पांही ।
स्वइच्छा अर्चनें अंगिकारणें कांहीं । निर्माल्यविसर्जनीं प्रसादु ॥ ३ ॥
श्रीगुरुसेवेमध्यें तत्पर सेवक । सर्वत्रांसी भजनाची अलौलिक[1] ।
सज्जनदुर्गींचा सर्वत्र लोक । दर्शनाविना जेवीना ॥ ४ ॥
तीर्थप्रसाद पावती सर्वांतरें परस्परें । स्वमुखें कित्तेकें बुद्धिवादें उत्तरें ।
समुदाईं करविजे सत्शास्त्रें पाठांतरें । निरूपणें अधिकारें[2] सांगिजे ॥५॥
महंत निस्पृह येती देशांतरींचे । समर्थ ग्रंथ मंचकीं घेती तयाचे ।
दशक समास व्यस्ताव्यस्त लाऊनि ग्रन्थाचे । होती महंताचे परीक्षक ॥
सद्ध्या[3] ग्रंथ महंतें विल्हे[4] लाविला । तरी शुद्ध विवरणें पूर्ण परमार्थ केला ।
विलंबें ग्रंथ विल्हे लावित महंत बैसला । तरी ग्रंथपूजन मात्र संपादिलें ॥७
निरोपग्रहणापासूनि[5] पुनरागमनी ।
समर्थ समाचार साकल्य पुसताती मुखवचनीं ।
तेथें अवघें चि होय प्रगट श्रवणीं । व्याप वैभव महंताचें ॥ ८ ॥

---

१ अपूर्वता, कौतुक. २ अधिकारपरत्वें. ३ त्वरित. ४ जुळविला. महंताची पोथी घेऊन इकडचा दशक तिकडे व तिकडचा समास इकडे अशी व्यस्ताव्यस्त पोथी करून महंताला द्यावी, ती जर त्यानें त्वरित जुळविली तर त्याला ग्रन्थ समजला समजावयाचें, उशीर लावला तर ग्रन्थाची नुसती त्यानें, न समजत्तां, पूजा केली असें समजावें. ५ कामगिरीवर पाठविल्यापासून परत येईपर्यंत महंतानें काय काय केलें हें सर्व त्याला विचारावयाचें, म्हणजे सहज च त्याची योग्यता कळून येई.

साकल्य परिसतां अवघें चि कळे । सर्वज्ञासी प्रपंच परमार्थ निवळे ।
संसारीक लोक केवळ बाळे भोळे आंधळे ।
त्यांचे आत्मडोळे उघडिती स्वामी ॥ ९ ॥
थोरथोरां महंतांस धारकी धरिती । श्रीगुरु मर्यादा रक्षविती सिकविती।
भाविक भोळयां लोकांसी जवळी बैसविती ।
तांबुलसेवा घेती त्यांचेनि हस्तें ॥ १० ॥
जेथें मंचकाभोंवतीं चंपक सुमनें पडलीं ।
मध्यें पादसेवनपंथें वेदिका विराजली ।
येकेक मास स्वानंदें यात्रा राहिली । होती अनुक्रमें दर्शनें सकळांसी ॥
नाना कथा कीर्तनें समाराधना । नाना श्रीगुरुदेवआराधना ।
रात्रिदिवस न कळे मना नयना । समर्थसान्निधीं स्वानंदें लोक॥१२॥
चंद्रसूर्यग्रहण कांहीं पर्वकाळ आले ।
समस्तांकरवीं समान द्याकौर मठीचे देवविले ।
समर्थें सर्वां सर्वत्र समताभाव दाखविले। समर्थासी ऐक्यरूप ब्रह्मांड हें॥
नाना फळें आम्रफळें पुष्कळें येती ।
येकीं येक संख्या समर्थ सकळांसी देवविती ।
यथाविभागें प्रसंगें प्रासादिक सकळ पावती । सज्जनदुर्गीं प्रसादु ॥१४
समर्थें सज्जनदुर्गीं पर्वतआवर्त पाहाणें । बुरुजबुरुजीं लीळावेषें विहरणें।
अंगलाई देवळीं समस्त यात्रेसी दर्शन देणें । अपरान्हेवेळीं सुवेळीं ॥
समर्थयात्रा उतरे पर्वतातळीं । समर्थ दुर्गद्वारावरुते ऊर्ध्व नभमंडळीं ।
बादली तगटी निशाणें तेजझळाळीं। समर्थ ध्यानें दाविती सर्वत्रां ॥१६

---

१ श्रीसमर्थसांप्रदायाची शिस्त कशी सहज आपणांस येथें पहावयास मिळत आहे! प्रत्यक्ष शिवाजी राजे हि समर्थांना भीत असत, व त्यांच्या देखत विनयानें वागत; ते च भोळारामादि भोळे शिष्य लडिवाळपणें जवळ बसून खलबत्त्यांत विडा कुटून समर्थांना देत. शहाण्याला चुकीची भीति असते, भोळ्याला काय? २ ओटा. ३ पर्वकाळीं किंवा लग्नादि प्रसंगीं प्रत्येक घराप्रत जी नेमकी दाक्षिणा देतात ती. ४ भोंवरा, वावटळ. ५ तिसरा प्रहरीं. ६ सोनेरी; किंवा बादल म्हणजे मेघ असा शब्द आहे तर बादली म्हणजे नीलवर्णाचीं असा अर्थ होईल. ७ तगट=चांदीचा पत्रा. तेव्हां तगटी=शुभ्रवर्णाचीं.

उर्वसीनदीपार यात्रा होतां । समर्थ श्रीसदनीं प्रवेशती तत्वता ।
भक्तप्रेमाची देवासी होय अवस्था । अंतरसाक्षी समर्थस्वामि ॥ १७ ॥
समर्थस्वामीचे आत्मकारखाने मामूरे[1] । समर्थस्वामीचे आत्मखजाने भरपूर
नाना वैभवभजनाचे चालिले पूर । नाना वस्त्रें भूषणें वहनें शिबिकादि ॥
समर्थमंचकशैय्यातळीं कनकमुद्रा । गुप्त सेवा अर्पिती गुरुराजराजेंद्रा ।
रामनामा सेवक श्रीरामचंद्रा । निवेदन करितसे पंचार्ति ॥ १९ ॥
उत्तम वस्तु द्वीपांतरीची । तितुकी पूजा समर्थाची ।
भडसे[2] पुरली लोकां सकळांची । श्रीरघुनाथजीची इछा हे ॥ २० ॥
षण्मास आंबे गोमंतपर्वतीचे । समर्थासी येती अपाड पाडाचे ।
नाना ऋतुकाळीं नाना फळांचे । आहार सर्वदां समर्था ॥ २१ ॥
रुद्रशतसंख्या सेवणें नागपर्णें । उत्तम कर्पूर सुपारी दंतें किंचित चर्वणें ।
प्रिकपात्रें शुद्ध शोधून सेवकें पुढें धर्णें । लोकीं अलभ्य लाभणें प्रसादु ॥
समर्थें वस्त्रप्रसाद लोकावरी फार उडविले ।
कांहीं पारपत्यांहीं संदुख पेठारे दडविले ।
समर्थें श्रीरघुनाथश्वशुरासी[3] आहेर केले । चरिंदे लाविले हेरंबवहना ॥२३
सकळ प्रांतासी वृत्तांत गेले । मागुती पूजासंभार नित्य चालिले ।
समर्थें अकराशतें धोत्रजोडे येके दिवसीं वांटिले ।
नाना ब्राह्मणां सेवकां ॥ २४ ॥
नाना मंदिले मेखळा कंथा अधिकारें । नाना चादरा वांटिल्या सर्वेश्वरें ।
पादुका पैजारा पूजनार्थ आदरें । सत्शिष्यवर्गासी लाभती ॥ २५ ॥
समर्थदर्शनासी गौतमीतीरबंदरें[4] लोटलीं ।
नाना सुवर्णतंतुरूपें[5] श्रीगुरुदेवा भेटलीं ।
नाना सृष्टिसंसर्गें विषादें दाटलीं । येथें कोंदाटलीं ब्रह्मानंदें[6] ॥२६॥

---

१ महामूर, पुष्कळ. २ उत्कटेच्छा. ३ रघुनाथश्वशुर ह्मणिजे अग्नि. कित्येक वस्त्रें अग्नीला अर्पण झालीं व कित्येक हेरंब-(गणपति) वहन जे उंदीर त्यांनीं चरिंदा ( खाद्य ) ह्मणून खाल्लीं. ४ गोदावरीच्या मुखाशीं जीं बंदरें आहेत तीं. ५ तेथून सुवर्णाचा जर श्रीसमर्थांना नजराणा येई. ६ प्रपंचसंगापासून सर्वत्र दुःख भरलेलें आहे परंतु श्रीसज्जनगडावर मात्र ब्रह्मानंदावांचून दुसरें कांहीं नाहीं.

नाना मच्छलीबंदरें कळसपाखें दर्शनासी आलीं ।
नाना महंतसंगें सत्संगें गुरुदेवदर्शनें घडलीं ।
नाना मल्याद्रीनें मंचकपूजा समर्पिली । गंध मणिमाळा वेष्टित मनोहरा ॥
कितेक संख्या संवत्सर । येक येक वृषभ भरूनि वाती गंध माळा धूसर ।
उद्धवमहंताचे पूजाप्रकार । चांफळ पर्यळीं अधिष्ठानीं ॥ २८ ॥
किति कांसपात्रें पितळपात्रें । तांम्रपात्रें जस्तपात्रें ।
रौप्यपात्रें सुवर्णपात्रें । समर्थसदनीं सेवकें समर्पिलीं ॥ २९ ॥
विजणें चामरें मोरछलें निशाणें । मंडप चांदवे चौकिया आसनें ।
नाना बैसका समया पिलस्ता पुतळ्या अर्पणें ।
दमामे नगारे संकीर्तनें वाद्यादि ॥ ३० ॥
नाना ताळ झांझर सुंदर मृदांग । नाना ब्रह्मविणें रुद्रविणें उपांग ।
नाना हुंडक यवर्जे सुधारसरंग । नाना कथाप्रसंग सामग्री ॥ ३१ ॥
उद्धवें सप्तशत भगवे निस्पृह अतित आणिले ।
समर्थासी श्रीसज्जनपर्वतीं निवेदन केले ।
आपण येकाकी गुप्तस्वरूपें सेवक लीळे । सुलीन येकांत दर्शनें घेतलीं ॥
गुरुदासें उद्धवें वैभवें अर्पिलीं । गुरुसेवकें सप्रेमें समर्पिलीं ।
गुरुभक्तें गुरुपदीं ब्रह्मार्पण कर्में केलीं । गुरुगीतार्थे लक्षूनिया ॥३३॥
भक्ति त्रिवेणी वेणी नित्य मानसपूजा। विजयादशमीसी समर्थ दर्शनपूजा ।
चित्रारवितेजें अवलोकणें संपूर्ण वस्त्रपूजा । समर्थध्यानें लक्षूनियां ॥३४॥
समर्थासी विनविलें लडिवाळपणें ।
स्वामि मजला अखंड पाहिजेती श्रीपदअर्चनें ।
समर्थें भक्ति त्रिवेणीसी दिधलीं ग्रंथार्चनें । सर्व हि अर्चनें घडलीं हो ॥
समर्थासी पुन्हा सप्रेम विनविलें ।
श्रीरघुनाथजीसी हितगुज सांगावें लागतें आपुलें ।
तैसें चि समर्थग्रंथार्चनीं जरि निवेदिलें । तरी साक्षात्कार होतील किं ॥३६

---

१ मच्छलीपट्टणाहून. २ "मलयाद्रीनें" बाडांत. ३ (?). ४ वाद्यविशेष (?). ५ चित्रा नक्षत्रांतील प्रखर सूर्यतेजानें.

समर्थ ह्मणती यासी अनुमान काई । श्रीगुरुवाक्यीं सामर्थ्य सर्व कांहीं ।
तुह्मी गुरुसेवक निश्चितार्थ जाणूनि पुसतां पाहीं ।
लोकसंग्रहार्थे यथार्थ ॥ ३७ ॥
श्रीरामदेवार्चन सिद्ध चि आहे । श्रीग्रंथराजदासबोधसामर्थ्य सिद्ध चि पाहे ।
जो जो महंत येथें निश्चयें राहे । तो तो लाहे साक्षात्कारु ॥ ३८ ॥
ऐसें समर्थे दासबोधग्रंथसामर्थ्य बोलिलें । वेणीस्वामी वचन संप्रदाई सांगितलें
परंपरान्वयें निरोपण जालें । संतसज्जनीं केलें निवेदन आह्मी ॥ ३९ ॥
सज्जनपर्वतीं समर्थस्वामि । संतसज्जन गुरुरूपें तुह्मी ।
तुह्मी आह्मी आत्मयारामि । गुरुवाक्यें उत्तमभूमि श्रवण करूं ॥ ४० ॥
कोण्हियेक देवद्विज चर्चा करिती । पुत्र नाहीं त्या स्वर्ग नाहीं ह्मणती ।
कितीयेक संतासी वंशसंतति । समर्थवंशसंतान दिसेना ॥ ४१ ॥
ऐसीं प्रवृत्तिमार्गें होती चर्चावचनें । तव समर्थासी निवेदिती वर्तमानें ।
स्वामि सप्तऋषिदुर्गापासूनि कोण्हियेक महंत लोटांगणें ।
घेत येतसे श्रीचरणाजवळी ॥ ४२ ॥
अरे ब्राह्मण श्रमत असेल ह्मणोनि । सिबिका सत्वर आणा रे सिद्ध करूनि
स्वामि सिद्ध सिबिका समर्थ तत्क्षणीं । सिबिकारूढ पर्वत उतरले॥४३
महंत लोटांगणें घेत येत चि आहे । दोनि क्रोश भूमि अंतर राहे ।
समर्थें इच्छामात्रें श्रीपदीं आणिला पाहे ।
श्रीचरणीं मिठी घातली उदासनाम्नें ॥ ४४ ॥
देवद्विज संतसज्जन मंडळी । पर्वतातळीं उतरले भूमंडळीं ।
समर्थें आलिंगन देऊनि महंतासी पिढी पुसिली ।
ह्मणे अक्रावी पिढी माझी समर्थ देवा ॥ ४५ ॥
ऐसें श्रीगुरुदेवसंतान वाढलें । देवद्विजाचें समाधान जालें ।
नापुत्रस्य लोकोस्ति स्वर्गमार्गें बोलिलें ।
अनंत स्वर्ग लागती श्रीगुरुचरणीं ॥ ४६ ॥
अकरावी पिढीचा भव्य पुरुष । निस्पृह उदास जेविं चंडांशु[1] ।
सहस्त्र यात्रा समागमें पर्वतास । समर्थ वेधेले[2] स्वानंदें ॥ ४७ ॥

---

१ सूर्य. २ चढले.

कित्तेक दिवस गुरुदेवअर्चनें । समाराधना संकीर्तनें ।
वेणीसंप्रदायें वर्तमानें । देखिलीं लिहिलीं यथार्थ हो ॥ ४८ ॥
ऐका समर्थें येकदां दशमास येकांत सेविले ।
कित्तेक लोक दर्शनासी उताविळे ।
कित्तेक लोकीं देवासी नवस केले । अनुष्ठानीं घातले ब्राह्मण ॥४९॥
ब्राह्मणासी दिधला बहुमान । देवासी दिधला नवस सन्मान ।
समर्थें दिधलें जांबूनदरूप[1] येकांत रामदर्शन ।
विजयादशमीसी सज्जनदुर्गीं ॥ ५० ॥
सज्जनदुर्गींच्या सुमनगंधमाळा । अपार लोटल्या सुमन सुढाळा ।
कोंण्हि प्राणी राहिला नाहीं दर्शनावेगळा ।
नाना मंदिलें मेखळा वाइल्या शतावधि ॥ ५१ ॥
संपूर्ण ध्यान लोकांसी पाहविलें । श्रीपांडुरंगापरि समर्थें लुटविलें ।
मर्यादा सांडूनि जन लोटले । येकेक पुष्प आलें वाट्योसी[2] ॥ ५२ ॥
शांकरी शशांक मेखळा[3] यशरूपें राहिली आंगीं ।
मग समर्थ चालिले दक्षिणांगीं ।
दक्षिणप्रांत पवित्र जाला सीमाउलंघनप्रसंगीं ।
आसनासी भौमें[4] दिव्यांगीं आणिला ॥ ५३ ॥
अचळअचळीं अचळ स्थापिला । अचळअचळीं सिद्धांत कल्पिला ।
अचळअचळीं दिग्पांत[5] लक्षिला । पूर्णावतार प्रसंगीं ॥ ५४ ॥
शिवराज वासुदेवमहंतासी पाही ।
अति दर्शनलालसांसी श्रेष्ठासी वियोग नाहीं ।
येऱ्हविं कोण्हासी हि समर्थवियोग न सोसवे कांहीं ।
ध्यानीं मनीं चिंतनीं सर्वदां ॥ ५५ ॥

---

१ जांबूनद=सुवर्ण. २ "वाट्यासी प्रसादु" बाडांत. ३ शंकराचे मस्तकीं जी निष्कलंक चंद्राची कोर आहे तद्रूप कटीसूत्र काय तें फक्त श्रीसमर्थांचे अंगावर होतें. तात्पर्य जेवढें मिळालें तेवढें सर्व लोकांना देऊन स्वतःला फक्त एक काय ती लंगोटी ठेवली. ४ भूमि, दगड. ५ अष्ट दिग्पाल.

श्रवणीं कीर्तनीं स्मरणीं पादसेवनीं । अर्चनीं वंदनीं गुरुदेवदास्यभजनीं ।
सख्यत्व सुमनी आत्मनिवेदनीं । सद्गुरुश्रीसमर्थसदनीं सर्वदां ॥ ५६ ॥
सद्गुरुसमर्थ सज्जनदुर्गवासी । ध्यानीं मनीं संतसज्जनासी ।
नाना महंतरूपें विश्वजनासी । भूमंडळीं करिती उद्धारु ॥ ५७ ॥
एवं सज्जनपर्वतनिवासी वर्तमानें । यथाप्रसंगें निवेदिलीं सेवकानें ।
पुढें समर्थाचीं शिष्यमहंतसंतानें । वेणीगिरिधर सांगेल ॥ ५८ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ५९ ॥
समास नवम ॥ ९ ॥ जय जय राम ॥ ॥

---

## ॥ समास दाहावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

मागां समर्थप्रतापचारित्रादिकें वर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां समर्थपरंपरा पुरुषवर्द्धमानें । आदिकथनें[1] सज्जनीं परिसावीं ॥१॥
आदिपुरुष आत्माराम । ब्रह्मा वशिष्ठ स्वामी श्रीराम ।
हनुमानअवतार समर्थनाम । श्रीरामदासस्वामी जगद्गुरु ॥ २ ॥
आत्मारामें केला मंत्रोपदेश । आत्मारामें केला ब्रह्मोपदेश ।
आत्मारामें जाला ज्ञानप्रकाश[2] । उत्पन्नज्ञानी जगद्गुरु ॥ ३ ॥
सूर्यनारायण समर्थ मूर्ति । सूर्य गंगाधर श्रेष्ठ मूर्ति ।
सूर्यवंशीं अवतार मूर्ति । समर्थस्वामी जगद्गुरु ॥ ४ ॥
मुख्य समर्थस्वामीमहिमानें । ॐ पुण्यावचनीं सावधानें[3] ।
ब्रह्मचर्यकीर्ति खंब्रह्में[4]वितानें । अनंत ब्रह्मांडीं विस्तारलीं ॥ ५ ॥

---

१ जन्मकथा. २ हें ज्ञान रामकृपेनें । धन्य रामउपासना ॥. ३ ॐ पुण्याहवाचनाचे वेळीं सावधान शब्द कानीं पडतां च श्रीसमर्थ सावध झाले हा श्रीसमर्थांचा मुख्य विशेष. ४ खंब्रह्मरूपी वितान ह्मणजे छत.

अवतारभूमीहूनि प्रस्थानें । पंचवटिके अनुष्ठानें ।
आदिपुरुषश्रीरामदर्शनीं वरदानें । हनुमानरूपें प्रगटलीं ॥ ६ ॥
समर्थरामें वटवृक्षातळीं । समर्थआख्याता ठेहूनि दिधली ।
ज्येष्ठबंधूसी पूर्वि तीन दिवस समाधि लागली ।
पंचक्रोशी गौतमी जांबेमध्यें ॥ ७ ॥
श्रेष्ठ समर्थ उभय संतानें । वंशसंतानें शिष्यसंतानें ।
गंगातीरस्थ कृष्णातीरस्थ अभिधानें । श्रीरामदासस्वामि समर्थ ॥ ८ ॥
श्रेष्ठांपासूनि[1] राम शाम मूर्ति । राममूर्तीपासूनि[2] गंगाधर शाम मूर्ति ।
समर्थापासूनि अनंत मूर्ति । शिष्यसंतानें चालिलीं ॥ ९ ॥
समर्थें कित्तेक गुप्त शिष्य केले । ते ते समर्थासी विदित भले ।
भरतखंडीं प्रगट जे जाले । ते ते निवेदन करूं ग्रंथार्थीं[3] ॥ १० ॥
मुख्य जगदोद्धार करणें समर्था । शुद्ध विस्तारणें परमार्था ।
दासबोध ग्रंथराज विवरणें निजस्वार्था । त्रिकांड वेद प्रमाणें जगद्गुरु॥ ११
सद्गुरुचरणीं परंपरा वेणी । तत्वमसि हे वाक्य त्रिवेणी ।
नाना पुरुष अध्यात्मश्रवणीं । परमार्थपंथें चालिले ॥ १२ ॥
भरतखंड व्यापूनि अवनि । पूर्व पश्चिम उत्तर दक्षिणि ।
मायासमांतक[4] निजबोधतरणि[5] । प्रकाशले पुढें ॥ १३ ॥
**वासुदेव**[6] नामा अनुष्ठानी । समर्थप्रतिमा ह्मणती जनीं ।
उत्कट परमार्थ विस्तारूनि । समर्थचरणीं लीन राहे ॥ १४ ॥
**उद्धव** नामा पट्टाभिमानी । पूर्व पश्चिम गोदातीर[7] अवनि ।
उत्कट यात्रा चालवी जनीं । श्रीगुरुचरणीं मर्यादे ॥ १५ ॥

---

१ रामजी आणि शामजी असे दोघे पुत्र श्रेष्ठांना होते. २ रामजींना दोन पुत्र होतेः गंगाधर आणि शामजी. ३ " ग्रंथांतरीं " असा पाठ बाडांत. ४ मायारूपी अंधकाराचा नाश करणारे. ५ आत्मज्ञान करून देणारे तरणि ह्मणजे सूर्य. ६ यांचा मठ कण्हेरीस आहे. जास्त माहितीसाठीं व सामान्यपणें या समासासाठीं मालेंतील तिसऱ्या भागाची प्रस्तावना पहावी. ७ गोदावरीच्या कांठीं पूर्वेस इंदूरबोधन येथें व पश्चिमेस नाशकाजवळ टांकळीस, अशा दोन ठिकाणीं यांचे मठ आहेत. यांची समाधी टांकळीस आहे.

**कल्याण** नामा ग्रंथ विस्तारी । उत्कट कीर्ति विश्वाभीतरी ।
देहांत साधेनें गुरुआज्ञे करी । कल्याण चराचरीं पावला नाम ॥१६॥
कल्याणनामा वाढला शिष्यसंतानें । **दत्तात्रेय** बंधु पुत्रसंतानें ।
उभय पक्षीं लोकांसी भजनें । केली वृंदावनें सत्कीर्ति ॥ १७ ॥
**गिरिधर** उद्धवपिता उदास । केवळ प्रेमळ गुरुचरणीं वास ।
दोनि दोनि मुहूर्त सावकाश । ग्रंथविवरणीं अभिवंदनीं ॥ १८ ॥
रंगबोध **रंगमूर्ति** संकीर्तनें । परम विलासी जनपद मानें ।
पुढें पुढें विरक्त अतिमानें । उभय संतानें गुणकीर्ति ॥ १९ ॥
**दिवाकर** नामा शिवगणद्वारीं । नाना जीव संकल्प विकल्प तमवारी ।
**भैरव** रामचंद्रपुत्र देवद्वारीं । पुराणीक निर्धारीं समर्थाचे ॥ २० ॥
**गणेश** नामा अग्रवादी । शास्त्रमतें सर्वांसी बोधी ।
नाना आत्मचर्चा प्रत्ययसाधी । वैदिक वेदांतप्रतिपाद्य ॥ २१ ॥
**विठ्ठल** नामा रघुनाथसदनीं । येकनिष्ठ श्रीगुरुवचनीं ।
केवळ प्रेमळ स्वामिभजनीं । प्रसाद चरणीचा सांभाळी ॥ २२ ॥
**नृसिंह** नामा मारुतिदास । पंचक्रोशी कृष्णातीरीं वास ।
परमार्थ विस्तारी बहुतांस । समर्थसेवेसी तत्पर हो ॥ २३ ॥
**निरंजन** नामा येक मास तरुतळीं वनीं । गुरुआज्ञामहिमा दावित जनीं ।
बैस न ह्मणतां न बैसे अवनीं । नाम निरंजनीं लाधला ॥ २४ ॥
**कपिल** नामा येकनिष्ठ । ग्रंथपारायणीं वरिष्ठ ।
समुदाय केले उत्कट । शुद्ध परमार्थ वाढविला ॥ २५ ॥

---

१ ग्रन्थलेखक, यांचा मठ डोमगांवीं आहे. २ स्वतःच्या देहावर यांनीं उदार होऊन गुरुवचनप्रतिपालन केल्याच्या गोष्टी अनेक आहेत. निजवचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन । तो कल्याण चि केला जीवनदानें करूनिया जतन ॥. ३ यांचा मठ श्रीक्षेत्र चाफळाजवळ शिरगांवीं. ४ हे आरंभीं विलासी होते. गाणारे फार उत्तम होते. हनुमंतस्वामींनीं यांची गोष्ट दिली च आहे. मठ चाफळाजवळ पालीस. ५ लोक. ६ हे श्रीसमर्थांचे उपाध्याय होत, राहणारे महाबळेश्वरचे. राजद्वारीं जाण्यायेण्याचें काम यांच्याकडे असे. ७ वादांत पुढारी.

**अनंतमौनी** करनाटकीं **अनंतमौनी** । अरुणाचळप्रांत अवनि ।
मन्यारगुढीसी **मेरु**शिष्यतरणि । अनंत बोधकीर्णीं फांकला ॥ २६ ॥
**जयवंत** नामा दक्षिणेकडे । परमार्थ विस्तारी चहुंकडे ।
श्रीरामगोपुरीहूनि कपिवत् पडे । रामदूतत्व दाऊनियां ॥ २७ ॥
**राघव** नामा दक्षिणप्रांतीं । परमार्थविस्तार करी बहुतीं ।
शिष्यपरंपरा अमिति । समर्थसेवेकारणें ॥ २८ ॥
**विश्वनाथ** नामा पंडित । खंडित ज्ञानी अखंडित ।
आशंका खंडोनियां नवांकित । प्रेरिला अंकित उत्तरपंथें ॥ २९ ॥
**आणपा** नामें महंत । नाना उत्तम गुणें आळंकृत ।
शिष्यसमुदायें कित्तेक प्रांत । उद्धरिला कीर्ति ॥ ३० ॥
समर्थसदनीं **राम** नामा । चांफळग्रामीं **भास्कर** नामा ।
समर्थअधिष्ठानीं भक्तिमहिमा । कित्तेक काळें वाढविला ॥ ३१ ॥
**हरि** बंधु **महादेव** शक्तिआलयभुवनीं । मारुतिअर्चनीं वैभवभजनीं ।
उत्कट यात्रा आणिती अधिष्ठानीं । समर्थ नयनीं संतोषविती ॥ ३२ ॥
**गोपजी** गोसांवी वेणाबाईजनक । ज्यांसी सादृश्य श्रीरघुनायक ।
बाळपणीं उपदेशिले श्लोक । अध्यात्मरामायणाचे ॥ ३३ ॥
**काशिराज** कन्यासंतति वेणाबाई । येकनिष्ठ उपासक भक्तराज पाहीं ।
दुसरें दैवत कुळीं जाणत नाहीं । समर्थें कडिये खेळविला ॥ ३४ ॥
**देवदास** नामा येकासनी । नगरप्रांतें श्रीरामउपासनी ।
मूर्तिस्थापना करूनि जनीं । वैभवभजनी परमार्थें ॥ ३५ ॥

---

१ अनंतमौनीचे शिष्य मेरु. यांचे अनेक ग्रन्थ आहेत आणि ह्मणून च त्यांना सूर्याची उपमा देऊन त्यांचे पासून अनंत बोधरूपी किरणें निघालीं आहेत असें ह्मटलें आहे. या ग्रन्थांपैकीं अजून कांहीं च प्रकाशित नाहींत. २ अगणित, पुष्कळ. ३ अंकित=शिष्य. नवांकित=नवीन च दीक्षा दिलेला शिष्य. ४ आण्णाप्पा ऊर्फ आनंद. मोगलाईंत निलंगें गांवीं यांचा मठ असून तेथें च समाधी आहे. आण्णाप्पांचे हातचा दासबोध मठांत आहे. प्रतीचा आकार तंतोतंत आद्य प्रती एवढा व अक्षरांचें वळण शुद्ध कल्याणांचें. पुण्यतिथि मार्गशीर्ष वद्य तृतीया. ५ “कन्या” बाडांत नाहीं. कन्यासंतति=मुलीची मुलगी, दौहित्री. ६ “माह्यापुरुष” बाडांत. ७ यांचा मठ दादेगांवीं आहे. समाधी हि तेथें च.

**दिनकर** नामा स्वधर्ममार्गें । माहा वित्पन्न शास्त्रमार्गें ।
तीक्षण बुद्धि देखूनि स्वामिभर्गें । दिनकर नाम ठेविलें ॥ ३६ ॥
**विश्वनाथ** नामा महंत । श्रीगुरुसेवे संत श्रीमंत ।
कित्तेके उद्धरिले जीव असंत । रामपुत्र संतानि ॥ ३७ ॥
**नारायण** नामा फिरस्ती । कदाचित शक्तिभुवनीं करी वस्ती ।
जेणें पुत्रासी केली शास्ति । दैवी अमर्यादे ॥ ३८ ॥
**तुकोबा** नामे हेळवांकि । परम उदास निस्पृह लोकीं ।
कित्तेक लोक उद्धरिले शेंकीं । समर्थस्वरूपीं लीन राहे ॥ ३९ ॥
**मुरारि** नामा नारायणपिता । बाहोक्षत्रीं प्रांतीची यात्रा आणिता ।
केवळ भक्त साबडा सर्वथां । कथाकीर्तनीं प्रेमळ हो ॥ ४० ॥
समर्थमुखें **अंबादास** । मुखतांबुल लाभलें त्यास ।
च्यारी पुत्र संजीवनी दिधले उदास । वेणीसंप्रदाईं लाविले ॥ ४१ ॥
बाहोक्षत्रासमीप नाम गावडा । निपुत्रिक सुपुत्रिक केला रोकडा ।
अष्टपुत्रेंसीं पांवे ढोल धडधडां । वाजवीत यात्रा आणितसे ॥ ४२ ॥
**नामसेटी**ची यात्रा तुंबळ । बादली तगटी निशाणें सकळ ।
नाना उंच शोंसनें धातुबंदी केवळ । दाखवी दीक्षा प्रांतासी ॥४३॥
**उदास** नामा प्रेमळ दास । देशांतरीं ज्याचा वास ।
कोटांगणीं येत दर्शनास । सप्तऋषिदुर्गीहूनि अधिष्टानीं ॥ ४४ ॥
**उद्धव** बाळकासी समर्थें ऊर्ध्वपादें धरिलें ।
प्रपंची होसी परमार्थी होसी पुसिलें ।
वैराग्यदीक्षेंत बाळपणीं कर्णीं उपदेशिलें । सत्पात्र केलें भूमंडळीं ॥४५॥
**जीवन** नामा महंत भला । जेणें समाधिस्थळासी प्रारंभ केला ।
श्रीगुरुदेवकार्यें विलया गेला । अधिष्ठानीं सुखरूप ॥ ४६ ॥

---

१ तिसगांव मठपति "स्वानुभवदिनकर" कर्ते. २ "उदंड" बाडांत. ३ शेखीं, शेवटीं. ४ तांब्याच्या पत्र्यावर लिहिलेलीं आज्ञापत्रें. ५ मुलाला पायावर धरून दुधांत टाकूं कां दह्यांत टाकूं असें लोक विचारतात, त्याऐवजीं प्रपंचांत टाकूं कां परमार्थात, असें श्रीसमर्थांनीं उद्धवांना विचारावें ! व शेवटीं त्यांना परमार्थांत च टाकलें. उद्धवस्वामींचें केवढें भाग्य कीं श्रीसमर्थांच्या मांडीवर त्यांनीं खेळावें व बाळपणीं च वैराग्यदीक्षा मिळवावी !

**महादेव** नामा चेतनाग्नि[1] । युगधर्मशोधक चित्तभग्नि[2] ।
आपुल्या जीवें तरला जनीं । शिष्यसंप्रदाय न केले ॥ ४७ ॥
**तुकोबा** बिडवी कीर्तनकारी । शक्तिस्थानीं मारुतिद्वारीं ।
प्रथम चांफळीं हरिकथा करी । शक्तिआलय यात्रेमध्यें ॥ ४८ ॥
**त्रिंबक**[3] वासुदेव मौज फकिरी । उदंड बागबागायत करी ।
समाधि घेतसे पर्वतावरी । गोदावरीच्या उत्तरे ॥ ४९ ॥
**कृष्ण** नामा तापीपुरीं । उत्कट परमार्थ लोकीं विस्तारी ।
सद्गुरुकृपे जग उद्धरी । यात्रा भरी देवाची ॥ ५० ॥
मुसळ करीं **मुसळ** नामा । मुसळीं हनुमानाचा दावी माहिमा ।
गंगातीरीं धोंडरींत सामर्थ्यसीमा । माहापुरीं मुसळ रोविलें ॥ ५१ ॥
**भोळाराम** श्रीरामभक्त । श्रीगुरुसेवेमध्यें युक्त ।
सद्गुरुकृपें नित्यमुक्त । उदंड परमार्थ वाढविला ॥ ५२ ॥
**जयराम** नामा कुंडलधारी । अनुष्ठाता परमार्थ विस्तारी ।
करनाटकप्रांतें जग उद्धरी । श्रीगुरुस्वामीप्रतापें ॥ ५३ ॥
**जीवन्मुक्त** नामा भक्त करारी । समर्थें बर्छीनें फोंकिला वनांतरीं ।
माहा प्रसादे दिधला गिरिकंदरीं । कर्णावरूनि बर्छी गेलिया ॥५४॥
**प्रेमळशेटि** नामा भक्त भोळा । अकरा वर्षें नैवेद्य तेणें केला ।
शेवटीं सज्जनपर्वतीं गुप्त जाला । कोणसा न कळला कोणासी॥५५॥
**अनंत** नामा पंचक्रोशी पंढरीं । श्रीगुरुचरणीं निष्ठा बरी ।
उदंड समर्थपरमार्थ विस्तारी । उभय संतानें सृष्टीमध्यें ॥ ५६ ॥
**बाळककृष्ण** नामा वऱ्हाडदेशीं । चित्त समर्थचरणापासीं ।
सज्जनपर्वतीं श्रीगुरुभजनासी । **राम** नामा सेवक हरिकीर्तनासी ठेविला॥
**माहारुद्र** नामा महंत । वऱ्हाडदेशीं संत श्रीमंत ।
समर्थकृपें जीव अंतवंत । मोक्षश्रिया आळंकृत तेणें केले ॥ ५८ ॥

---

१ ज्ञानाग्नि. २ ज्याचें मन उन्मन झालें आहे असा. ३ भालगांवीं डोंगरावर समाधी आहे ती यांची. मठ हि भालगांवीं आहे. विद्यमान मठपति ह्मणतात हा च मठ भोळारामांचा, त्यांचे मूळ नांव त्रिंबक. पण पुढें बावन्नाव्या ओवींत भोळारामांचा स्वतंत्र निर्देश आहे तो कसा?

**याद[1]व माधव** नामा प्रयागवेणीच्या कावडी ।
समर्थ स्नानासी आणितां[2]ती आवडी ।
श्रीचरणामृताची ज्यांसी अत्यंत गोडी । आत्मलिंग स्नपना[3]र्थे ॥ ५९ ॥
**त्रिंबक** नामा उपनाम गर्गें[4]नि । ज्ञानवैराग्य केवळ वन्हि ।
दंडाराजपुरींप्रांतीं तळकोंकणीं । जगदोद्धार करितसे ॥ ६० ॥
**हरिदास** नामा गुरुदर्शनीं । सहनशीळ गुरु[5]तर्जनीं ।
उदंबरग्रामीं मारुतिअर्चनी । श्रीगुरुभजनीं विख्यात ॥ ६१ ॥
**बाळकराम** नामा छंद सवाई । श्रीगुरुप्रताप वर्णी कांहीं ।
उभय संतानें भक्तियुक्त पांहीं । श्रीरामसमर्थसंकीर्तनीं ॥६२ ॥
**जनार्दन** नामा सुरतप्रांतीं । समर्थकृपेची करी महंती ।
जगदोद्धरण देखूनि संतीं । प्रेमें माथे डोलविले ॥ ६३ ॥
**दामोदर** नामा श्रीगुरुभजनीं । समर्थसंप्रदाय चालवी जनीं ।
भक्तिज्ञानवैराग्यें विजनीं । देवगडप्रांतीं विराजे ॥ ६४ ॥
**श्रीधर** नामा श्रीरामभजनीं । श्रीगुरुसेवे संकीर्तनीं ।
कितेक जगोद्धार करीत जनीं । रामटेंकप्रांतें विराजे ॥ ६५ ॥
**गोविंद** नामा येकानिष्ठ । श्रीगुरुसेवेमध्यें वरिष्ठ ।
समर्थपरमार्थ विस्तारी उत्कट । गोमंतप्रांतीं विराजे ॥ ६६ ॥
**वामन** नामा ऱ्हस्व[6] येथें । वामन नाम ठेविलें समर्थे ।
श्रीगुरुचरणीं वाऊनी मन तें । विक्रम दाखवी परमार्थी ॥ ६७ ॥
**भैरव** नामा श्रीगुरुभक्त । भक्तिज्ञानवैराग्ययुक्त ।
जगदोद्धारक नित्य मुक्त । गोकर्णप्रांतीं विराजे ॥ ६८ ॥
**शिवराम** नामा समर्थसंगें । कितेक दिवस अंतरंगें ।
पुढें पुढें जगदोद्धारणप्रसंगें । तेलंगणप्रांतें आज्ञापिला ॥ ६९ ॥

---

१ दोन्ही प्रतींत " यादव " मागाहून लिहिलेलें आहे. २ प्रथम " आणितसे " होतें त्याचें " आणिताती " केलें आहे; पण बाडांत " आणितसे " च राहिलें आहे. ३ स्नानार्थ. ४ आडनांव आकाशे. ५ गुरूंनीं धाक दाखविल्यास, दोष काढल्यास. ६ ठेंगणा.

**सदाशिव** नामा महंत । कितेक उद्धरी जीवजंत ।
सगरप्रांत रायचुरप्रांत । समर्थकृपें उद्धरिला ॥ ७० ॥
**शंकर** नामा उदास मूर्ति । रुद्राक्ष धरितसे पुण्यकीर्ति ।
श्रीरामभजनीं सत्कीर्ति । श्रीरंगप्रांतीं विराजे ॥ ७१ ॥
**राम** नामा सामर्थ्यमूर्ति । श्रीरामनौमि उत्कट कीर्ति ।
ज्याचेनि कैवारें म्लेंछ संव्हारी मारुति । बेदरीं पाडी मदळसा [1] ॥ ७२ ॥
**बेनिमाधव** त्रिवेणीतीरीं । **हरिचंद्र** नामा अंतर्वेदिभीतरी ।
**हरिवंस** नामा गंगासागरीं । समर्थपरमार्थ वाढवितो ॥ ७३ ॥
**रामकृष्ण** नामा अयोध्यापुरीं । **हरिकृष्ण** नामा मथुरापुरीं ।
**जयकृष्ण** नामा मायापुरीं । समर्थपरमार्थ बिस्तारितो ॥ ७४ ॥
**रामचंद्र** नामा कासीमध्यें । **भगवंत** नामा कांतीमध्यें ।
**गंगाधर** [2] नामा अवंतिकीमध्यें । द्वारकेमध्यें **हरि** नामा ॥ ७५ ॥
**दयाळ** नामा बद्रिकेदारीं । **विश्वंभर** नामा सोरटीभीतरी ।
**रघुनाथ** नामा उज्जनीपुरीं । गुरुभक्तिमहिमा विस्तारितो ॥ ७६ ॥
**ब्रह्मदास** नामा उंकारीं । **बल्लाळ** नामा आउंढागिरी ।
**कोदंडराम** नामा शेषाद्रिवरी । श्रीशैल्यशिखरीं विराजे ॥ ७७ ॥
**गोपाळ** नामा भीमाशंकरीं । **मल्लारी** नामा पर्यळीनगरीं ।
**आनंद** नामा घुष्मेश्वरीं । देवगिरीप्रांतीं राहातसे ॥ ७८ ॥
**हनुमान** नामा रामेश्वरीं । **मारुतिदास** मल्याळाभीतरीं ।
**बलभीम** नामा अनंतशयनांतरीं । गुरुभक्ति अत्यंत वाढवितो ॥७९॥
**अनंत**[3]कवी सैह्याद्रिशिखरीं । समर्थप्रताप वाणी वैखरी ।
**चक्रपाणी** नामा त्रिश्वाभीतरीं । निस्पृह उदास फिरताहे ॥ ८० ॥
अनंतनामी जगदीश । आत्मारामस्वामि परेश ।
समर्थमहंत सावकाश । यथानुशक्ति वाखाणिले ॥ ८१ ॥

---

१ मंडपाच्या किंवा छताच्या मध्यभागाला मदलसा ह्मणतात. २ ' गदाधर ' पाठांत. ३ श्रीसमर्थांवरील यांचें अष्टक प्रसिद्ध च आहे.

समर्थमहंत मागें ऐकिलें श्रवणीं । त्यांचे महंत येती अधिष्ठानीं ।
कांहीं सन्निध सेवेसी वर्तमानी । यथाकिंचित निवेदिजे ॥ ८२ ॥

**माहादेव**[1] नामा कौपिनीअनुष्ठानी ।
**आनंत** सारस्वत मारुतिअर्चनी ।
**वेंकटेश**[2] नामा गुरुदेवभास्करभजनी ।
**केशव**[3] नामा महंत पारपत्यें ॥ ८३ ॥

चांफळीं केशवाची नदीतटरचना । नाना कार्यभागाची विवंचना ।
नाना राजकारण दीर्घसूचना । **जनार्दन** महाराष्ट्रयात्रा आणितसे॥८४॥

**मुद्गल** नामा राहे कल्याणभजनीं । **जगजीवन** तो जनीं विजनीं ।
**आपा** नामें महंत विदेसीं गुणकीर्तनीं । नासिकप्रांतें विराजे ॥ ८५॥

**आनंद**द्वय बहुधारामें[5] । **शिव कृष्ण**[6] बंधु **शिवराम शाम** ।
**हरि मुरारी गोविंद** कित्तेक नाम । परमार्थपंथें विचरती ॥ ८६ ॥

कल्याणरूप महंत सकळ । अधिष्ठानीं भजती केवळ ।
निस्पृह उदास अमळ विमळ । निर्मळ निश्चळ सर्वदा ॥ ८७ ॥

**त्रिंबकरंग रामरंग** सबंधु संकीर्तनीं ।
**राघव शिवराम दत्तात्रि** ललिताभिमानी ।
प्रसंग जाणते कथानुकीर्तनीं । रंग भरिती अद्भूत हे ॥ ८८ ॥

**शिवराम**रंगाची निवेदनी सेवा । यात्रा क्षीरापति निवेदी देवदेवा ।
प्रदाक्षिणा कीर्तनीं विसरूनि देहभावा ।
नाना रंग घमंड भरितसे ॥ ८९ ॥

**हनुमंत** नामा प्रेमळ दास । समर्थें नाम ठेविलें त्यास ।
हरिकीर्तन करी सावकाश । छंदबंदें स्वानंदें ॥ ९० ॥

---

१ येथून पुढें श्रीकल्याणांचे शिष्य दिले आहेत. तिसरा भाग प्रस्तावना पहावी. २ उंब्रज मठपति. उंब्रजेस कृष्णेच्या कांठीं च यांची समाधी आहे. ३ श्रीकल्याणांच्या पश्चात् डोमगांवमठाचे हे च अधिपति झाले. ४ श्रीकल्याण-शिष्य तडवळेमठपति. तडवळ्यास च समाधी. यांची कविता पुष्कळ उपलब्ध आहे. ५ बहुधाराम एक च नांव असावे किंवा बहुधा राम ह्मणजे रामाजी नांवाचे अनेक शिष्य. ६ शिवाजी आणि कृष्णाजी असे बंधु.

**गोविंद** नामा समर्थपूजक । पूजाफळ लाभला अनन्य सेवक ।
मंत्रि वाकेनिविसाचा शुद्ध लेखक । वाके मोहरीर[1] हजुरी[2] ॥ ९१ ॥
छत्रें चामरें मोरछेल धारी । रुमाल दीपिका वेत्र धारी ।
जीर्ण नूतन सेवक देवद्वारीं । बंदीजन स्वामी समर्थाचे ॥ ९२ ॥
समर्थस्वामीचीं महंतसंतानें । असंख्य त्यांचीं अभिधानें ।
नाना भूतभविष्यवर्तमानें । येती अधिष्ठानें पाहावया ॥ ९३ ॥
केशव नारायण माधव अंकित । गोविंद गोपाळ वासुदेव अच्युत ।
नृसिंह्य वामन त्रिविक्रम अनंत ।
श्रीधर दामोदर जनार्दन नामें ॥ ९४ ॥
हरिकृष्णनामें जयरामनामें । हरिहरनामें शिवरामनामें ।
आपुलाल्या वंशावळी सांगती संभ्रमें ।
सज्जनपर्वतामाझारी ॥ ९५ ॥
नाना देश भाषा नामें कितियेक । प्रल्हाद उद्धव पुंडलिक ।
हनुमाननामें पुण्यश्लोक । पुरुषोत्तम नामें पातले ॥ ९६ ॥
ककारादि क्षकारें नामें । अकारादि षोडश स्वरें संभ्रमें ।
माहापुरुष पातले अनुक्रमें । सज्जनगिरीमाझारी ॥ ९७ ॥
बाइयास्वामीचा गिरिधरनामा[3] । त्रिवर्गबंधूसी उदित नित्यनेमा ।
त्रिंबक येशवंत बलभीम प्रेमा । श्रीरामसमर्थसंकीर्तनीं ॥ ९८ ॥
ऐसीं भरतखंडीं समर्थमहंतमहिमानें । निवेदनें केलीं गिरिधरानें ।
पुढें शिष्यसंप्रदाई समर्थसंतानें । विद्यमान समर्थें ऐकावीं ॥ ९९ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ १०० ॥
समास दशम ॥ १० ॥ जय जय राम ॥ ७ ॥



---

१ ज्याच्या ताब्यांत मोहोर असते तो अधिकारी. २ एक अधिकारी; हाजीरनीस. ३ प्रस्तुत श्रीसमर्थप्रतापकार.

## ॥ समास अकरावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं । ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे । श्रीरामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां समर्थपरंपरा महंत वर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां शिष्यसंप्रदाई परत्र संतानें । निवेदन करणें सेवेसी ॥ १ ॥
समर्थपरंपरावर्द्धमानें । सांप्रत सांगिजेती वर्तमानें ।
शिष्य परमार्थी समर्थसंतानें । परत्रपावनें परिसिजे ॥ २ ॥
**गणेशपंतीं** रायगडीं पूजा केली । समर्थाआंगीं चांफळीं लोकीं देखिली ।
ज्याचे भक्तीसी संतमंडळी मानवली । आश्चिर्य गुरुभक्तांचें ॥ ३ ॥
**प्रल्हादपंत** केवळ रामउपासक । ज्याचे घरीं सादृश्य श्रीरघुनायक ।
देव्हारांहूनि उठोनि लेंकुरासी देख ।
दधि दुग्ध तूप लोणी वाढिलें ॥ ४ ॥
**रामचंद्र नीळकंठ** शिवराजअमात्य । अतिशयं उत्सह करी नित्यनैमित्य ।
ज्याचीं वृंदावनें लोक नित्य । पराशरपर्वतीं पूजिताती ॥ ५ ॥
**नानाजीपंतीं** समर्थासी विनति केली । स्वामि परब्रह्मीं माया जाली ।
ऐसी कोण रे बोले बोली । इतुक्याचि वाक्यीं अनुग्रहो तया ॥ ६ ॥
**रामकृष्ण** सोऊ देवगिरिस्थानीं । समर्थासी प्रार्थिती आत्मभुवनीं ।
ज्याच्या भक्तीसी कथाकीर्तनीं । समर्थ गेले दोहिंकडे ॥ ७ ॥
**बिश्वंभरपंत** समर्थध्यानी । देशांतरीं आठवी मूर्ति मनीं ।
ज्याच्या प्रीतीसी समर्थ उपवनीं । प्रगटूनि पूजा घेतली ॥ ८ ॥
**विश्वासराय** समर्थचिंतनी । वाराणसीयात्रा धरूनि मनीं ।
अशिरिवांचें[3] प्रकाश देखतां आंगणीं । माहायात्रे निघाला ॥ ९ ॥

---

१ महंत ह्मणजे मठपति; ज्यांना स्वतंत्रपणें इतर शिष्य करण्याचा अधिकार असतो. शिष्य ह्मणजे जो स्वतः उद्धरला असतो परंतु ज्याला मठ स्थापण्याचा किंवा इतरांना मंत्रोपदेश करण्याचा अधिकार नसतो. २ सावकार. ३ अशरीरिणी वाणी, आकाशवाणी.

**नारायणपंत** विजयपुरीं । बंदीं असतां समर्थस्मरण करी ।
श्रृंखळा तोडोनि क्षणाभीतरी । श्रीरामनौमीसी मुहूर्तें आणिला ॥१०॥
**नृसिंहराय** नामा अधिकारी । चांफळीं देवाल्या प्रारंभ करी ।
राजचौकी बैसली असतां द्वारीं । समर्थकार्यें चालवितसे ॥ ११ ॥
**रायाजीपंत** सज्जनगडसबनीस । समर्थसेवेसी रात्रिदिवस ।
समर्थ रागें निघतां घेती समजाविस । ज्याच्यां बोलीं सुबोलीं ॥१२॥
**रंगनाथपंतें** रात्रिभार्गी । ब्रह्मारण्यीं अर्चिले समर्थयोगी ।
कल्याणमहंतासी प्रसाद वेगीं । समर्थें जेहां दिधले ॥ १३ ॥
**कोनेरीपंत मल्लारीपंत** भक्त भोळे ।
ज्यांहिं मूळसाडे टाळ मृदांग वाजवित आणिले ।
समर्थ ऐकोनि भविष्य पुढील बोलिले ।
येथें हरिभक्त जन्मतिल निर्धारें ॥ १४ ॥
**अंबाजी** कोनेरीची हरिभक्तसंतति । स्वामि कार्तिक पर्वीं कांताप्रसूति ।
स्वप्नीं अखंड जिला तेजोन्मय मूर्ति दिसती ।
टाळ मृदांग वाजती हरिकीर्तनीं ॥ १५ ॥
समर्थांचा जामात बाईचा कांत । श्रीगुरुभजनीं केवळ शांत ।
सर्वस्व अर्पी दानशीळ दांत । **बाळकृष्णपंत** शाहापुरीं[1] ॥ १६ ॥
**समर्थउदरीं परत्र कन्या । बोई** नामें प्रथम मान्या ।
वैराग्यदीक्षेंत तडवेली धन्या । लेंकुरें समर्थें पुरिलीं उकर्डा ॥ १७ ॥
भरिलीं घरें समर्थें लुटिविलीं । सर्पवेटाळीं घरीं सोडिलीं ।
हेमभूषणें पाषाणें करीं तोडिलीं । कर्मपात्रें फोडिलीं किती वेळे ॥१८॥
**आक्का** नामें **चिमणाबाई** परम प्रेमळ ।
तीन रात्री सीतोदकीं ठेविली निश्चळ ।
अधिष्ठानीं राहिली केवळ । समाधि चरणीं घेतली ॥ १९ ॥

---

१ मसूर जवळचें शहापूर. २ येथून शिष्यिणींचीं नांवें लागलीं. आद्यस्थान शहापूरच्या सतीबाईना दिलें आहे. ३ (?). ४ आक्कांची समाधी श्रीसज्जनगडावर च आहे.

**अंबिका** नामें कोरान्नि विजयपुरीं । वातावर्ती पातली कृष्णातीरीं ।
करवीरप्रांतीं हरिभक्ति बरी । शिष्यसंप्रदायें केली हो ॥ २० ॥
**द्वारकाबाई** परम उदास । समर्थचरणीं दृढ विश्वास ।
नाना ग्रंथ फुट ग्रंथ पाठ समास । अंतर्निष्ठ सर्वदां ॥ २१ ॥
**नबाबाई** राहे तापीतीरीं । अंतर्निष्ठ अध्यात्मज्ञान विवरी ।
उत्कट परमार्थ लोकीं विस्तारी । समर्थस्वामिप्रतापें ॥ २२ ॥
**मनाबाई** अध्यात्मश्रवणी । येकनिष्ठ श्रीगुरुचरणीं ।
वैराग्यशीळ अंत:करणीं । जनसंग नावडे ॥ २३ ॥
**आपाबाई** संगीतकीर्तनी । कीर्तन करूं ह्मणे राजांगणीं ।
समर्थें वर्जूनि लौकिक जनीं । आपण कीर्तन ऐकिलें ॥ २४ ॥
**अन्नपूर्णाबाई** उद्धवमाता । गिरिधरमहंताची कांता ।
केवळ अंतर्निष्ठ समर्था । ध्यानीं मनीं आठवी ॥ २५ ॥
**सखाबाई**सी चाफळीं राहणें । वैराग्यशीळ अंत:करणें ।
नाना वस्तु संग्रह कर्णें । श्रीरघुनाथयात्रेसाठीं ॥ २६ ॥
**गंगाबाई**सी हनुमानदर्शन । समर्थें येकांतभोजनीं दिल्हें जाण ।
काय स्वामी व्हावें पुसतां आपण । जेवितां हनुमान देखिले ॥ २७ ॥

---

१ यांचें एक पद उपलब्ध झालें आहे. तें येथें द्यावेसें वाटतें, त्यावरून त्यांची योग्यता दिसून येणार आहे:

मी सद्गुरुघरची सैरी शोभल्ये बरी ॥ धृ० ॥ बाइ मज गोल्हाटीं गे राहाणें । तेथुनि श्रीहाटीं मज पाहणें । त्रिकुटशिखरीं येउनि जाणें । बोलल्ये बरी ॥ १ ॥ बाइ मी त्रिगुणीं खेळ खेळते । चतुर्थ गुणीं मी साक्षी होते । सदा मी येते जाते । भय न अंतरीं ॥ २ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण । चौथा देहे महाकारण । स्थानें क्रीडायाचीं जाण । माजी हे बरी ॥ ३ ॥ आतां मी सर्वांसी ग्रासुनी । मोहातीत क्रीडते अनुदिनीं । निशंक वर्तते हो जनीं । पहा च्यातुरी ॥ ४ ॥ रामदासाश्रय म्यां केला । ह्मणउनि विलास सर्व हि जाला । **अंबी** न विसरे गुरुपदाला । प्रतिज्ञा खरी ॥ ५ ॥

२ यांपैकीं अजून कांहीं उपलब्ध नाहीं।

**गोदाबाईचा** सद्भाव केवळ । क्षीरीवरी शुंभाखंडीचा जाला गुळ ।
समर्थे प्रचित दाविली केवळ । शुभा सर्व हि गुळभेंटों ॥ २८ ॥
**अंताबाई** समर्थें उकर्डा जे पुरिली। धोत्रपिळ्या ऐसी कृष्णेंत टाकिली ।
बाईची कन्या परम मान्य जाहाली । समर्थचरणीं पावली संस्थान ॥२९
**कृष्णाबाई** अंध कन्या देवासी वाइली ।
समर्थें चांफळीं वाढविली देवळीं ।
डोळे उघडितां पुण्यपुरुषा लाभली । लग्न केलें स्वानंदें ॥ ३० ॥
स्त्रियांसी कर्मदेहभर्तार गुरु । तयासी कासयासी व्हावे श्रीगुरु ।
ऐसें ह्मणाल तरी मोक्षार्थ सद्गुरु । बहुतां स्त्रियांहीं सेविले ॥ ३१ ॥
गार्गी मैत्रेयी ध्रुवमाता अरुंधती । लीळा चूडाळा अनुसया देवहुति ।
सुलभा मदळसा उमा मिरा मुक्ता मैनावती । उदंड शरण जाती समर्थां॥
कौसल्या शरण श्रीरामातें । गुरुदेवपदीं येक पुत्र कन्या नातें ।
स्त्रीपुरुषें मायबापा ह्मणती सर्व देवातें । मामाजी हरिहरातें न ह्मणती॥
एवं दशपुत्रावरी येक कन्या । समर्थउदरीं विश्वमान्या ।
वैराग्यशीळ परम धन्या । गंगा गोदा सृष्टीवरी ॥ ३४ ॥
**वेणाबाई** मुख्य भक्ति संस्थान । सदा सर्वदा समर्थध्यान ।
बाहोक्षत्रीं समर्थासी जालें हनुमंतदर्शन।श्रीरामलिंगीं देवाल्यीं ते वेळीं॥
पूर्वी पंचवटिकेसी श्रीसमर्थआज्ञें अनुष्ठानें केलीं ।
देवद्वारीं वांज निंबोणीसी अक्रा निंबें आलीं ।
श्रीरामें अकरा दिवस येकेक सेवविलीं। अतिरुद्रसंख्या परमार्थ दिधला॥
दासबोधग्रंथराजश्रवणें मुमुक्षु लोक केला ।
श्रीगुरुचरणीं प्रांत सेवेसी लाविला ।
गुरुत्वाचा दंभदाभा न धरिला । वेणी अनन्य श्रीचरणीं ॥ ३७ ॥
**आक्काबाई मुधाबाई । बाकुबाई भिमाबाई ।**
समर्थचरणासी लेंकुरें लाविलीं पाहीं । बाईसंतानें साक्षात्कारें ॥ ३८ ॥

---

१ शुभा=गोंवऱ्या. २ भेंटा=भेंडा, भेली.

समर्थें बाहोक्षत्रीं विचित्र केलें ।
कृष्णवेणीमध्यें वेणाबाईवस्त्र वाळवंटीं देखिलें ।
समर्थें स्वहस्तें विभागूनि कंठीं घातलें । कंठमेखळा करूनियां ॥३९॥
उद्धवमहंतें पूजा जंव आणिली । तंव समर्थ आंगीची पूजा विचित्र देखिली।
वेणीपरंपरादीक्षा समर्थें स्वयें अंगिकारिली ।
आपण कंठमेखळा करूनियां[1] ॥ ४० ॥
आकरा दिवस येक आंगीं मेखळा राहे।उद्धव महंत अक्रा दिवस वाट पाहे।
समर्थपूजा मी कैं आतां लाहें । समर्थदेवें जाणितलें ॥ ४१ ॥
समर्थ ह्मणती उद्धवा वेणीवस्त्र ऐसें आहे ।
माझा मजला देवगृह अंगिकार करणें पाहे ।
उत्कट भक्ति येथें येकनिष्ठ राहे । यथार्थ स्वामी जगद्गुरु ॥ ४२ ॥
ह्मणोनी उद्धवमहंतें साष्टांग केलें नमन ।
मग अकरा दिवस मांडिलें समर्थपूजन ।
नित्य येकेक नूतन गुरुदेवअर्चन । उत्कट वैभवें समर्पिलीं ॥ ४३ ॥
समर्थदेवें वेणाबाईसी वरदानें दिधलीं । सीतास्वयंवरें रामायणें वदविलीं ।
रामकथा ब्रह्मांड भेदूनि नेली । पैलिकडे समर्थें[3] ॥ ४४ ॥
मंगलरामायणें छंदोरामायणें । संकेतरामायणें लवकुशरामायणें ।
सुंदररामायणें अब्दरामायणें । भाषारामायणें वदविलीं ॥ ४५ ॥
एवं वेणाबाईचें मुख्य आख्यान । निवेदन केलें वर्तमान ।
समर्थचरणीं वेणी त्रिवेणी विद्यमान । सज्जनपर्वतामाझारी[4] ॥ ४६ ॥
मैरीचिक्षेत्रीं वेणाबाई संस्थान बाइयाबाई ।
तीन वर्षें तन्मयता समाधि देहीं ।
देहीं देहभान आहे कीं नाहीं । तीर्थपयपान केलें षण्मासें ॥ ४७ ॥

---

१ आपण मेखळा कंठीं घालूनियां । असा पाठ बाडांत. २ या सर्व ग्रन्थांविषयीं प्रस्तावनेंत लिहिलें च आहे. ३ रामकथा ब्रह्मांड भेदून । पैलाड न्यावी ॥ १२-९/२६ अशी श्रीसमर्थांची आज्ञा आहे च. ४ वेणाबाईची समाधि सज्जनगडावर च आहे. २ मिरजेस. बेणाबाईंचा मठ मिरजेस आहे. तेथील अधिकार बाइयाबाईकडे होता असें दिसतें. बाइयाबाईंचे शिष्य प्रतापकार गिरिधर होत.

बाइयाबाईसी कुमारीदेहीं च श्रीरामें प्रसाद दिधला ।
दहीभात नैवेद्य दावितां ताटीं राम जेविला ।
हा कोण वो ताटीं जेवितो ह्मणतां अदृश्य राम जाहाला ।
देवगृहामाझारीं ॥ ४८ ॥
मग लग्न जाहाल्यां श्रीरामभक्ति ।
भौतिक दैवतें देव्हाराचीं राममंत्र जपतां पळती ।
मग आपघर त्यागूनि बापघरीं केली वस्ति ।
श्रीगुरुसेवन केलें साक्षात्कारें ॥ ४९ ॥
हातीं पुस्तक उदास वनीं दृश्यमार्ग चुकतां ।
अदृश्य शून्य दरकुटीं पडतपडतां ।
श्रीरामें हातीं धरूनि बोढिलें तत्वता । सगुण स्वरूप देवें प्रगटिलें ॥५०
पीतांबरधारी दोघे सांवळे सुंदर गौरवर्णी ।
कोदंडपाणी मुकुट माथा कुंडलें कर्णीं ।
सुमनगंधमाळा देव सांठविले अंतःकर्णीं ।
अभिवंदनें गुप्त जाले वरदायक ॥ ५१ ॥
ऐसें बाइयास्वामीचें दर्शनआख्यान[1] । अंतर्बाह्य रामरूपें अखंड दर्शन ।
कितेक जीव उद्धरिले जाण । चौऱ्यासीं वर्षें परमार्थ केला ॥ ५२ ॥
तेथें गिरिधर त्रिवर्गे बंधूसीं शरण आला ।
श्रीगुरुदेवें श्रीचरणसेवेसी लाविला ।
निवृत्तिराम[2] निवृत्तिधाम ग्रंथ वदविला । आत्मानुभवें वाक्यार्थें ॥ ५३ ॥
सर्व हि ग्रंथ समर्थाचे । स्तवनगर्भ श्रीदासबोधाचें ।
सेतुबंधक मर्कट नव्हती साचे । तथापि होती समर्थप्रतापें ॥ ५४ ॥
वेणाबाईपासूनि कितेक महंत जाले । उत्तरभूमीसी बहुधा गेले ।
त्रिवेणीं अंतर्वेदीं राहिले । अयोध्यासमीप करूनियां ॥ ५५ ॥

---

१ आपल्या सद्गुरूंचें चरित्र, चमत्कार, साक्षात्कार, सगुणदर्शन, इत्यादि वर्तमान प्रत्यक्ष गिरिधर कळवीत आहेत त्यावर अविश्वासण्याइतका कोण पतित असणार ? बाइयाबाईची ही हकिकत कोणाची हि निष्ठा वाढवील अशी च आहे. २ या ग्रन्थांविषयीं हि माहिती प्रस्तावनेंत आली आहे.

एवं शिष्यसमुदाय पुत्र कन्या संतानें ।
संतासी निवेदनें केलीं गिरिधरानें ।
पुढें अनंत शिष्यसंप्रदायवर्तमानें । विद्यमान समर्थें ऐकिजे ॥ ५६ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ५७ ॥
समास ॥ ११ ॥ ७ ॥

## ॥ समास बारावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

समर्थस्वामी आदिपुरुष । अवतार सामर्थ्यें विशेष ।
अनंत महंत माहापुरुष । विद्यमान समर्था जाणविले ॥ १ ॥
कित्तेक शिष्य सदाचारी । कित्तेक शिष्य राज्याधिकारी ।
कित्तेक शिष्य राज्यधारी । देशाधिकारी कित्तेक ॥ २ ॥
नाना पर्वतदुर्गीं शिष्य केले । नाना भूमिदुर्गीं शिष्य केले ।
नाना सिंधुदुर्गीं शिष्य केले । सद्गुरुनाथसमर्थें ॥ ३ ॥
गुप्त प्रगट भरतखंडीं । माहांपुरुष असती उदंडी ।
यावन्मायाविस्तार ब्रह्मांडीं । तावत्परंपरा सामर्थ्यें ॥ ४ ॥
यावन्मायाब्रह्म आहे । यावत् ईश्वर कर्तार[१] आहे ।
यावत् कार्याकारणकर्तृत्व आहे । तावत् परंपरा परमार्थें ॥ ५ ॥
यावत् अवतार सगुण चरित्रें । यावत् निर्गुण तत्वयंत्रें ।
तावत् परंपरा मूळमंत्रें । वाक्यें बोधिलीं समर्थदेवें ॥ ६ ॥
आक्रा[२] पिढ्या समर्थें देखिल्या । पूर्णावतारें किती जाल्या ।
चंद्रसूर्यें असतील मोजिल्या । वज्रदेहपरंपरा ॥ ७ ॥

१ या आश्वासनावरून सांप्रदायिकांना किती तरी उत्साह वाटला पाहिजे ! या सांप्रदायांत निराशेला कोठें थारा च नाहीं. २ मागील समास ९ ओवी ४५ पहा.

मुख्य समर्थापासूनि अनुगृहीत जाले । विख्यात महंत किंचित निवेदिले ।
महंतीं महंत कित्तेक वाढविले । असंख्यात संख्या असेना ॥ ८ ॥
नाना कंथा मेखळा द्रुमुंजी घालिती । नाना पर्णभक्षक पर्णे भक्षिती ।
समर्थग्रंथराजदासबोध सन्निध असती । भिक्षा दीक्षा उपासना ॥ ९ ॥
अनंत ब्रह्मांडीं पुरुष जाले । अनंत ब्रह्मांडें व्यापूनि ठेले ।
अनंत ब्रह्मांडीं प्रगटले । जगदोद्धार करावया ॥ १० ॥
सद्गुरुसी शिष्य बहुत होती । श्रीगुरु शिष्यपापें नेणों लिंपती ।
ऐसें ह्मणाल तरी येथें सद्गुरु मारुति । विश्वपापें लिंपेना ॥ ११ ॥
विश्वाचा करावया उद्धार । समर्थ मारुति रुद्रावतार ।
तारक ब्रह्म मंत्रोद्धार । शिष्यपापें लिंपेना ॥ १२ ॥
परमार्थाची वाट समर्थें दाविली । शिष्यपरंपरा वाटे लाविली ।
शिष्यें वाट सोडोनि आडवाट[1] धरिली । तरी श्रीगुरु पापें लिंपेतिना ॥
जड मूढ पापी उद्धरिले । अनाधिकारी अधिकारी केले ।
केवळ पापी हि प्रस्तावले । उदास पंथ देखोनियां ॥ १४ ॥
गुरु दशक पंचक[2] कोणाचे न लगती ।
नैराश संत साधु निस्पृह वर्तती ।
मंत्रविक्रय[3] कांहीं न करिती । भक्ति प्राधान्य उपदेशीं ॥ १५ ॥
तन मन धन तोंडें[4] शिष्यें दिधलें । कोणाचें कोणें दिधलें घेतलें ।
सद्गुरु सर्वेश्वरीं ईश्वर वैभव अर्पिलें । गुरु शिष्य दोघे अलिप्त हो ॥
समर्थें अनंत शिष्य केले । हनुमानरूपें श्रीगुरु प्रगटले ।
श्रीराममंत्रें मंत्रोद्धार जाले । जगदोद्धारक गुरुमूर्ति ॥ १७ ॥
गुरुभक्त महंत रत्नमाळा विमळा । गुरुभक्त प्रेमें घालिती स्मरणरूप गळां ।
गुरुभक्तीच्या फांकती कीर्तिकीळा[5] । विश्व प्रकाशें उजळलें ॥ १८ ॥
माहापुरुष श्रीगुरुभक्त । ऐकोनि अभक्त जाले सद्भक्त ।
संसारबंधनापासूनि मुक्त । सद्गुरुनाथप्रतापें ॥ १९ ॥

---

१ एकूण आडवाटेला जाणारे शिष्य सर्वकालीं असावयाचे च, असें दिसतें. २ दशक पंचक= दहा पांच, ऋण. ३ निष्ठावंत विद्यमान मठपतींनीं याचा विचार केला पाहिजे. ४ केवळ मुखानें. ५ कीळ=प्रभा.

समर्थें कित्तेकांचे अन्याय क्षमिले । समर्थें कित्तेक सेवेसी लाविले ।
समर्थें कित्तेक महंत शाहाणे केले । संप्रदाय चालिले सृष्टीवरी ॥२०॥
संकल्प विकल्प शिष्यासी जाले । समर्थदेवें निःसंदेह केले ।
काहीं शिष्य उन्मत्त देखिले । यथाकिंचित दुर्बुद्धि ॥ २१ ॥
मेघशाम नामा पीतांबरधारी । उत्तम चंदन लावी सर्वांग शरीरीं ।
येक्या बोटें समर्थां गुरुवंदन करी । सर्वांग स्फोटकें निमाला ॥ २२ ॥
संकल्प नामा समर्थशोधक । श्रीमंचकीं निद्रिस्थ देखे गुरुनायक ।
चेहूं मांचवीं च्यारी धनुर्द्धारी मूर्ति संम्यक ।
देखतां मूर्छना पावला ॥ २३ ॥
विकल्प नामा ह्मणे स्वामी कैंचे अवतारी ।
सगट संत असती देहधारी ।
हनुमानरूप देखतां चंद्रगिरि । मूर्छना येऊनि उलंडला ॥ २४ ॥
संदेह नामा ह्मणे स्वामी जरी हनुमान । तरी कपाटें जातील भेदून ।
समर्थ वायोस्वरूप पावले अंतर्धान । संदेह सर्व मावळला ॥ २५ ॥
कितेकासी कळले सच्चिदानंद । कित्तेक भ्रांत जाले प्राणी मतिमंद ।
कित्तेकांसी वोळले परमानंद । तारक ब्रह्म चराचरीं ॥ २६ ॥
समर्थ कोण्हियेक छळकें शोधूनि पाहिले । वीस कपटनारेळ पुढें ठेविले ।
गुरुदेवें छळक आतिथ्यें पूजिले । मग नारेळें देखिलीं कुंर्कुटें ॥ २७ ॥
समर्थें बागांत गलोलखेळ खेळतां । आंबा शुक मुक्त केला तत्वता ।
गुरुदेवें सजीव केला शुक मागुता । आजन्म जन्म वेऊनि पाईं असे ॥
समर्थासी कोण्हियेक मूर्खें गुप्त विनोद केले ।
समर्थें अति दुर्धर पोटीं गुणदोष घातले ।
सोयरे ह्मणोनि दुष्ट सन्मानिले । अपराध प्रगट न केलों ॥ २९ ॥

---

१ पलंगाच्या चारी बाजूंना. २ चरेगांव जवळच्या चंद्रगिरीच्या डोंगरावर. ३ कोंबडीं. ४ दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे । सज्जनापरीस आळवावे । महत्त्व देउनी ॥

वैदिक लोक कोण्हियेक युगधर्मवासी । चर्चा करिती गुरुदेवसेवनासी ।
अहंकार पोटशूळ उठिले तयांसी । गुरुदेवतीर्थें स्वानंद जाले ॥३०॥
स्वधर्मे सद्गुरु अवमानिती । अधर्म युगधर्म गुरु करिती ।
भ्रांत लोक जन्मयोनी फिरती । गुरुगीतार्थ नेणतां ॥ ३१ ॥
निःकाम स्वधर्मी मोक्षधर्मीं लाविले । सकाम अधर्मी, युगधर्मीं ठेविले ।
आवासारिखे सर्वेश्वर फळद्रूप जाले । सद्गुरुस्वामी समर्थ ॥ ३२ ॥
शूद्रवर्णे ब्राह्मणवर्ण बोधिले । ब्राह्मण शूद्रांसी शरण गेले ।
गुरुशिष्य रविनंदनें पुरीसी नेले । ईश्वरआज्ञेप्रमाणें ॥ ३३ ॥
सर्वेश्वरआज्ञेचा बडिवार । ब्राह्मणें ब्राह्मणासी करणें नमस्कार ।
राम राम करणें हा अन्य विचार । संप्रदाईं नाहीं बोलिला ॥ ३४ ॥
समर्थें वंदनभक्ति निरोपिली । अति लीनता सायोज्यवाट दाविली ।
कोठें बंडें जनीं दिसोनि आलीं । अभ्युथ्थान अभिवंदन राहिलें ॥३५
समर्थें स्वस्थानीं महंतांसी पट्ट नाहीं दिधले ।
उदंड ग्रंथपट्ट लोकीं विस्तारिले ।
सृष्टीमध्यें बंडि[5] कांहीं दिसोनि आले । कोणासी कोण्ही न मानिती ॥
समर्थांचें कारण येथें कांहीं आहे । वेगळाले मोहरे इरेसी घातले पाहे ।
अभिमानें अहंकारें परमार्थ वाढलाहे । सद्गुरु समर्थ जाणती ॥ ३७ ॥
समर्थें महंत विस्तारिले । कंथाधारी बहुत केले ।
कोठें मेखळामहिमान चालविती भले ।
कोठें गर्वी उदासी दिसताती ॥ ३८ ॥
उदास गर्वी लौकिकी दिसे । परि अंतर कांहीं अनारिसें ।
लोकांसी उत्तमोत्तम दिसेल तैसें । जनीजनार्दनीं वर्तावें ॥ ३९ ॥

---

१ गुरूला च देव मानून त्याची सेवा करणें वाईट अशी चर्चा कलियुगधर्माप्रमाणें वैदिकांनीं चालविली. २ सकळ धर्मामध्यें धर्म । स्वरूपीं राहाणें हा स्वधर्म ॥ असला धर्म शिकविणाऱ्या सद्गुरूंची उपेक्षा करून कलियुगधर्मानुसार सकाम अधर्म शिकविणारा गुरु करून मूढ लोक चौऱ्यायशी लक्ष योनी फिरतात. ३ यमानें. ४ पाट, गादी; पद, पदवी. ५ “ बंडि लोक ” असा पाठ बाडांत.

देखिलें वर्तमान वार्तिकें[1] लेहावें । समर्थदेवें सर्वांतर जाणावें ।
जनीजनार्दनीं महंतें मिळोनि जावें । सत्कीर्तीनें भरावें भूमंडळ ॥४०॥
नाना सफळित धरा समर्थकौलें[2] । नाना परमार्थतरु वाढले कृपाजळें ।
कित्तेकां भूमीसी कर्मपाणी लागलें । कित्तेक मातले तांबेरे[3] ॥ ४१ ॥
कित्तेक मुलुकीं पिकें आलीं । कित्तेक मुलुकीं पिकें गेलीं ।
कित्तेक नापिकें सेतें जालीं । हिंसाळे[4] पडले कित्तेक ॥ ४२ ॥
कित्तेक पिकाचीं कणसें ताठती । कितेक भारें आकड्या लवती ।
कित्तेक थोटें ताटें उभी ठाकती । पिकें नापिकें मुलुकामध्यें ॥४३॥
कितेक मुलुकीं डंवगे डॅवगे[5] पिकले । कितेक माल बहुमोलें विकले ।
समर्थाचे परमार्थटके[6] फिटले । मुलुक लागले परलोकीं ॥ ४४ ॥
ज्ञानयुक्षाचीं थळें लागलीं । अभिमान पोरीनें[7] कांहीं वाळलीं ।
कितेक मुलुकीं आत्मशर्करा[8] पिकली । संतबंदरीं विकली बहुमोलें ॥
कित्तेक भूमीसी मातीची सोनि होती । सुवर्णदारवंडें नीचें कपाळा लागती ।
उंच माहाद्वारांतूनि अंबारीसहित हास्ति येती । भक्तिढाला लाऊनियां ॥
अनंत समर्थाच्या भक्तिढाला । फडकत चालिल्या अचाट आढीला[11] ।
यहलोक परलोक वाक्यार्थ लिहिला । संत सज्जन परिसती ॥ ४७ ॥
एवं शिष्यसृष्टीचीं वर्तमानें । समुदाय संप्रदाय वर्द्धमानें ।
समर्थाचरणीं केलीं निवेदनें । विद्यमान स्वामी ऐकती ॥ ४८ ॥
पुढें श्रीरामसमर्थभोजनीं वर्तमान । संतसज्जनीं गिरिधर करील निवेदन ।
समर्थस्वामीचें महिमान । वाक्यें लिहिलीं परमार्थीं ॥ ४९ ॥
इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ५० ॥
समास बारावा ॥ १२ ॥ जय जय राम ॥ ७ ॥

---

१ वार्त्तिकानें, वर्तमान लिहिणारानें. २ कौल=रयतेला दिलेलें अभयवचन. ३ तांबोरा=शेतावर पडणारा रोग. ४ ( ? ) ५ डवगा=भरपूर पीक. ६ टका=कर. ७ पोरा=शेतांत उगवणारे गवत, कुंदा. ८ आत्मज्ञानरूपी शर्करा. ९ या ओवीचा अर्थ बरोबर लागत नाहीं. परमार्थ एक च परंतु कांहींकांचा जगविख्यात होतो व इतरांचा आपल्यापुरता च असतो, असा कांहीं भावार्थ दिसतो, ११ भक्तीमार्गाच्या गजढाला । चालविल्या आढाला ॥.

## ॥ समास तेरावा ॥



॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां शिष्यसमुदायसंप्रदायवर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां समर्थभोजनीं अनुसंधानें । संतसज्जनीं परिसावीं ॥ १ ॥
कोण्ही येक समईं ब्रह्मारण्यीं । श्रीरामजानकी वधुवरें दोन्हीं ।
समर्थासी नैवेद्य करावया लागुनि । त्रिभुवनगृहस्थें बैसेलीं ॥ २ ॥
सद्गुरुसमर्थें दोघें प्रकृतिपुरुषें देखिलीं ।
रघुवीर रघुवीर ह्मणोनि बोलाविलीं ।
भिक्षा आहे रे ह्मणोनि आक्षेपिलीं ।
ह्मणती भिक्षा अस्ति अस्ति रे समर्था ॥ ३ ॥
सध्या वाढा वेगीं परमान्नें । उसीर न लावा घाला भोजनें ।
तुह्मांसी घडावीं ब्रह्मसंतर्पणें । ह्मणोनी अनिर्वचनें विसर्जिलीं ॥ ४ ॥

---

१ एकंदर श्रीसमर्थप्रतापांत एकाद्याला हा समास अत्यंत प्रिय वाटला, तर त्यांत कांहीं दोष नाहीं; कारण, तो समास तसा गोड च आहे. श्रीसद्गुरुसमर्थ भोजनाला बसले असतां जानकीनें श्रीरामाला श्रीसमर्थाविषयीं जे कित्येक प्रश्न विचारिले व त्यांचीं श्रीरामानें जीं उत्तरें दिलीं तीं एकांतांत वाचीत असतां ज्याचें अंतःकरण प्रेमभरानें उचंबळून येणार नाहीं असा वाचक विरळा! विरळा तरी कां, असा वाचक या ग्रन्थाला कोठें आढळणार च नाहीं! २ या समासांत असा प्रसंग वर्णिला आहे कीं, श्रीरामजानकी यांच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांडांतील गृहस्थाश्रम एकवटला असून त्यांचेकडे श्रीसमर्थ भिक्षेला गेले. तेव्हां श्रीरामजानकींनीं त्यांचा सत्कार करून त्यांस भोजनास बसवून श्रीराम स्वतः अभिश्रवणास बसले. ब्राह्मणांला भोजनास बसवून यजमानानें जें वैदिक सूक्त ह्मणावयाचें त्याला अभिश्रवण ह्मणतात. प्रस्तुत प्रसंगीं एकादें वैदिक सूक्त न ह्मणतां श्रीराम आणि जानकी यांचा जो संवाद झाला तो च या ठिकाणीं अभिश्रवणस्थानीं मानला आहे. ३ श्रीरामजानकी. ४ समर्थ श्रीरामाला ह्मणतात तुह्मांला ब्राह्मणभोजनाचें पुण्य लागावें ह्मणून आह्मी मौनव्रत सोडून तुमच्या घरीं भिक्षेला आलों.

तीर्थ कोणासी मी देत नाहीं । तपश्चर्येमध्यें राहीं ।
समर्था तुझ्या दर्शनें सर्व तीर्थें सेविलीं पाहीं ।
सुमनगंधमाळा धूप दीप जाले ॥ ५ ॥
सध्या वाढिलीं शुद्ध दिव्यान्नें । निर्मळ पाक पक्कान्नें ।
विशुद्ध शर्करा क्षीर परमान्नें । भात भक्ष वरान्नें कथिकेसहित ॥ ६ ॥
सर्व शाक सर्व पाक । पंचामृत वाढिलें ठेविलें शुद्धोदक ।
येको विष्णु रूपें संकल्प सोडूनि सम्यक । जानकीनायक अभिश्रवणि ॥
आपोशन केलें समर्थें । जानकी देवी ह्मणे कांतातें ।
समर्थ कोण कोठील काय कैसे हो तुह्मातें । कळले आहेती काय जी ॥
सुखें पुसेसिना कां तूं वचनीं । दिसताती देवा अनिर्वचनी ।
भोजन संपतां चि बहुधा निरंजन वनीं । जातील नेणों समर्थ ॥ ९ ॥
समर्थासी कैसी पुसों मी तुह्माविणें । तुह्मा आधिन माझें सर्व जिणें ।
माहापुरुष कोण कैसे कोण जाणें । भोजनसमईं हे बोलऊं नयेती॥१०
दिसताती मायात्यागी वैरागी । कोण जाणें कैसे वर्तती जगीं ।
तुमच्या आश्रयें मी करूनि सलगी । समर्थातें पुसतसें ॥ ११ ॥
बापा समर्था तूं कोण आहेसी ।कांते अबोलण्यासी कां तूं बोलाविसी ।
उत्तरप्रत्योत्तरेंविण यां माहांपुरुषांसी । चाड नाहीं निर्धारें ॥ १२ ॥
ऐसीं बोलती जव रामजानकी वधुवरें। तव खुणा दाविलें श्रीगुरुसर्वेश्वरें ।
सांगा आपुल्या कांतेसी सत्योत्तरें । उत्तरप्रत्योत्तरें आह्मी श्रवण करूं ॥
जानकी ह्मणे माहापुरुषाची कोण वो स्थिति ।
कांते यांची दिसते आत्मस्थिति ।
देवा जी सांगा यांची कोणसी परोगती ।
प्रिये आत्मगती यांची दिसताहे ॥ १४ ॥

---

१ ब्रह्मचाऱ्याला भिक्षा घालून त्याच्या चरणाचें तीर्थ घेण्याची पद्धति निदान उपनयनाचे वेळीं तरी आपण पाहतों. त्याप्रमाणें श्रीरामानें तीर्थ मागितलें असतां समर्थ ह्मणतात, आपण कोणास तीर्थ देत नाहीं. २ कथिका=कढी. ३ एको विष्णुर्महद्भूतम् इत्यादि संकल्प. ४ निरंजन ह्मणजे जन चि नाहीं।. ५ आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं अखंड वस्ती. ६ श्रेष्ठ गति. ७ आत्मज्ञान.

कोण हो यांची दिसते वृत्ति । यांची केवळ उदास वृत्ति ।
कैसी हो यांची व्यक्त मूर्ति । अमूर्त मूर्ति समर्थाची ॥ १५ ॥
कोण हो यांची देह अवस्था । कांते कैवल्[1]यदेह उन्मनी अवस्था ।
कोठें हो यांची दिसते आस्था । शुद्ध परमार्थी आस्था दिसताहे ॥१६॥
स्वामि कोण हो यांचें गांव । कांते यांसी नाहीं गांव शिव ।
कोण वो यांचें नांव । नाम रूप नाडळे सर्वथा ॥ १७ ॥
दिसताती देवा देहधारी । कांते केवळ लीळावतारी ।
बाह्य दिसती वो कर्मशरीरी । अंतर कांहीं अ[2]नारिसें ॥ १८ ॥
कोण वो यांचें धाम । यांचें केवळ परंधाम ।
कोठें वो यांचा विश्राम । आत्मारामनिरंजनीं ॥ १९ ॥
कोठें हो समर्थ असती । सर्वी सर्वत्र घटीं दिसती ।
कोणे स्थळीं हो यांची वस्ति । निर्मळ निश्चळीं सर्वदां ॥ २० ॥
काय हो सर्वदां भक्षिती । कांते सदैव परमान्न भक्षिती ।
कोण हो स्वरूप मनीं लक्षिती । अलक्ष लक्षिती परब्रह्म ॥ २१ ॥
माहापुरुषाचा कोण हो पंथ । यांचा आकाशमार्गीं गु[3]प्त पंथ ।
कोण हो यांचा प्रांत । कांते अंतप्रांतासी अलिप्त हे ॥ २२ ॥
माहांपुरुषाचें कोण हो वन । यांचें केवळ आनंदवन ।
समर्थाचें कोण हो भुवन । सच्चिदानंद भुवन त्रिभुवन हें ॥ २३ ॥
समर्था यांचें कोण हो स्थान । यांचें सर्वी सर्वत्र संस्थान ।
कोणेकडे हो यांचें प्रस्थान । गग[4]नगर्भनिरंजनीं ॥ २४ ॥
कोण हो यांचा आनंद । कांते यांचा परमानंद ।
यांचा कोण कैसा हो ब्रह्मानंद । सच्चिदानंद त्रिपुटीमंद ब्रह्मानंदीं ॥२५॥
सर्वेश्वरा माहांपुरुषासी आहे किं निद्रा । यांसी केवळ निश्चळ योगनिद्रा ।
यांची कोण जी सांगा मुद्रा । अगोच[5]री मुद्रा यांची जानकि ॥ २६ ॥

---

१ जीवन्मुक्तता. २ निराळें च. ३ आकाशमार्गीं गुप्त पंथ । जाणती योगिये समर्थ । इतरांस हा गुह्यार्थ । सहसा न कळे ॥ १४; परमार्थमार्ग, ज्ञानमार्ग. ४ गगन आहे गर्भांत ज्याच्या अशा परब्रह्माकडे. ५ अभ्यासमुद्रा एकंदर चार आहेत, त्यांपैकीं अगोचरी एक मुद्रा आहे. ह्या मुद्रेंत दृष्टि आकाशाकडे असते.

माहापुरुषाचें कोण जी आसन । जानकि यांचें सिद्धासन[1] ।
समर्थांचें कोण जी उपासन । श्रीहरिसंकल्प[2] उपासना ॥ २७ ॥
समर्थांचें कोण हें ध्यान । यांसी केवळ श्रीगुरुध्यान ।
समर्थांचें कोण हो ज्ञान । शुद्ध विज्ञान परब्रह्म ॥ २८ ॥
समर्थांचा कोण मंत्र कोण यंत्र । तारक ब्रह्म मंत्र आत्मज्योति यंत्र ।
समर्थांचें कोण विधान तंत्र । नवविधा भजन विधान हें[3] ॥ २९ ॥
समर्थें आवाहन विसर्जन कैसें केलें । दृश्य आवाहन करूनि विसर्जिलें[4]
समर्थें आवर्ण काय जी मांडिलें । पिंड ब्रह्मांड आवर्णे[5] ॥ ३० ॥
समर्थें कोण स्थापिली भक्ति मुक्ति । ऐक्यभक्ति सायोज्यमुक्ति ।
समर्थ समाधि कोण वो स्थापिती । सहज समाधि समाधानी ॥ ३१ ॥
समर्थें मानिली कोण हो माया । येथें बोलेल ते चि माया[6] ।
काय जी बोलतां श्रीरामराया । यथार्थ बोलतों आह्मी मायाब्रह्में ॥३२॥
समर्थ बोलती कीं न बोलती । सर्वेश्वररूपें अनुवादती ।
आपुलें समाधान कांहीं देवा सांगती । अधिकारें कथिती शिष्यवर्गी ॥
समर्थांचा कोण हो मठ । अवघा ब्रह्मांड यांचा मठ ।
तर्‍हि तर्‍हि यांचा सांगा मूळ मठ । विश्रांतिमठ परब्रह्मीं ॥ ३४ ॥

---

१ डाव्या पायाची टांच गुद व वृषण यांच्या मधल्या शिवणीवर बळकट बसवून उजव्या पायाची टांच जननेंद्रियाच्या वरच्या भागावर घट्ट बसवावी व हनुवटी हृदयास बळकट लावून मेरुदंड स्थिर व सरळ उभारून जितेंद्रिय होऊन पापणी न हालवितां भ्रूमध्यावर दृष्टि लावावी, यास सिद्धासन ह्मणतात. २ मूळ संकल्प तो हरिसंकल्प । मूळमायेमधील साक्षेप । जगदांतरीं तें चि रूप । देखिजेतें ॥ २०$\frac{४}{१९}$. ३ ही ओवी दोन्ही प्रतींत मागाहून समासांत लिहिलेली आहे. ४ मायेपासून मांडणी करणें हें आवाहन व पुन्हां संहार करणें हें विसर्जन व ही च आपली उपासना असें श्रीसमर्थांनीं दासबोध २०×८ त सांगितलें आहे. ५ मुख्य देवाच्या भोंवतीं उपदेव असतात त्यांना आवरण ह्मणतात. असे उपदेव श्रीसमर्थ कोणते मानीत, असा प्रश्न; त्याचें उत्तर, पिंड ब्रह्मांड. ६ समर्थ माया कोणती मानतात या जानकीच्या प्रश्नाचें श्रीराम उत्तर देतात कीं, हा प्रश्न विचारणारी ती च माया समर्थ मानतात. जानकी माया व श्रीराम ब्रह्म होय.

जगदीश्वरा यांचा कोण जी आश्रम। समर्थें केला चि नाहीं गृहस्थाश्रम।
तऱ्हि तऱ्हि यांचा कोण वो आश्रम । ब्रह्मचर्याश्रम धगधगीतु ॥३५॥
देवा कैसें हो यांचें स्वरूपदर्शन । कांते सर्वी सर्वत्र संदर्शन ।
यांचें कोठें हो ध्यावें नित्य नेमें दर्शन । सज्जनगिरीमाझारी ॥ ३६ ॥
समर्थासी पुसतें मी कांहीं । समर्थें आश्रम कां अंगिकारिला नाहीं ।
समर्थ हनुमान अवतार सत्य पांहीं । ब्रह्मचर्याश्रम समर्थाचा ॥ ३७ ॥
देवा तुह्मी गृहस्थाश्रम अंगिकारिले । कांते तरि हे समर्थासी नैवेद्य जाहाले।
स्वामि ऐसें चि अखंड नैवेद्य पाहिजेती घडले ।
कांते सर्वी सर्वत्र घडतील ब्रह्मांडोदरीं ॥ ३८ ॥
ऐसें जानकीदेवीनें जें जें पुसिलें । तें तें श्रीरामें सांगितलें ।
तव समर्थाचें भोजन जालें । अभिश्रवण केलें जगदीश्वरें ॥ ३९ ॥
समर्थें केलें शुद्धोदक प्राशन । समर्थें केलें उत्तर शुद्ध आचमन ।
निर्मळ निर्मळाचें करोद्वर्तन । मुखीं मुखशुद्धि गुळोंळा मुखशुद्धि ॥४०
मग समर्थाचीं शतपदी गमनें । अनिर्वचनीय आशिर्वचनें ।
समर्थ दिसताती बहुधा ध्यानस्थ मनें । आनंदवनप्रस्थानी ॥ ४१ ॥
त्रयोदशवर्णी त्रयोदशगुणी । जानकीकांतें तांबुल दिधला तत्क्षणीं ।
उदकपात्रें जेथील तेथें विसर्जन करूनि ।
समर्थ तारकपाणी वेगीं निघाले ॥ ४२ ॥
मग उच्छिष्ट पात्रें जों काढिलीं। तों येकसरें लक्षानुलक्ष पात्रें निघालीं
तीं कोठें ह्मणाल काय हें जाहालीं । संतसुखपात्रें सृष्टीवरी ॥ ४३ ॥

---

१ तेव्हां श्रीसज्जनगडावर नेहमीं राहणारे लोक किती भाग्यवंत होत ! २ जानकीमाता विचारतात, देवा श्रीसमर्थांना जर आपण धगधगीत ब्रह्मचर्याश्रमांत च ठेवता तर मग तुह्मी तरी कां एवढा गृहस्थाश्रम स्विकारला ? त्यावर श्रीराम ह्मणतात आपण गृहस्थाश्रम पतकरिला ह्मणून तर आज आपणांस समर्थांचा आदरसत्कार करितां आला. ३ उत्तरापोशन. ४ मूळचे निर्मळ च पण श्रीसमर्थांनीं हात धुतले. ५ गुळाळा=गुळणी. प्रथम मुखशुद्धि ह्मणून कांहीं खाऊन मग पुन्हां मुखशुद्धीसाठीं चुळा टाकिल्या. ६ त्रयोदशाक्षरीमंत्ररूपी त्रयोदशगुणी विडा श्रीरामानें श्रीसमर्थांना दिला. ७ आणि मग तो तारकमंत्ररूपी विडा हातांत घेऊन श्रीसमर्थ जगदुद्धारार्थ संचार करिते झाले.

ऐसें समर्थसद्गुरूचें ब्रह्मभोजन । शेष पात्रें सत्पात्रें संतसज्जन ।
त्यांचें घडलिया अनन्य भजन । सध्या अमृतभोजन सुमनशैय्या ॥४४॥
एवं जानकीकांतें भक्ति वेणीसी सांगितलें ।
वेणाबाईहिं बाइया संस्थानीं निरोपिलें ।
बाइयास्वामीहिं सेवकासी कथिलें । सेवकें लिहिलें यथार्थ हो ॥ ४५ ॥
विशेष समर्थें स्वमुखें वेणाबाईसी कथिलें ।
जानकीकांतें ब्रह्मारण्यीं परमान्न वाढिलें ।
आपण उभयतां हि अभिश्रवेण केलें ।
येणें श्रवणमननें उद्धारूं जनीं ॥ ४६ ॥
मनीची जीवीची गोष्टी यथार्थ । भक्ति वेणीसी सांगती समर्थ ।
कां जे श्रीरामउपासकांपासीं गुह्यार्थ । आत्माराम निरोपिती ॥ ४७ ॥
वेणाबाईसी साक्षात्कार जाला । समर्थापासीं सध्या सांगितला ।
स्वामि त्रिभुवनगृहस्थ येक स्वप्नीं देखिला । जनयात्रा वाटे लावितसे ॥
समर्थाचीं शरणागतें पृष्टीवरी घेतलीं ।
साफल्या निजवल्या नदीपार तेणें केलीं ।
पुढें निर्मळ निश्चळ स्वरूप स्थिति देखिली ।
तया तेजासी उपमा नाहीं ॥ ४९ ॥

---

१ गिरिधर ह्मणतात हा सर्व प्रसंग काल्पनिक नसून यथार्थ आहे. प्रत्यक्ष श्रीरामानें तो वेणाबाईस सांगितला, त्यांनीं बाइयाबाईस सांगितला व त्यांनीं आपणांस सांगितला व तो जसा सांगितला तसा च तो लिहिला आहे. २ त्यांत हि विशेष गोष्ट अशी कीं, श्रीसमर्थांनीं स्वतः वेणाबाईला इतकें सांगितलें होतें कीं, श्रीरामानें आपणांस ब्रह्मारण्यांत परमान्नभोजनास बसवून स्वतः श्रीरामजानकी अभिश्रवणास बसले होते. ३ गिरिधर ह्मणतात, असा हा पवित्र व उत्साहकारक कथाप्रसंग ऐकून व त्याचें मनन करून आपण आपला उद्धार करून घेऊं या. ४ श्रीराम. ५ यात्रेकरूंना मार्गावर आणून सोडीत असे. ६ या साक्षात्काराचा अर्थ असा कीं, जे जे श्रीसमर्थांच्या चरणीं लीन होतात त्यांना प्रत्यक्ष श्रीराम आपल्या पाठीवर घेऊन मायारूप जी नदी तिच्या पलिकडे नेऊन पोंचवितात ! ७ साफल्या निजवल्या कौसल्या माता । इत्यादि श्रीसमर्थकृत श्रीरामचंद्राची आरती आहे त्यांतील हें दोन शब्द " माया " या अर्थी येथें घेतले आहेत.

समर्थ ह्मणती माझी हे चि श्रीरामउपासना ।
शरणांगतासी पाववी निरंजैना ।
पुढें वेणीगिरिधर सांगेल ब्रह्मभोजना । संत सज्जन परिसती ॥ ५० ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ५१ ॥
समास तेरावा ॥ १३ ॥ ॥ ६७ ॥

## ॥ समास चवदावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागा समर्थांचें ब्रह्मारण्यीं ब्रह्मभोजन । सेवकें केलें निवेदन ।
आतां समर्थें पंगतीसी घेऊन विश्वजन । केलें भोजन ऐका हो ॥१॥
कोण्हीयेक कृष्णातीरीं करंजग्रामीं । भिक्षाहारी पातले वैराग्यशीळ स्वामी ।
धन्य धन्य ते पुण्य भूमि । सर्वांसी आमंत्रणें दिधलीं समर्थें ॥ २ ॥
आमुच्या घरासी तुह्मी भोजनासी यावें ।
ऐसें सर्वां सर्वत्र बोलिलें गुरुदेवें ।
कोणे स्थळीं आह्मी भोजनासी यावें । कोण्ही न पुसिले समर्था ॥३॥
सर्वात्मा राम सर्वांतरीं । कौतुक दावितो चराचरीं ।
तीन प्रहर संपूर्ण लोटती तंवरि । राहिले गिरिकंदरीं समर्थ ॥ ४ ॥
ह्मणती लोक असतील भुकेले । ह्मणोनि समर्थ धांवोनि आले ।
चला चला रे स्नानें करा वेहिले । भोजनासी उशीर जाले तुह्मा ॥५॥
संत सज्जन तेथें रमावल्लभदास । आणखी कित्तेक समर्थदास ।
स्नानें करविलीं बहुतांस । शत येक ब्राह्मण मिळाले ॥ ६ ॥

---

१ परब्रह्म. २ सत्वर, लवकर. ३ "समस्तांस" असा पाठ बाडांत.

ब्रह्मविणें रुद्रविणें ताळा तंबुरे घेतले ।
समर्थ सोवळे चि नगरांत भिक्षेसी चालिले ।
सुंदर सडे बिदींस[1] लोकीं घालविले । दिव्य रंगमाळा रेखाटिल्या ॥ ७ ॥
घरोघरीं स्वयंपाका निघाल्या शुद्धमति सोवळ्या ।
सामग्री आईती[2] घालिती धुतवस्त्रा वोवळ्या ।
नगरांत संपूर्ण चुली पेटविल्या । कथाभिक्षा मिरवे समर्थाची ॥ ८ ॥
कोणे घरीचीं वर्णें उतरलीं । कोणे घरीचीं पुणें वांटिलीं ।
सर्वी सर्वत्र येकेक अन्नें निर्माण केलीं । माधुकरी मिरवत स्वामीची ॥
जयजयकारें कथाकीर्तनें करिती । मागें अन्नब्रह्मपात्रें संपूर्ण चालती ।
सर्व शाक सर्व पाक दोनी मुहूर्तीं । नदीतीरीं आणिला समर्थें ॥ १० ॥
द्रोण पानें पत्रावळी । ब्राह्मणाच्या बैसविल्या वोळी ।
माहुलीसंगमीची विप्रमंडळी आली । सप्त ऋषी ब्राह्मण पातले ॥ ११ ॥
वाढणें इकडे चाली लागलीं । तिकडे तीर्थें घेऊनि पूजनें जालीं ।
सर्वी सर्वात्मा विश्वरूप डोळीं । धूपदीपावळि उजळिल्या ॥ १२ ॥
संतमहंतीं आश्चिर्य केलें । भिक्षाकौतुक ऐसें कोठें नव्हतें वर्तलें ।
तें तें येथें समर्थें दाविलें । आकराशें पात्र बैसलें पंगती ॥ १३ ॥
भक्तजनीं येको विष्णु घेऊनि स्वानंदें । संकल्प सोडिले ब्रह्मानंदें ।
संत सज्जन परमानंदें । ब्रह्मभोजनीं तत्पर हो ॥ १४ ॥
लाहान थोर दुबळीं पाबळीं । गांवजेवण सकळ सकळीं ।
अन्नें पुरवलीं आळमाळीं[3] । केली चहपाळी[4] पंचामृतें ॥ १५ ॥
कामधेनु भिक्षाभोजन । तृप्त जाले संत सज्जन ।
जिकडे तिकडे तृप्त संपूर्ण । समर्थसद्गुरुपंगति ॥ १६ ॥
भोजनें जालीं अपरान्ह वेळीं । तांबुल दक्षिणा स्वरकल्लोळीं ।
शुद्ध पात्रें धोऊनि घरासी पाठविलीं । संध्यावंदनें केलीं समर्थें ॥ १७ ॥

---

१ बिदी=रस्ता. २ सामग्री, तयारी. ३ आळ=गल्ली. माळ=उंचवट्याची जागा. आळमाळीं–गल्लोगल्लीं, चहुंकडे. ४ चहपाळी कां चह्याळी असा शब्द आहे तो दोन्ही प्रतींतून हि बरोबर लागला नाहीं. लयलूट असा अर्थ दिसतो.

आजी कथाप्रसंग ह्मणोनि समर्थ बोलिले ।
पाहत पाहतां अदृश्य जाले ।
लोकीं नगरांत मंडप दिधले । मध्यरात्रीं प्रगटले कथेमध्यें ॥ १८ ॥
मग अद्भुत कीर्तनें तेथें जालीं । निरुपम उपमा सुखसीमा फावली ।
वैराटनगरीची अपार सुमनें आलीं । समर्थपूजेकारणें ॥ १९ ॥
येक मास घरोघरीं समाराधना । कथानुकीर्तनें दीपाराधना ।
दिवसां समर्थ सेविती निरंजन वना । मध्य रात्रीं प्रगटती कथेमध्यें ॥
जगदोद्धारक पुण्यमूर्ति । हनुमान अवतार उत्कट कीर्ति ।
काय वदवेल वाचास्फूर्ति । समर्थभिक्षाकौतुक निवेदिलें ॥ २१ ॥
वेणीगिरिधरें वेणाबाईमुखें ऐकिलें । समर्थभोजन निरोपण केलें ।
संतसज्जनें अवधान दिधलें । पाहिजे पुढें कृष्णातीरीं ॥ २२ ॥
कोण्हीयेक समई चांफळीं उछह जाले । समर्थ निरंजन वनीं निघाले ।
लोकांचे हेत समर्थापासीं राहिले । समर्थासी नैवेद्य केलें नाहीं ॥ २३ ॥
वेणाबाईसी दशमीचें आत्मपारणें दिधलें । लोकांचें आर्त पाहिजे पुरविलें ।
समर्थें कौतुक विचित्र केलें । चंन्हेगांवीचे[1] अंबराईमाजी ॥ २४ ॥
समस्तांचीं आमंत्रणें घेतलीं । बागेमध्यें बाडें उंच लाविलीं ।
येकांतस्थळें गुरुदेवें निर्मिलीं । पात्रें सर्व हि आणविलीं वाढोनियां ॥ २५ ॥
समस्तांनीं संकल्प सोडिले । हरिसंकल्प अवघे केले ।
येकांत राम समर्थ जेविले । हनुमानरूपें सर्वत्र हो ॥ २६ ॥
कोण्हीयेकांहिं बाडाआडोनि समर्थ पाहिले ।
तव पात्रोंपात्र हनुमान देखिले ।
तात्काळ त्याचें नेत्र मंद जाले । मग तीर्थें धुवविलें समर्थें ॥ २७ ॥
दिव्य तेज नेत्रासी आलें । सर्वीं सर्वत्र यात्रेसी कळलें ।
समर्थें भोजनकौतुक विचित्र केलें । काय ह्मणोनि वर्णावें ॥ २८ ॥
ऐका कोण्ही येक कृष्णातीरीं वरुणग्रामीं । समर्थ पातले सद्गुरुस्वामी ।
आतां आमंत्रणें सांगों आह्मी तुह्मी । प्रीतिभांडणें[2] सकळांचीं ॥ २९ ॥

---

१ चरेगांव चाफळजवळ च दीड दोन कोस आहे. उंब्रजेहून चाफळास जातांना चरेगांवापाशीं च वाट फुटते. २ कुंपण.

समस्तांची येक अवस्था । समस्तांची येक आस्था ।
आतां कैसी करावी व्यवस्था । समर्थस्वामी विचारिती ॥ ३० ॥
आज्ञा घरीचीं आमंत्रणें घेतलीं ।
येकाचीं येकासी कळों नाहीं दिधलीं ।
घरोघरीं पुर्णे वर्णे घातलीं । बोलावणीं आलीं मागें पुढें ॥ ३१ ॥
समर्थे येका दुबळ्या भक्तांसी लाभ दिधले ।
तक्र आंबिल जेऊनि स्वानंदें बैसले ।
इकडे घरोघरीं आज्ञा ठाईं गेले । श्रीहनुमानस्वामी समर्थ ॥ ३२ ॥
ज्या त्यांसी वाटे समर्थ आपुलें घरीं । येकांतभोजनें सारिती बरीं ।
तांबुल घेताती मंचकावरी । सुमनशैय्या पादसंव्हनें ॥ ३३ ॥
मुख्य प्राणनाथ निधान । समर्थस्वामीचें रूप महिमान ।
भाविकांसी भावासारिखा[1] देव फळद्रूप आपण ।
संकल्प विकल्प जाण न धरावा ॥ ३४ ॥
ऐका कोण्हीयेक उद्धवनामा बाळक । समर्थस्वामीचा लडिवाळ सेवक ।
समर्थासी आमंत्रणें संम्यक । सांगतां जाला जननीमुखें ॥ ३५ ॥
जननी ह्मणे सेवक येक वासुदेवबावा ।
समर्थपंगतीसी महंत असावा ।
उद्धवबाळक ह्मणे माझा उद्धवबावा ।
तो हि सांगे बा अवश्य ॥ ३६ ॥
हनुमानपुढें समुदाव लांबला । समर्थासी भोजनीं उशीर जाला ।
समर्थ ह्मणताती रे उद्धवा समस्तांला । देयीं अनुक्रमें आमंत्रणें ॥३७॥
जितुकी शाहापुरीं यात्रा मिळाली । तितुक्यास समर्थें आमंत्रणें देवविलीं ।
उद्धवजननी विस्मयें समर्थचिंतनीं बैसली ।
कर्ता भोक्ता श्रीराम ह्मणे ॥ ३८ ॥
समर्थें दुबळ्याचें करेणेर[2] साजिरें केलें । ठाईं ठाईं अन्न देवें करविलें ।
मसुराग्रा[3]मीहूनि पाहिजे तें आणाविलें । सहस्रेक पात्र बैसलें पंगती ॥

१ तरी हा लोकांचा भावार्थ । भाविकां देव यथार्थ । अन्यत्र कल्पना वेर्थ । कुतर्कांची ॥ असें च श्रीसमर्थांचें हि सांगणें आहे. २ अंदण, करणी. ३ शहापुरापासून पाऊण कोस मसूर आहे.

देवांब्राह्मणांची पूजा करूनि बरवी ।
संकल्प सोडविला उद्धवबाळकाकरवीं ।
तुझी समाराधना जाण रे तूं जीवीं । कर्ता भोक्ता सर्वेश्वर ॥ ४० ॥
एवं न सांगोनि समर्थें सांगितलें । न बोलोनि समर्थें बोलिलें ।
येकांकी येकांतभोजन यास्तव स्थापिलें ।
समुदाय विस्तीर्ण ह्मणोनियां ॥ ४२ ॥
कोणासी पंगतीसी न करावी आवडी निवडी ।
येक चि अवघी परमार्थघडी ।
अवघीं लेकुरें आपुलीं ऐक्यत्वें रोकडीं । अधिकारपरत्वें भिन्न भिन्न ॥
समर्थस्वामी सर्व्रांतरीं अभिन्न । येकांत भोजन करिती जाण ।
श्रीहनुमानरूपें लोकांसी दर्शन । पुण्यवंतासी जालें हो ॥ ४३ ॥
प्रत्यक्ष अप्रत्यक्ष श्रीगुरुदर्शनें । अधिकाअधिक संदर्शने ।
जैसीं जैसीं श्रीगुरुवचनें । तैसीं तैसीं सुखकारी ॥ ४४ ॥
मूढ जन ह्मणती देहधारी । सुबुद्धिमान ह्मणती अवतारी ।
समर्थाची समर्थ जाणती थोरी । संतसज्जन यथार्थ ॥ ४५ ॥
ह्मणोनि संतसंगतीसी राहावें । श्रीगुरुदर्शन अखंड घ्यावें ।
नाना ब्रह्मभोजनीं संतृप्त व्हावें । तीर्थप्रसाद पंगती ॥ ४६ ॥
जयासी जाली संतसंगती । तयासी च लाभली समर्थपंगती ।
कर्मानुसार प्राणी रंगती । प्रपंचीं अथवा परमार्थीं ॥ ४७ ॥
एवं समर्थस्वामीचा परमार्थ । श्रीगुरुचरणीं दृढ भावार्थ ।
वेणीगिरिधर भोजनवाक्यें यथार्थ । संतचरणीं निवेदी ॥ ४८ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ४९ ॥
समास चौदावां ॥ १४ ॥ जय जय राम ॥

---

१ श्रीसमर्थ दिवसांतून एकदां च जेवित.

## ॥ समास पंधरावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां समर्थाचीं ब्रह्मभोजनें । नाना प्रकारें केलीं निवेदनें ।
मागुती कित्तेक समर्थभोजनें । निवेदन करणें सेवेसी ॥ १ ॥
कोण्ही येक दिवसीं प्रेमसद्भावें । वेणाबाईनें प्रार्थिलें जें श्रीगुरुदेवें ।
आजी विजयादशमीसी उत्तर भोजन अगत्य करावें ।
लडिवाळपणें विनवितसे ॥ २ ॥
मज शरणागताच्या बोलें । समर्थें मागें मौन विसर्जन केलें ।
तीन प्रहर पत्रार्थें कार्य चालविलें । बाहो क्षत्रीं देवालयीं ॥ ३ ॥
समर्थ ह्मणती देवगृहीं द्विवार भोजन तरी होईल ।
जरी ब्रह्मानुसंधानी पाक घडोनि येईल ।
अवश्य ह्मणोनि पंचचुली चेतविले आवेल ।
पंचतत्वपात्रें भरूनि ठेविलीं ॥ ४ ॥
जड प्रकृतिपात्रें चैतन्य शुद्ध अन्न । ज्ञान विज्ञान विशुद्ध परमान्न ।
विमळ बोधाग्नितेजें दिव्यान्न । निर्मळ पाक पक्वान्न सिद्ध जाले ॥ ५ ॥
तत्त्वमसि वाक्य त्रिवेणी । ब्रह्मानुसंधानी गुरुकृपा वेणी ।
शुद्ध अध्यात्मविद्यानिरूपणी । अगोचरीमुद्रा अलक्षीं बैसे ॥ ६ ॥
शुद्ध स्वयंपाकपात्रें आपेंआप उतरलीं ।
निजबोध मेवाग्नीनें[2] सोनविलीं[3] ।
सद्गुरुसमर्थें कृपादृष्टीनें पाहिलीं । दिव्यान्नें वोगरिलीं[4] समर्थताटीं ॥७॥
अन्नं ब्रह्मरसो विष्णु खरें । भोक्ता देव महेश्वर निर्धारें ।
व्यापक विष्णु परब्रह्म आदरें । भोक्ता सद्गुरुनाथ सर्वेश्वरु ॥ ८ ॥

---

१ श्रीसमर्थ दिवसांतून एकदां च जेवीत. २ मवागी, मंद अग्नि. ३ मुरूं दिलीं. ४ ओगरिलीं, ओगराळ्यानें वाढलीं.

उत्तर सिध्धांत समर्थभोजन । प्रसाद लाभती संतसज्जन ।
माहावाक्य वेणी स्वानुभूति आपण । अनन्य मिळणी परब्रह्मीं ॥ ९ ॥
सद्गुरुनाथाचें आत्मभोजन । शेष प्रसाद लाधले सुबुद्ध जन ।
जनामध्यें जे कां सज्जन । येकांतभोजनीं प्रवेशले ॥ १० ॥
सद्गुरुनाथें शुद्ध केला गुळोंळा[1] । स्वानंद उदकें खळाळा ।
गुरुमुखीं मुखशुद्धीचा सोहळा । त्रयोदशवर्णि तांबुल जाले ॥ ११ ॥
नित्य निरंजन अति मृद शैय्या । श्रीपादसंव्हन श्रीगुरुराया ।
वेणीगिरिधर लागोनि नित्य पाया । उद्धार त्रिवेणी संकीर्तनी ॥ १२ ॥
आतां कल्याणमहंतें प्रातःकाळीं नैवेद्य केलें ।
समर्थें कल्याण महंत परीक्षिले ।
घोर वनीं श्रीगुरुनाथ टाकूनि[2] गेले । अस्तमान पावले दिवाकर ॥१३॥
मग अन्नपात्रें बांधोन शुद्ध धोत्रीं ।
घोर वनीं चालिला कल्याण महंत रात्रीं ।
पुढें माया कोहिनों[3] नदी पूर्णपात्रीं । कल्याणनामा उतरला ॥ १४ ॥
पुढें वनौकं[4] भिल्ल धनुर्धारी । विद्या चुड्या घेऊनि दोघे करीं ।
समर्थांची शुद्धि दाविती वनांतरीं । समर्थ दाऊनि गुप्त जाले ॥ १५ ॥
अगोचर अदृश्य स्वामी देखिले । कल्याणसेवकें अभिवंदिले ।
आनंदें ब्रह्मगोळ पूर्ण भरले । दिव्यान्नपात्रें समर्पिलीं ॥ १६ ॥
साहा प्रहराचीं सध्यान्नपात्रें[5] देखिलीं ।
समर्थें स्वहस्तें वाढोनि घेतलीं ।
ब्रह्मांडापैलिकडे शेषपात्रें झुगारिलीं ।
कल्याणनामा उभा मुखवस्त्रें ॥ १७ ॥
समर्थाचें आत्मभोजन जालें । मुखशुद्धि तांबुल कल्याणें दिधलें ।
समर्थशेषपात्रीं जों शोधूनि पाहिलें ।
तों शेष ना पात्रें दिसेतिना दृष्टी ॥ १८ ॥

---

१ गुळणी. चूळ. २ नैवेद्य तयार झाला असून तो तसा च टाकून श्रीसमर्थ घोर अरण्यांत निघून गेले. ३ कोयना. कऱ्हाडाजवळ कृष्णेस मिळते. ४ वनचर. ५ सिद्धान्न, शिजविलेलें अन्न.

सद्गुरुनाथजी बोलती हास्यवंगत्रें[1] ।
कल्याणा परलोकासी गेलीं तीं सत्पात्रें ।
वैकुंठ कैलास सत्यलोक पावलीं चर्मनेत्रें ।
पुन्हा आतां दृष्टि दिसेतिना ॥ १९ ॥
कल्याणनामा ह्मणे जी धन्य आह्मी । नैवेद्यनिवेदन केला समर्थस्वामी ।
आतां शयनाकारणें केवळ भूमि ।
कंथा मेखळा मात्र आंथुरिली ॥ २० ॥
अंधकारें भूगोळ बाहेरी कोंदाटले । समर्थ स्वयंप्रकाश अंतरीं दाटले ।
स्वामी पैल येक उजाळे पर्वतातळीं वाटले ।
कोण देवभक्त आले दर्शनासी ॥ २१ ॥
दर्शनासी आले असतील रंगनाथपंत ।
समर्थ बोलिले तंव चढले पर्वत ।
दिवट्या हिलाल थाट लखलखित । सहस्र पदाति[2] समागमें ॥ २२ ॥
कनाता पडदे पलंग समया । नाना पुष्पें फळें सपर्या[3] श्रीगुरुराया ।
येऊनि लागले सत्वर सद्गुरुपाया । अर्चन केलें समर्थाचें ॥ २३ ॥
कर्पूर केळें सोनकेळें सध्या थिजलीं घृतें ।
दध्यें दुग्धें शर्करा सीतळामृतें ।
समर्थें सेविलीं स्वइछा किंचितें ।
आच्मन मुखशुद्धि तांबुल जाला ॥ २४ ॥
कल्याणसेवक पुढें पाचारिला । अरे तुजसाठीं रंगनाथपंत आणिला ।
आपुला सेवक निराहारी देखिला । नैवेद्य करावा बलभीमार्पण ॥ २५ ॥
रंगनाथपंत केळें सोलूनि देती । प्रसाद सेवितो सेवक कल्याणमूर्ति ।
जन्मजन्मांतरीचे श्रम हरती । दधि दुग्ध केळें शर्करा घृतें ॥ २६ ॥
गुरुभक्तासी कैंचे श्रम कोठें । समर्थप्रतापाचें नवल मोठें ।
घोर अरण्यीं साहित्य नेटें[4] । समर्थें दाविलें सेवकां ॥ २७ ॥

---

१ हास्यवक्त्रें, हास्यमुखानें. २ पायीं चालणारे. ३ पूजा. ४ निश्चित.

ऐसे सेवक ऐसे स्वामी । संत सज्जन वाक्यें ऐकतसां तुह्मी ।
वेणीगिरिधर वाक्यार्थी आह्मी । जाहाले वर्तमान लिहितसों ॥ २८ ॥
कोण्हीयेक समईं दर्शनासी आला करारी भक्त ।
समर्थें बर्छीनें फोंकिला जीवन्मुक्त ।
नवल त्याचा प्रेमा अविमुक्त[1] । कर्णावरूनि बर्छी गेली ॥ २९ ॥
बर्छी तिकडे भूमीसी रुतली । येथें करारभक्तांची मिठी पाईं पडिली ।
पोटीसीं धरूनि समर्थ ह्मणती रे धन्य तुझी माउली ।
सांग आपुली वर्तमानें ॥ ३० ॥
देवा रायगडासी गेलों होतों स्वामी ।
शंभरी होन भिक्षा देवविली तुह्मी ।
समर्था नेतो मी गृहस्थाश्रमी । मातुश्रीकरीं द्यावया ॥ ३१ ॥
बापा आजी रे माझे घरीं तूं जेविसी ।
किंवा मजला आपुल्या घरासी नेसी ।
स्वामि प्रसाद सेवीन पायांपासीं । या घेर ब्रह्मारण्यामध्यें ॥ ३२ ॥
संगें घेतला जीवन्मुक्तनामा । पाषाण उलथून काढिला सर्व सामा[2] ।
स्वयंपाक करविला उत्तमोत्तमा । घोर दर्कुटीमाझारी ॥ ३३ ॥
समर्थ ह्मणती रे अवधारी । साक्ष भोजन पाहिजे वनांतरीं ।
पैल सात ब्राह्मण दिसती कड्यावरी । धोत्रपात्रपाणि[3] बोलाविले ॥३४॥
अक्षोभ[4] सरोवरीं समर्थें केली सांग पूजा ।
बाहिर बलभीममूर्ति आणिली वोजा ।
देव ब्राह्मण सेवकेसीं समर्थ जेविले गजगजा ।
जीवन्मुक्त तांबुल देतसे ॥ ३५ ॥
समर्थें शत होन सेवकाचे जवळी घेतले ।
सात होन सप्तऋषीसीं दक्षणेंसी दिधले ।
शेष होन मातुश्रीसी द्यावया ठेविले । तया सेवकाचे ॥ ३६ ॥

---

१ दृढ. २ सामें, सामुग्री. ३ धोत्रें आणि पात्रें आहेत हातांत ज्यांच्या अशा त्या ब्राह्मणांना. ४ खोल, अथांग.

मग समर्थे मोठें कौतुक दर्शन दाखविलें ।
बर्छीपाणीनें सीघ्रं उड्डाण केलें ।
नेणों हनुमानकिराण गगनांत गेलें ।
विस्मय समाधि लागली जीवन्मुक्ता ॥ ३७ ॥

अस्तमाना दिवाकर चालिला ।
मग जीवन्मुक्तनामा चांफळासी आला ।
साध्यांत वाक्यार्थ गिरिधरें लिहिला ।
समर्थभोजन चरित्र ऐसें ॥ ३८ ॥

ऐका कोण्हीयेक प्रेमळसेटीनामा सद्भावें ।
समर्थासी नैवेद्य आणी प्रेमभावें ।
प्रतिवार्षिक संचितार्थ निवेदावें । माहा प्रेमें करूनियां ॥ ३९ ॥

परम वृद्ध मुखांत नाहीं येक दांत ।
सर्व सामग्री बांधोनी आणिताहे पोत्यांत ।
सज्जनगड चढे चहुं प्रहरांत ।
हुर्मुजी वस्त्र निशाण लाऊनियां ॥ ४० ॥

स्वामि प्रेमळसेटीनामा आला दर्शनासी ।
समर्थ येकांतीं दर्शन देती त्यांसी ।
येतां चि पुसे वेणाबाईसी ।
सांग नैवेद्य आपुला करावया ॥ ४१ ॥

वेणाबाईनें समर्थदर्शना यावें । तेव्हां प्रेमळशेटीनें पर्वत चढावें ।
समर्थांपुढें तत्वपोतें ठेवावें । तत्वें करावी निवेदनें ॥ ४२ ॥

---

१ "ऊर्ध्व" ब्राडांत. २ उड्डाण. ३ ही गोष्ट गिरिधरांनीं येथें च कां संपविली, कोण जाणे. पुढें तो ब्राह्मण हळहळत घरीं गेला, पण तो जाण्यापूर्वी च श्रीसमर्थांनीं होन आणून दिले होते इत्यादि या गोष्टीचा उत्तरार्ध इतरत्र दिलेला आहे. ४ श्रीसमर्थ दिवसचे दिवस एकांतांत बसत व अशा वेळीं त्यांची भेट बहुधा कोणास होत नसे. पण जरूरीच्या कामासाठीं च एकादा महंत आला तर त्याला मात्र श्रीसमर्थ भेट देत.

सात पांच भात दोनी चारी वर्णे पुर्णे ।
दाहा वीस शाक पेळवे गोधूम धान्यादि चुर्णे ।
पंचामृत केळें फळें दक्षणा पुगीफळें श्रीनागपर्णे ।
दोनी पंचे प्रावर्णे श्रीमुद्रा वोली ॥ ४३ ॥
वेणाबाईनें यथासांग अन्न रुचिकर करावें ।
समर्थासी येकांतीं संपूर्ण पात्रीं वाढावें ।
प्रेमळशेटीनें क्षणक्षणा येऊनि स्वामीसी पुसावें ।
सर्व तत्वें देवा निवेदनें जालीं कि ॥ ४४ ॥
समर्थे सर्व तत्वें सांगावीं नामें घेऊन ।
विश्रांती करावी प्रेमळशेटीचा नैवेद्य जेऊन ।
गुरुउच्छिष्टभोजन करितसे श्रीपात्र नेऊन ।
पाहे पदार्थ सेऊन प्रत्ययो यावया ॥ ४५ ॥
मंचकातळीं बैसोनि पादसंव्हन करी ।
तत्वाचें तत्व निवेदन मनीं विवरी ।
आत्मनिवेदनी योगनिद्रा लागतां बरी ।
गुरुआज्ञा घेऊनि झडकरी पुनर्दर्शन ह्मणे ॥ ४६ ॥
ऐसा अकरा वर्षे नैवेद्य निवेदन केला ।
मग प्रेमळशेटी सज्जनगडीं गुप्त जाला ।
सदाशिव प्रेमळशेटी कोणा न कळला । समर्थसद्गुरुवांचूनियां ॥ ४७ ॥
एवं वेणीवाणी समर्थपरमार्थ विस्तारी । तत्त्वमसि त्रिवेणी निर्धारीं ।
समर्थभोजनीं यथार्थ वाणी वैखरी । वेणीगिरिधर लिहितसे ॥ ४८ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ४९ ॥
समास पंधरावा ॥ १५ ॥ ॥ ७ ॥

---

१ पळवा=वाळविलेली पालेभाजी. २ गहू. ३ सुपारी. ४ विड्याचीं पानें. ५ श्रीरामनामाचा ठसा. श्रीरामनामाच्या ओळी ज्यांवर मुद्रित केल्या आहेत अशीं वस्त्रें.

## ॥ समास सोळावा ॥



॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागा समर्थभोजनीं वर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां समर्थसदनीं माहांपुरुषांचीं भोजनें ।
श्रोतेजनीं परिसावीं ॥ १ ॥
युगत्रई सनकादिक ज्ञानी जाले ।
नाना भागवेत ब्रह्मरसीं निवाले ।
सावकाश जेऊनि स्वानंदें निजेले ।
कांहीं लीलावतार विचरले ब्रह्मगोळीं ॥ २ ॥
सांप्रत कलयुगाचे ठाईं । साधु संत सज्जन आत्माराम सर्व हि ।
ब्रह्मांडभांडोदरीं दर्शनें देती कांहीं । अनंत संत सुखपात्रें ॥ ३ ॥
**श्रीरामदासस्वामी** समर्थमूर्ति । कलयुगीं चाळीस सहस्र संतमूर्ति ।
विख्यात पावन पुण्यकीर्ति । भूत भविष्य वर्तमानी ॥ ४ ॥
हनुमान अवतार वर्तमानी । मुख्य संत सज्जन ज्ञानी समाधानी ।
भक्त विरक्त योगी ब्रह्मानुसंधानी । ब्रह्मानंदें विचरले ॥ ५ ॥
समर्थस्वामीचें ब्रह्मांड घर । ब्रह्मांडीं व्यापक सर्वेश्वर ।
सर्वेश्वराचे संत अवतार । सुखस्वानंदें पातले ॥ ६ ॥

---

१ हा व पुढचा असे दोन समास वाङ्मयसंशोधकांना फार च उपयुक्त आहेत. यांत असा प्रसंग वर्णिला आहे कीं, अनेक महापुरुष श्रीसमर्थांच्या घरीं भोजनास आले आहेत व ज्याला जो पदार्थ प्रिय तो त्याला वाढला आहे. ज्ञात व अज्ञात असे अनेक सत्पुरुष व प्रकाशित आणि अप्रकाशित असे त्यांचे ग्रन्थ, यांचा उल्लेख, कोठें प्रत्यक्ष तर कोठें अप्रत्यक्ष, असा या दोन समासांत आला आहे; त्यामुळें अज्ञात संत व त्यांचे ग्रन्थ यांचा शोध लावण्याची दिशा संशोधकास येथें कळणार आहे. २ भगवद्भक्त.

समर्थसदनासी माहापुरुष आले । समर्थस्वामीसी स्वानंदें भेटले ।
समर्थदेवें सन्मानिले अर्चिले । आत्माराम सुखमूर्ति ॥ ७ ॥
आत्माराम तारक ब्रह्म । मुख्य प्राणनाथ हृदयवर्म ।
सकळ साधु संत सज्जन परब्रह्म । ब्रह्मभोजनीं सादर हो ॥ ८ ॥
शुद्ध स्नानें सारिलीं सर्वथा । शुद्ध संध्यावंदनें केलीं तत्वता ।
शुद्ध देवार्चनें मांडिलीं येकात्मता ।
शुद्ध नैवेद्य स्वात्मता समर्पिले ॥ ९ ॥
शुद्ध आत्मप्रसाद आले घेउनी । शुद्ध बुद्ध ज्ञानी समाधानी ।
सच्चिदानंदें आत्मारामलोचनी[1] ।
अनंत साधु संत बैसले स्वानंदें ॥ १० ॥
अनंत दाटली ब्रह्मवृंदें । आनंदें गर्जती छंदबंधें[2] ।
नाना वेदाक्षरें नाना विविधें ।
इकडे वाढण होतें नाना ब्रह्मरसीं ॥ ११ ॥
नाना पंगति नाना प्रकार । नाना षडरस उत्तम हे चि सार ।
भोक्ता श्रीराम सर्वेश्वर । तारक ब्रह्म चराचरीं ॥ १२ ॥
शुद्ध आत्मसुगंधें सुमनगंधमाळा ।
शुद्ध धूप दीप आत्मप्रकाशें सकळां ।
अनुपम्य पंगति सोज्वळा । आत्मसंतोषें संपूर्ण ॥ १३ ॥
नाना नवरत्नरंगें भक्तिरंगमाळा । नाना आत्मभूषणें फांकती कीळा ।
नाना धोत्रें पात्रें शुद्ध सोवळीं झळाळा ।
नाना ब्रह्मगोळा उजळिती ॥ १४ ॥
गगनाकार मंडप पूर्ण । गगनावकाश सारूनि संपूर्ण ।
तेथें पूर्णिपूर्णपणाहूनि परिपूर्ण । वाढिले संपूर्ण ब्रह्मरस ॥ १५ ॥
मुख्य येको विष्णु घेऊनि स्वानंदें । संकल्प सोडिलें परमानंदें ।
आपोशनें करिती ब्रह्मानंदें । ब्रह्मवृंद जेविती ॥ १६ ॥

---

१ सर्वत्र आत्माराम पाहणारे. २ निरनिराळ्या प्रकारचीं पद्यें.

**मुख्य[1] आचार्यस्वामी[2]** ब्रह्मानंदरस जेविती ।
**श्रीधराचार्यें[3]** गीताभागवतरसराज सेविती ।
**विद्यारण्य[4] मधुसूदन[5] रामानंद[6] मध्वमूर्ति[7]** ।
द्वैताद्वैतरस[8] घेती संपूर्ण हो ॥ १७ ॥
**नृसिंहसरस्वती** श्रीपादें । कृष्णातीरीं पात्र मांडिलें स्वानंदें ।
नाना श्रीपाद ब्रह्मगोळीं ब्रह्मानंदें । परमानंदें रस सेविती ॥ १८ ॥
**सभ्यतीर्थस्वामी[9] तारकब्रह्मस्वामी[10]** ।
**गंगाधरस्वामी सच्चिदानंदस्वामी[11]** ।
नाना आग्रही अनाग्रही श्रीपाद परब्रह्मीं । ब्रह्मानंदरसें परिपूर्ण हो ॥ १९ ॥
**नारायणाश्रमासी** ब्रह्मरसाची चरवी ।
उन्मनीमातेहातीं धाडिली बरवी ।
ब्रह्मगिरीं **त्रिंबकें[12]** ब्रह्मरस सेवी । ब्रह्मानंदीं सुखें निजेला ॥ २० ॥

---

१ येथून जीं सत्पुरुषांचीं नांवें लागतात, त्यांपैकीं बहुतेकांच्या माहितीसाठीं भक्तलीलामृत, संतलीलामृत, भक्तविजय, संतविजय इत्यादि ग्रंथ पहावेत. २ श्रीमत् जगद्गुरु आद्य श्रीशंकराचार्य. ३ गीता व भागवत यांवर टीका करणारे. ४ यांचे मूळचें नांव माधवाचार्य. हे शालिवाहन शकाच्या चौदाव्या शतकांत होऊन गेले. विजयानगरास राजा वीरबुक्क याचे हे मुख्य प्रधान होते. संन्यास घेतल्यावर हे शृंगेरी मठाचे अधिपति झाले होते. सर्वदर्शनसंग्रह, अपरोक्षानुभूतिटीका, पंचदशी, माधवीय वृत्ति इत्यादि जगमान्य ग्रन्थांचे हे कर्ते असून पराशरस्मृतीवरील यांची टीका आज सर्वत्र आधारभूत मानली जाते. ५ हे शक १५१० चे सुमारास हयात होते. श्रीमत्भगवद्गीतेवर " मधुसूदनी " नामक यांची टीका सुप्रसिद्ध आहे. सिद्धान्ततत्त्वविवेक, अद्वैतसिद्धि, संक्षेपशारीरकभाष्यटीका इत्यादि यांनीं केलेले ग्रन्थ सर्वमान्य आहेत. ६ रामानुजसांप्रदायी एक सत्पुरुष. यांना राघवानंद हि ह्मणत. हे शके १४९० चे सुमारास होऊन गेले. ७ हें करनाटकांत शक ११६५ चे सुमारास होऊन गेले. संन्यास घेतल्यावर " आनंदतीर्थ " असें नांव यांनीं धारण केलें. यांचा मठ उडुपी येथें आहे. यांच्या सांप्रदायाचें नांव " पूर्णप्रज्ञदर्शन " असून त्याचें विवरण विद्यारण्यांनीं सर्वदर्शनसंग्रहांत केलेलें आहे. ८ रामानंद व मध्वमूर्ति हे द्वैतवादी असून बाकीचे अद्वैतवादी होते. त्यामुळें द्वैत आणि अद्वैत रसाचें सेवन यांनीं केलें असें ह्मटलें आहे. ९ (?) १० रामस्वामी पण कोण? ११ श्रीज्ञानेश्वरांचे लेखकु कीं काय? १२ हे शके १४९० चे सुमारास झाले. यांचा " बालबोध " नामक ग्रन्थ सभेच्यां संग्रहीं आहे.

नाना स्वयंप्रकाश कवि ज्ञानी गीतार्थें । नाना ब्रह्मरस सेविती परमार्थें ।
आवडीसारिखें सुखस्वार्थें । सुखस्वानंदें जेविती ॥ २१ ॥
**मुक्तेश्वराचे** भोजनप्रकार । नाना सोलीव रस सुंदर ।
**सालया पाठकनामा विष्णुदासनामा** पंगतिकार ।
नाना कथामृतसार वाढिले तया ॥ २२ ॥
**मुकुंदराज** विवेकसिंधुरस सेविती ।
**हरिनाथ**[1] मांडीवरी श्रीपद गुळोरी[2] दाविती ।
**हस्तामलक**[3] ब्रह्मरस सेऊनि गोडी स्वयें सांगती ।
निजतृप्ति जाली ह्मणोनियां ॥ २३ ॥
**मछिंद्र मीन गोरक्षें** ब्रह्मरस सेविले ।
**चौरंगी गैनि** पंगतिकार दाटले ।
**निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाईसीं** जेविले ।
अपार ब्रह्मरस येकपांति[4] ॥ २४ ॥
**जालंधर गोपीचंद मैनावती** । नाना योगमार्गें ब्रह्मरस सेविती ।
तिघें जणे बैसुनियां येकपांति ।
**कानीपासी** बोलाविती गोरक्षीकरवीं ॥ २५ ॥
**जयदेवें** गीतगोविंदरस सेविला । **अनंतदेव** अनंतरसीं संतृप्त जाला ।
**बोपदेव**[5] वेणुरसीं निमग्न ठेला । **नामदेव** नामामृतरसीं संतृप्त हो ॥
**सांवतामाळियें** विठलरस उदरीं घातले ।
**पुरंदरविठलें** विठलउदरीं सहकुटुंब ठाव मांडिले ।
**कूर्मदास गोराकुंभार** अवयवशून्य बैसले ।
अयाचित ब्रह्मरस सेवावया ॥ २७ ॥
**रोहिदास** ज्ञानी रामरससेवनी । **जनमित्रनागा** हरिरसभोजनी ।
**परसाभागवतासी** वाढी रुक्मिणी । नाना विठलरस संपूर्ण ॥२८॥

---

१ मुकुंदराजांचे आजेगुरु असावेत. २ गुळाची पोळी. ३ श्रीशंकराचार्यांच्या प्रमुख शिष्यांपैकीं एक. ४ एका पंक्तीस. ५ शक १२०० पूर्वी. प्रसिद्ध हेमाद्रीचे समकालीन. हे जाडे विद्वान् होते. " भागवत " ग्रन्थ यांनीं रचला असें कित्येकांचें मत आहे.

**विसोबाखेचरें** निजसुरें पात्र चरणें लोटिलें ।
ब्रह्मांडभरीं अन्न चि अन्न जालें ।
**चांगदेवें** कित्तेक ब्रह्मरंध्रीं रसपान केलें ।
मुक्ताबाईनें जेवविले संपूर्ण ॥ २९ ॥
**भानुदास** गुळपोळी भक्तीसीं थिजलें ब्रह्मघृत जेविती ।
**येकोजनार्दन** येकीं अनेक ऐक्यरस सेविती ।
**कृष्णदासमुद्गलासी** श्रीरामरसें गळाळे येती।
**मुद्गलस्वामीसी** आवडती गुळोरियां आर्या ॥ ३० ॥
भद्राचळ **गोपाळें** गोपाळरस सेविले । **परमहंस** परमानंदरसीं तृप्त जाले ।
**नरहरि मालो** विठलरस ताटीं जेविले ।
**नरहरि सोनार** हरिहररसीं निवाले । भिन्नभेद सोडोनियां ॥ ३१ ॥
**परमानंदजोगा** परमानंदरसीं तृप्त ।
**कृष्णयाज्ञवल्की** नाना कथामृतरसीं संतृप्त ।
**सहजानंद शिवनिजानंद रामानंद**रसीं समाधिसुप्त ।
**अच्युताश्रम** आत्मारामी आरामी ॥ ३२ ॥
**रेणुकानंदन** विठल त्यातें । ब्रह्मविद्या वाढी ब्रह्मरसातें ।
**ढुंढिजनार्दन** ढुंढिराजयातें । पूर्ण मोदक अर्पिले संपूर्ण हो ॥ ३३ ॥
**दासो दिगंबर** स्वयंपाकी सोवळे । गीतार्णवरसीं संपूर्ण जेविले ।
**दामाजीपंत** भूतदयारसीं तृप्त जाले । थोर उदर **मुधोबाचें** ॥३४॥

---

१ अर्धवट झोपेंत. २ चांगदेवांनीं योगसाधन करून वाटेल तितकें सामर्थ्य मिळविलें असेल, पण त्यांना पोटभर जेवायाला मुक्ताबाईनीं च घातलें ! मुक्ताबाईचा त्यांना अनुग्रह झाला हा भावार्थ. ३ रसधारा. ४ गुळपोळीच्या. ५ यांचे अठरा हि पर्वें भारत असून " पंढरीमहात्म्य " नामक ग्रन्थ आहे. ६ सवा लाख गीतार्णव व सवा लाख पदार्णव वगैरे यांची लाखों कविता मराठींत असून दशोपनिषदावर संस्कृतांत भाष्य आहे. बावीस हात लांब व अडीच हात रुंद अशा पासोडीवर यांनीं पंचीकरण लिहिलें आहे. यांचे सारे ग्रन्थ व पासोडी हीं त्यांच्या मठांत जोगाईच्या अंब्यास आहेत. हे एकनाथांचे समकालीन होत. यांची बहुतेक कविता अप्रकाशित असून यांचा " ग्रन्थराज " म्हणून एक मराठी ग्रन्थ सभा छापणार आहे.

**तुळसीदास**ासी श्रीरामरस मिठाई ।
**नृसिंव्ह** महंतासी श्रीकृष्णरस मिठाई ।
**चंद्रेश्वर**ासी श्रीहरिरस मिठाई । **गंगाधर**ासी[1] नामामृतरस ठाईं वाढिले ॥
**जनजेसवंत**ासी विस्तारिली रामरसलुचई ।
**मिराबाई**सी वोगरिली कृष्णरसलुचई ।
**धनाजाठ**ासी भक्ति जिलिबी वाढिली ठाईं ।
**सुरदासासी** नादब्रह्मरस पाहीं ताटीं वाढिला ॥ ३६ ॥
**शेनानाहावि**यासी प्रेमरसपात्र वाढिलें ।
**पिपातानसेनें** हरिकीर्तनामृत सेविलें ।
**श्रीधरस्वामी** वेंढेरें[3] सोहं स्मरणामृत घेतलें ।
गर्भवासीं सुमनशय्या केली ॥ ३७ ॥
**तान्हो** भक्तानें भक्तिरस पूर्ण सेविला ।
**कान्हो** चोरव्यानें अंगरंग पालटिला ।
आंगीं निष्ठा रसपूर्ण बाणला । अर्धें सहित जेविला पंगति ॥ ३८ ॥
**बहिरे पिसाट** स्वरूपताट घेऊनि पळाले ।
**नागेश** शांतलिंग ब्रह्मरसीं लांचावले ।
अन्नब्रह्मासाठीं सद्गुरूचे द्वारीं लागले ।
**चोखामेळे** मिळाले श्रीदेवद्वारीं ॥ ३९ ॥
**बाजीद पठाण** ताजे ब्रह्मरोटगे सेविती ।
**हुशेन लतिफ** राम रहिम खिचडी जेविती ।
**शेखमहंमद** भक्तिरस घोंटिती । ब्रह्मानंदें स्वानंदें ॥ ४० ॥
**कबीर**भाई रामरसोईमाजी तृप्त । **नन्हवा** फकिर रामरहिमरसीं संतृप्त ।
**मृत्युंजय** ज्ञानी ब्रह्मबिरंजी सेवी नित्य ।
**बळखेंशाह**[4] अलेख पुलाव सेवी ॥ ४१ ॥

---

१ बहुधा भक्तिरहस्यकार श्रेष्ठ. २ हे तुळसीदासाचे शिष्य. यांचा मठ खान-देशांत कुकुरमुंड्यास असून समाधी बोरव्यास आहे. समाधी शक १५८०. ३ " वडेरे " बाडांत. ४ " बलख बोखार " असा पाठ बाडांत.

\+ + + + + + + ॥ ४२ ॥

शमनामीर नृसिंहसरस्वतीमैत्र । विहार सिद्धयोगी सत्पात्र ।
अधिकारपरत्वें ब्रह्मरस चिन्मात्र । त्यांसी वाढूनि पात्रें पाठविलीं ॥४३॥
अन्नब्रह्म पाहिजे सर्वां भूतीं । विशेष लाभ घेइजे सत्संगति ।
समर्थसदनीं बैसल्या उदंड पंगती । अधिकारें जेविती नाना रस ॥४४॥
सद्गुरुसमर्थ सर्व परामृश घेती ।
सर्वसाक्षी आत्माराम प्राणनाथ रसस्वाद जाणती ।
मुख्य रामब्रह्म आम्ररस सर्वांसी आवडती ।
सद्गुरुनाथ वाढविती सर्वत्रां ॥ ४५ ॥
संपूर्ण रसें दध्योदनें संतृप्ति जाली । शांति सीतळोदकें सर्वत्रीं घेतलीं।
शेषें पात्रीं कितेक उरलीं । अधिकारें लाभलीं सर्वत्रां ॥ ४६ ॥
शुद्ध आच्मनें केले गुळाळे । ऊर्ध्वस्वासें येती गळाळे ।
त्रयोदशगुणवर्ण तांबुल दिधले । सर्व संत पहुडले समाधि ॥ ४७ ॥
एवं येक पंगति जेविली समर्थसदनीं। दुसरी पंगति बैसली अनुसंधानीं।
वेणीगिरिधर श्रीगुरुचरणीं । वाक्यें निवेदी संतांचीं ॥ ४८ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ४९ ॥
समास सोळावां ॥ १६ ॥ जय जय राम ॥ ७ ॥

---

## ॥ समास सतरावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वसिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां येक पंगति जाली ब्रह्मभोजनीं । संतसज्जनीं अनुसंधानीं ।
आतां दुसरी पंगति समर्थसदनीं । सुखस्वानंदें बैसली ॥ १ ॥

---

* हीं ओवी दोन्ही प्रतींत हि नाहीं. जागा मात्र कोरी सोडली आहे.

नाना सत्कर्म सामर्जनें भक्तिरंगमाळा । नाना दिव्यासनें झळकती झळाळा ।
नाना गंध सुगंधे सुमनमाळा । पूजा सकळा अनुक्रमें ॥ २ ॥
नाना आत्मसुगंध धूपार्ति । नाना आत्मप्रकाशें उजळिल्या वाती ।
नाना ब्रह्मरस प्रकारें वाढिती । पूर्ण परिपूर्ण वाढण जालें ॥ ३ ॥
ऐको विष्णु सुखस्वानंदें घेतला । हरिभक्ति संकल्प सोडिला ।
प्रथम आपोशनीं गजर घोष जाला । ब्रह्मानंदें स्वानंदें ॥ ४ ॥
परब्रह्मीं ब्रह्मरूप संत । जैसे श्रीरामीं रामरूप हनुमंत ।
भोजना बैसले केवळ निवांत । समर्थसद्गुरुपंगती ॥ ५ ॥
हनुमंत असती अनंत ग्रामीं । संत सज्जन वसती निवांत ग्रामीं ।
पिंड ब्रह्मांड अष्टग्रामीं । मोक्ष मुक्तिदोरा सन्मुख मूर्ति ॥ ६ ॥
प्रथम **विश्वनाथ** पुराणीक पंगतीसी शुकमूर्ति ।
स्वानंदरस घेऊनि गोडी सांगती ।
**रंगनाथें** जेऊनि भविष्य वदती । मारुंडी विद्या वाणी मुखें ॥ ७ ॥
**भगवंतपंता**सी भागवत अन्नें । यथेष्ट वाढिलीं परमान्नें ।
**रघुनाथस्वामी**सी वोगरिलें स्वसंवेद्य बोनें ।
**आनंदमूर्ति** सत्पात्रीं भोजनें सारितसे ॥ ८ ॥
आनंदमूर्तीसी गुरुभक्तिप्रेमरस वाढिला ।
सबाष्प सकंप पुलकांकित ब्राह्मण जाला ।
हनुमानस्वामीचा मुखप्रसाद विस्मयें गळाला ।
नवल कृष्णातीरीं वितलें प्रसंग हो ॥ ९ ॥
**विठलें रंगमूर्ती**सी स्वानुभव दुग्धभात वाढिले ।
**कृष्णदास जयरामा**सी आत्मानुभव दधिभात प्रसादिले ।
**केशवराजा**सी ब्रह्मानुभव केवळ तूपभात वोगरिले ।
शेष तर्के वागोरिलीं समस्त संतांसी ॥ १० ॥

---

१ संमार्जनें. २ "मुक्तिद्वारीं" बाडांत. ३ (?) ४ पंचायतनांतील नव्हत, पण कोण ? ५ (?) दोन्ही प्रतींत असा च शब्द आहे. ६ (?) ७ आनंदमूर्तींचे गुरु. ८ बोणें, नैवेद्य, अन्न. ९ ब्रह्मनाळचे आनंदमूर्ति, निगडीचे रंगनाथ, वडगांवचे कृष्णदास जयराम, भागानगरचे केशवराज व खुद्द श्रीसमर्थ असें हें पंचायतन होय. १० वितळा, झाला. ११ विठ्ठलराव ऊर्फ आत्यास्वामी. रंगनाथस्वामींचे बंधु च.

तुकोबासी गुळभिन्याचे मुडिव कानवले केले ।
वामनासी उदंड चुर्मा लाडु वळोनि वाढिले ।
रमावल्लभदासासी स्वरूपखोबऱ्याचे गिलगचे तळिले ।
निरंजनें पूर्ण मोदक आरोगिले सिद्ध लाडु ॥ ११ ॥
पूर्णानंद शिवराम सनतिदास । पूर्णगर्भा सघृत जेविती सावकास ।
तुकोबाचा पुत्र परम उदास । नारायणनामा पंगती ॥ १२ ॥
देवराज वामननंदन । काशीराज योगीराज विठलनंदन ।
आनंदघन वर्षती पावन । जेऊनि ढेंकर देताती ॥ १३ ॥
राघवरंक संत बासंत । ब्राह्मण शेष सेविती अनंत ।
संदेहवारण करिती ग्रंथ । पंगति घालिती सत्संगति १४ ॥
नादब्रह्मीं कृष्णदास कवि । मुकुंदनारायण घेतो रसब्रह्म चवी ।
माहादेव मुरारि गायक खेवी । नाना शिवसुत वंश जनार्दनी ॥१५॥
शब्दकौशल्य विठल कवि । नाना कविरस घेतसे चवी ।
रघुनाथस्वामी स्वानुभवी । श्रीरामरस सेवितसे ॥ १६ ॥
जनपंडित वाणीमुखें । नाना कृष्णरस घेतसे सुखें ।
गोविंद दिक्षित श्रुतिरस स्वसुखें । रामकृष्णमंत्रीं वाखाणी ॥ १७ ॥
पंडितराय विरक्त जाले । अन्य वाणी रसासी विटले ।
आत्मब्रह्मरसासी सोकले । आर्तभूत संपूर्ण ॥ १८ ॥
श्रीराम काकंभट श्रीरामरसीं । अयाचित बैसले भोजनासी ।
गोदातीरीं श्रीरामजोसी । नित्य पुर्णपोळीसीं लांचावले ॥ १९ ॥
हरिदास हरि गंगातीरीं । सध्या वाणी सिखरणी वर्पतो क्षीरी ।
श्रीरामभजनीं निष्ठा बरी । वरद बाणेश्वरी अनुकूळ तया ॥ २० ॥

---

१ भक्षिले. २ " योगीराज " शब्द मागाहून समासांत लिहिलेला आहे. तो बाडांत नाहीं च. ३ राघवरंकांनीं शके १६०९ त लिहिलेला " संदेहवारण " नामक ग्रन्थ अप्रकाशित असून सभेच्या संग्रहीं आहे. ४ यांची " चेंडुफळी " सभेच्या संग्रहीं आहे. ५ ? हा शब्द श्रीसमर्थकृत कविता– स्फुट श्लोक छप्पनांत आला आहे. खवैय्या तर नव्हे ? ६ यांचा सुमारें सोळा हजार ओव्यांचा " योगवाशिष्ठ " ग्रन्थ सभेच्या संग्रहीं आहे. हे पंधराव्या शतकांत होऊन गेले. गुरूचें नांव शांतानंद.

**रुक्मपंडितें** विजय विठलरसीं । सावकाश तृप्त जाला सहकुटुंबेसीं ।
**यदुराज** आसन घाली **आपादिक्षितेंसीं** । विमळ ब्रह्मरसासी सेवावया ॥
**सखाभक्त** कवितावर्णरस जेविला ।
**लोलिंबराज** अस्नात पंगति सुस्नात देखिला ।
**गोसावीनंदन** साधें जेवण अपेक्षिता जाला ।
परिपूर्ण मोदक संपूर्ण जेवी ॥ २२ ॥
**रामानंदाची** गोडगोड गीर्वाणें जेवणें ।
**परमानंदाचीं** गोडगोड गीतामृतें सेवणें ।
समस्त हरिदासांसी हरिभक्तांसी वाढिलीं कथामृतें दिव्यान्नें ।
लेकुरां लेकुरीं पुरवलीं ॥ २३ ॥
**बोधल्यासी** ठोंबरा दही यथेष्ट वाढिलें ।
**हरि नारायणें** हरिस्मरणामृतपात्र अखंड मुखीं लाविलें ।
समस्त माहापुरुषांसी मध्यपानीय उत्तम देवविलें ।
गुरुदेवें तारक ब्रह्म सेवविलें नामामृत ॥ २४ ॥
नंदवळीचे[3] माहापुरुष । सावकाश घेती ब्रह्मरस ।
**स्वरूपवळीचे** उत्तम पुरुष । स्वरूपरस सेविती ॥ २५ ॥
**चैतन्यवळीचे** पुरुष पंगति । अपार ब्रह्मरस घेती संतसंगति ।
**प्रकाशवळीचे** पुरुष आत्मरंगें रंगती । आत्मप्रकाशें परमान्नें ॥ २६ ॥
चिद्घन[4] संप्रदाईचे ज्ञानघन पुरुष । स्पर्शास्पर्श पाहाती पंगतीस ।
भेदाभेद परामृश । समर्थसदनीं घेताती ॥ २७ ॥
**राघवचिद्घन उधवचिद्घनें[5] । रामकृष्णाचिद्घन श्रीधरचिद्घन ।**
**विठलचिद्घन चिंतामणिचिद्घन** । संतपंगति निवाले ॥ २८ ॥
येकनाथी उभय संतानें सकळ । **काशीनाथादि दिनशाम[6]** गुणी निर्मळ ।
**निंबराज गोविंदराज रामकृष्णदयार्णव** कुटुंबवछल ।
कथामृतरस पुष्कळ वाढिले तया ॥ २९ ॥

---

१ विजापूरच्या बादशहाचे खजाननीस रुक्मण्णापंत. २ वडा ? ३ आनंद, स्वरूप, चैतन्य आणि प्रकाश अशा चार सांप्रदायाचे महापुरुष. ४ चिद्घन ह्मणजे ज्ञानघन. ५ उद्धवचिद्घन सुप्रसिद्ध आहेत. हे समर्थकालीन होत. यांची समाधि धारूरास आहे. बाकीचे चिद्घन कोण ? ६ " शामगायक " बाडांत.

नारायण शिवराम स्वानुभवी । येका येकपणें घेतसे चवी ।
दादो गोविंद शामादिक[1] अनंत कवि ।
जेऊनि निपुण संकीर्तनीं ॥ ३० ॥

भीमातीरीं विशाळ पंगति बैसती ।
पांडुरंग परमान्न संपूर्ण संत जेविती ।
रामविजय कृष्णविजय ब्रह्मरस सेविती ।
ब्रह्मानंद श्रीधर कुटुंबी ॥ ३१ ॥

गंगाधर कोनेरी नरहरिदास । आत्मपानक[2] घेतो सावकाश ।
शिवदास शैव नैवेद्य तयास । आत्मप्रसादें प्रसादिला ॥ ३२ ॥

आत्मगोपाळ प्राणगोपाळ आत्मरसीं ।
त्रिंबकनाथ परिपूर्ण श्रीरामरसीं ।
ज्यां ज्यां प्रीति वाटे जैसी । तैसी सेविती परमान्नें ॥ ३३ ॥

मार्कीनाथ सर्वसंगत्यागी । ब्रह्मभोजनीं बैसला वीतरागी ।
मानपुरी ज्ञानी आत्मरंगी । आत्मरस सुखीं सेवितसे ॥ ३४ ॥

केसरीनाथ परमहंस । गुरुभक्ति सेवी उद्बोधरस ।
मध्वनाथ सेवी अद्वैतरस । मधुकरें[3] उत्तम होऊनियां ॥ ३५ ॥

गणेशनाथ मन्मथ शिवलिंग । गोपीनाथ बस्वलिंग ।
बंदेनाथ शांतलिंग । आत्मरसीं संतृप्त हो ॥ ३६ ॥

निपटनिरंजन कितेक संत । पूर्व पश्चिम उत्तर दक्षिण प्रांत ।
विशाळ विस्तीर्ण पंगति बैसल्या अनंत । अंत न लगे संतांचा ॥३७॥

नाना जोगी जंगम सोफिमूर्ति[4] । फकीर कलंधर वलिमूर्ति[5] ।
नानक बैरागी जटिळ शांतमूर्ति । अनंत पंगति भिन्नभिन्ना ॥ ३८ ॥

समर्थ सर्वज्ञ सर्व परामृश घेती । आत्माराम सर्व हि सांभाळिती ।
ऐक्यभावें पंगति न्याहाळिती । भिन्नभावें कोण्ही असेचिना ॥ ३९ ॥

---

१ " शामादिक " शब्द समासांत लिहिलेला आहे; बाडांत मुळीं नाहीं च. २ पानक=चिंचपाणी, साखरपाणी, लिंबुपाणी. ३ भ्रमर. ४ एक पंथ आहे. ५ अवलिया, साधु.

नाना गद्यें पद्यें उत्तम श्लोक । गर्जना करिती स्वानंदें लोक ।
स्वर्गींहूनि पातले देवलोक । समर्थप्रसाद घ्यावया ॥ ४० ॥
भोजनपंगति भिन्न भिन्न । सर्वांतरीं आत्माराम अभिन्न ।
श्रीगुरुसर्वेश्वरें श्रीरामरस संपूर्ण । नाना संतपात्रीं प्रसादिले ॥ ४१ ॥
निगमकल्पतरूचें विशाळ अमृतफळ ।
अपार ब्रह्मरस काढिला परम निर्मळ ।
संतसज्जनासी वाढिला सकळ । श्रीरामदासस्वामीसमर्थें ॥ ४२ ॥
शुद्ध दध्योदनें शेवटीं सेविलीं । शांति शीतळोदकें सुगंधें घेतलीं ।
उत्तराच्मनें जीवनें मुखशुद्धि खळाळी ।
गुरुमुखशुद्धि तांबुल्य सर्वां ॥ ४३ ॥
येकीं येक अद्वयीं द्वय वर्ण मिळाले । त्रयोदशगुणवर्ण चर्वण केले ।
रंग सुरंग रंगोनि ठेले । अनंत ब्रह्मांडें रंगलीं तांबुलें ॥ ४४ ॥
दाहा सहस्र वर्षें येक येक पंगति । चाळीस सहस्र संतसज्जनमूर्ति ।
गुप्त प्रगट अनंत मूर्ति । कवितास्फूर्ति मौनावे ॥ ४५ ॥
चारि लक्ष बत्तीस सहस्र कलयुग ।
दाहा सहस्र वर्षें नामकीर्तनप्रसंग ।
आत्माराम निजात्मरंग । समर्थसद्गुरुप्रतापें ॥ ४६ ॥
एवं पांच सहस्र वर्षें कांहीं न्यून जालीं[1] ।
पांच सहस्र वर्षें कांहीं अधिक उरलीं ।
समर्थसदनीं ब्रह्मभोजनें नित्य मांडिलीं ।
वेणीगिरिधर वाक्यें लिहिताहे ॥ ४७ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ४८ ॥
समास सत्रावा ॥ १७ ॥ जय जय राम ॥

---

१ गिरिधरांचा समाधिशक १६५१, ह्मणजे गतकलि ४८३०, ह्मणजे पांच हजाराला कांहीं कमी.

## ॥ समास अठरावा ॥



॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागां समर्थसदनीं माहापुरुषभोजनें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां समर्थाचीं गाथाचरित्रें वर्तमानें । सर्वसंग्रहें ऐकावीं ॥ १ ॥
समर्थाचें येके ठाईं स्नानसंध्यावंदन। येके ठाईं फळाहार अथवा भोजन।
येके ठाईं उदकप्राशन तांबुलचर्वण । विश्रांति शयन येके ठाईं ॥२॥
समर्थासी माध्यान्हीं निद्रा कांहीं । रात्रीं निद्रा कचित नाहीं ।
आह्मी निद्रेसी जातों ह्मणोनि पाही । लोकांसी आज्ञापिती जावया ॥३
समर्थासी कोण्ही येकें पंडितें छळिलें। अर्भकपणें निद्रास्थळ निर्बंद केलें।
समर्थें अंतर्धान पाऊनि त्यासी दर्शन दिधलें ।
क्षमारूपें कृष्णातीरीं स्वानंदें ॥ ४ ॥
समर्थगुरुदेवें कृष्णातीरीं । रामचंद्रनामा तपस्वी ऐकिला सिद्धेश्वरीं ।
समर्थें तयासी दर्शन दिधलें कृपेंकरी । वाल्मीकग्रामीं अरुणोदईं ॥५॥
समर्थें शामा सेवितां कोण्ही येक देखिला ।
शुद्ध संप्रदायें विशाद वाटला ।
समर्थें कटिप्रदेशीं सन्मानिला । वेत्रपाणी करूनिया ॥ ६ ॥
समर्थें हरिभक्त गायक वेशासंगीं देखिले ।
मग हरिकीर्तनप्रसंगीं तीन वर्षें वर्जिले ।
त्राहि त्राहि ह्मणोनि शरण आले । मग पुनीत केले चरणतीर्थें ॥७॥

---

१ गाथा=कथा, गोष्टी. २ ह्या व पुढल्या समासांत श्रीसमर्थांच्या ज्या गोष्टी दिल्या आहेत, त्यांत बऱ्या च अश्रुतपूर्व असल्यामुळें हे दोन समास महत्त्वाचे आहेत. ३ श्रीसमर्थ दुपारीं थोडेसें निजत, रात्रीं बहुधा निजत नसत. ४ श्यामा=तरुण स्त्री. ५ त्याच्या या दुर्वर्तनाबद्दल समर्थांनीं त्याला छडीनें मारिलें, असें दिसतें. ६ रक्ष रक्ष.

समर्थें उन्मत्त यवनासी दर्शन दिल्हें । उन्मत्त यवनें नाहीं जाणितलें ।
उन्मत्त द्रव्य उतरतां त्राहि त्राहि बोलिलें ।
मग उन्मत्त द्रव्य त्यागिलें समर्थकृपें ॥ ८ ॥
समर्थासी कोण्ही येक अविद्येनें विषमदृष्टि पाहिलें ।
आत्मभर्तारार्चें ब्रह्मसामर्थ्य गेलें ।
त्राहि त्राहि ह्मणोनि मनीं समर्थासी चिंतिलें ।
मग यथापूर्व जालें श्रीगुरुकृपें ॥ ९ ॥
समर्थदर्शनासी कुटिळबुद्धि आले । समर्थ निद्रिस्थ उठोनि पळाले ।
मार्गें पुत्राचें तेणें विशम समाचार ऐकिले ।
ह्मणती त्राहि त्राहि रे सर्वज्ञा ॥ १० ॥
समर्थासी कपटबुद्धीनें आमंत्रण दिधलें ।
समर्थें सजगुर्‍यांचें धोपेंट करविलें ।
दों मुहूर्तें लिहिलें घरासी आलें । सीघ्रें गंतव्य केलें पाहिजे ॥ ११ ॥
समर्थाचा शरणागत विजयपुरीं । ब्राह्मणाच्या येकांत पूजेच्या कैदा धरी ।
समर्थ ह्मणती रे तूं अनाधिकारी व्यापारी ।
ब्राह्मणास दंडितील यातिगुरु ॥ १२ ॥
समर्थप्रांतीं श्रीगिरिमठीचे देवभारति आले ।
तेणें ब्राह्मणवर्ण ब्रह्मत्वें ब्रह्ममार्गें दंडिले ।
दीक्षागुरु ब्राह्मण्य रक्षिते जाले । पूर्वगुरुत्व स्मरोनि आले दर्शनासी ॥ १३ ॥
समर्थ येकांतीं ह्मणती भलें बापा परिव्रजन केलें ।
स्वामि प्रारब्धीं कांहीं ऐसें चि होतें लिहिलें ।
समर्थें कौतुकें आत्मआलिंगन दिधलें । ह्मणती भलें केलें कृष्णातीरीं ॥

---

१ सजगुरा=बाजरी २ (?) साधें जेवण. ३ पत्र. ४ " सीघ्रपंतीं " बाडांत. ५ समर्थांचा कोणी ब्राह्मणेतर अत एव अनधिकारी शिष्य ब्राह्मणाकडून बलात्कारानें पूजा घेऊं लागला, तेव्हां याबद्दल ब्राह्मणांस त्यांचे आचार्य दंड करतील असें सांगून समर्थांनीं शिष्यास असला अव्यापारेषु व्यापार न करण्याविषयीं सांगितलें, असें दिसतें. ६ संन्यास.

समर्थराजांगणीच्या रंगमाळा । कोण्हीयेक वैदिक छळक मोडितां जाला ।
वेत्रधारकें दोनी वरषें विनविला । मग उचलून नेला यात्रेबाहिरी ॥ १५

समर्थ पुसती ब्राह्मणाकारणें । देवा रंगमाळा तुह्मी कां जी पाईं पुसणें ।
यद्दृष्टं तन्नष्टं ब्राह्मण ह्मणे ।
देवा आवाहनीं च विसर्जन करणें उचित नोहे ॥ १६ ॥

समर्थमर्यादा पाळिती सर्वहि भूसुर । येखादा कळयुगीं विरोधभक्त असुर ।
ब्राह्मणयज्ञें पोसती सर्व सुर । स्वाहा स्वधा ब्राह्मणमंत्रें ॥ १७ ॥

समर्थें अफदागिरिखालयें येक श्रीमंत देखिला ।
शीतोष्णसुखदुःखेषु श्लोकार्थ पाहिला । परम अनुग्रहें श्रीमुखोंवर हाला ।
मानापमान तेणें न धरिला धरिलें गुरुचरण ॥ १८ ॥

समर्थ ह्मणती रे तुज दशगुणें वैभवें । अचळ दिधलीं श्रीराघवें ।
श्रीमंत ह्मणे जी श्रीगुरुदेवें । आत्मस्थितीसी रक्षावें संपत्तीमाजी ॥ १९

समर्थें कृपें आत्मस्थिति राखिली । नाना भाग्यवैभवें भोगविलीं ।
श्रीमंतासी पुढें विरागबुद्धि जाली । निस्पृहदीक्षा मी घेईन ह्मणे ॥ २० ॥

समर्थासी आकरा खंड्या गूळ नवसिला ।
वैराग्य भाग्य व्हावया आपणाला ।
प्रसंगें शिवराजें किल्लेहायचा सुबा तँगीर केला ।
मग दीक्षा घेतली समर्थाची ॥ २१ ॥

समर्थदर्शनासी मऱ्हाटे सरदार आले । विजयादशमीसी समर्थ जोहारिले ।
सभोंवते कंडेपट्टे साज घोडे उभे केले ।
ज्यावरी स्वार जाले त्याचा भाग्योदय ॥ २२ ॥

---

१ रंगमाला तुह्मी पायानें कां मोडल्या असें त्या ब्राह्मणास विचारतां तो यद्दृष्टं तन्नष्टं असला वेदांत सांगूं लागला, तेव्हां त्यास सगुणीं च निर्गुण आणणें बरें नव्हे, असा बोध केला. २ भूदेव, ब्राह्मण. ३ समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः । शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ भ. गीता $\frac{१२}{१८}$. ४ तोंडांत मारिली ( ? ). ५ अनेक किल्ल्यांचा. हाय हा फारशी प्रत्यय असून नामाला अनेकवचनार्थी लावतात, जसे जिल्हेहाय, महालहाय. ६ सुमा, सुभेदार. ७ कामावरून दूर, बडतर्फ. ८ नमस्कारिले. ९ कंडापट्टा=घोड्याच्या मानेवर घालण्याचे दागिने.

समर्थांचा प्रतिवर्षी शकुन घेती । विजयादशमीसी दर्शनासी येती ।
ज्याचा अभ्युदय त्याच्या अश्वावरी स्वार होती ।
भोंवते चालती सरदार ॥ २३ ॥
समर्थे चांफळीं पर्वतआवर्त[1] देखिले । कितेक समर्थापुढें लोक बैसले ।
समर्थे मानसपूजायोग बोलूनि दाविलें । ब्रह्मांड उभें करूनियां ॥२४॥
समर्थे येक वेळे चांफळीं । मोठी वाघाटीची जाळी देखिली ।
समर्थ ह्मणती हे मूळमायेची जाळी । मूळमाया मुळीं परब्रह्म स्वयें ॥२५
समर्थे स्वहस्तें आंबे लाविले । सफळ मंचकावरी लोळों लागले ।
समर्थअंगसंगें मोठे जाले । त्यासी भीड मर्यादा कैसी न आली ॥२६
समर्थे एकदां ग्रंथशोधनश्रवणीं । मक्षिका गेली देखिली ग्रंथावरूनि ।
अमर्यादा जाली ह्मणूनि । ग्रंथ गुरुदेवें प्रासादविला[2] ॥ २७ ॥
समर्थे एकदां सेवाप्रेम दाविलें केवळ ।
कोण्हासी न कळतां अरुणोदईं निर्मळ ।
स्वहस्तें झाडोनि काढिलें सभास्थळ । दुशाला संमार्जनी करूनियां॥२८
समर्थ ह्मणती रे जो देवद्वार झाडी । तो नर चढे वैकुंठ पाहाडीं ।
थोरपणें धरितील तें ज्ञातीं वेडीं । सर्वां सैर्वत्र[3] हें सांगितलें ॥ २९ ॥
समर्थग्रंथ मंचकावरी कोण्हीयेकें घेतला ।
महंत थोरपणें वाचित बैसला ।
अकस्मात वेणाबाईनें देखोनि साष्टांग नमस्कार घातला ।
समर्थ मंचकीं दासबोधरूपें ह्मणोनियां[4] ॥ ३० ॥
समर्थासी गुरुवाक्यअमर्यादावर्तमान कळलें ।
समर्थे महंतासी बरें सन्मानिलें ।
वेणाबाईनें समर्थासी विनविलें ।
स्वामि गुरुवाक्यमर्यादा लोकां कळेना ॥ ३१ ॥

---

१ आवर्त=भोंवरा. २ (?) प्रसाद ह्मणून दुसऱ्याला दिला. पण या गोष्टीचें तात्पर्य लक्षांत येत नाहीं. ३ परंपरेनें, एकानें दुसऱ्याला. ४ यावरून आपण श्रीग्रन्थांना किती जपावें, कोठें ठेवावें व कसें वाचावें याचा बोध होतो.

समर्थासी उपवनीं किंचित विशाद आला ।
लोक दर्शनासी ठाईं ठाईं तुंबला ।
तव तुंबीफळें[1]किन्नरीसीं भैरवजोगी येक आला ।
येक्या पांयांवरी ठाकला समर्थापुढें ॥ ३२ ॥

समर्थें अपूर्व येक पद भैरवमुखें ऐकतां । विशाद कौतुकें टाकिला तत्वता ।
शत होनाची कसबी सुवर्णचादर सर्वथा । भैरवजोगीयावरी टाकिली॥

समर्थासी कोण्ही येक ह्मणे हे विळासमूर्ति शोभली ।
समर्थें क्षण येक गोष्टी मनीं ठेविली ।
येका रंकासाठीं बुडतां मांडवीनदींत उडी घातली ।
उदंबरग्रामीं[2] निघाले कृष्णासंगमीं[3] ॥ ३४ ॥

समर्थाच्या निस्पृहांसी यवन छळक । नागठाणीं भिक्षाटणीं छळी देख ।
समर्थ ऐकोनि वनीं पळती निशंक । मागें हनुमान जाळिती यवनगृहें ॥

समर्थें आकार[4]पूर्वक यवनासी मारविलें । मग चांफळक्षेत्र उभें केलें ।
श्रीतुळजामाउलीसी[5] संस्थापिलें । जाउलीपर्वतीं प्रतापगडीं ॥ ३६ ॥

समर्थआज्ञा चांफळीं प्रभावें । मोहछाहीं सगुणप्रतापकीर्तन करावें ।
संत सज्जन निर्गुणरूप स्वभावें । आत्माराम निरंजन जनीं ॥ ३७ ॥

समर्थ निरंजन येकांतीं बैसले ।
सेवकें वर्जितां कोण्ही येक महंत धडधडित आले ।
समर्थ दर्शनीं सिंह्यस्थविर्धि[7] जाले । यथानुक्रमें सकळांसी ॥ ३८ ॥

---

१ तुंबीफळ=कडु भोपळा. त्याची केलेली किनरी घेऊन. २ "उदुंबर" घाडांत. उंब्रजगांवीं. ३ मांड नदी चाफळखोऱ्यांतून निघून उंब्रजजवळ कृष्णेला मिळते. ४ आ आहे पूर्वीं ज्याच्या अशा यवनासी, ह्मणजे आयवनासी, ह्मणजे यच्चयावत् यवनासी. ५ तुळजापुरच्या देवीची स्थापना प्रतापगडावर श्रीसमर्थांनीं केली. तुळजापुरीची माता । प्रतापें चि प्रगटली ॥. ६ सिंहावर बसल्याप्रमाणें. ७ (?) "श्रीसमर्थ एकांतांत असतां तिकडे जाऊं नका असें सेवकांनीं सांगितलें असून हि कोणी महंत तसेंच न जुमानतां आंत गेले तों सर्वांना समर्थ सिंहावर बसल्याप्रमाणें दिसले," असा अर्थ करावा कीं "समर्थांना पाहून सर्वांचे सिंहस्थविधि झाले" असा कांहीं अर्थ आहे ?

समर्थासी प्रपंचिंकक्रुति[1] श्रीमंडप मागती।
श्रीराम कोठें येक नाहीं प्रपंची ह्मणती।
आग्रहबळें नेऊनि सोडोनि जव पाहती।
तव श्रीरामस्वसुर[2] ठाईं ठाईं विळासलें[3] ॥ ३९ ॥
समर्थासी आग्रहें विवाहमंडपीं बैसविलें।
ब्रह्मचर्यापुढें नाचणी ध्यान मज्यालसींतें[4] मांडिलें।
समर्थे साहा प्रहर अधोदृष्टी आसन घातलें।
कवतुकें फजीत केलें प्रपंचीक जन ॥ ४० ॥
समर्थापुढें बहुमोल वस्त्रें आणूनि मांडिलीं।
समर्थे बादली चादरेंत पिकलीं करवंदें बांधिलीं।
पोरें मेळऊनि चादर देऊनि खोबरीं वांटिलीं।
मग समर्थे काय आज्ञा केली हो ॥ ४१ ॥
समर्थ ह्मणताती लेंकुरें हो आइका।
आक्करा शत खडे माझ्या आंगावरी टाका।
येक्या लेंकुराच्या दृष्टि श्रीराममूर्ति पडली देखा।
पीतांबरें खडे वारितसे ॥ ४२ ॥
समर्थभाळीं येक कंकर किंचित लागला।
श्रीरामें साक्षसि लोकीं दाविला।
पंचाननें नखें कपाळीं वोरखंडा केला। चंद्रगिरीच्या गुहांतरीं ॥४३॥
समर्थदेवें कृष्णातीरीं। नाना वैराग्यें केलीं गिरिकंधरीं।
धर्मस्थापना चराचरीं। सर्वां सर्वत्र सांभाळिली ॥ ४४ ॥
समर्थे जयराम योगी शांत परीक्षिले। मानससरोवरीं आसनीं बैसविले।
दोनी मुहूर्तीं बाहेरी बोलाविले। जय जय राम जाले सर्वत्रीं ॥ ४५ ॥

---

१ प्रपंचिक आहे कृति ज्यांची असे. २ श्रीरामाचा श्वशुर ह्मणजे अग्नि. धन्य धन्य हा वैश्वानरु। होये रघुनाथाचा श्वशुरु। विश्वव्यापक विश्वंभरु। पिता जानकीचा ॥ १६$\frac{५}{१}$. ३ श्रीरामाच्या मंडपाचा उपयोग प्रपंची लोकांनीं हट्टानें प्रपंचकार्याकडे केला ह्मणून त्यास आग लागली, असा भावार्थ दिसतो. ४ सभेंत.

समर्थासी जयरामेंविण कांहीं । नाना आम्रफळें सेवणें नाहीं ।
गुरुभक्त शांत योगी जाणूनि पांहीं । प्रतिवर्षीं दर्शनीं प्रेमा जगद्गुरु ॥
समर्थदर्शनासी जयराम योगी येती ।
लंबोदर देखोनि सूक्ष्ममार्गें कौतुकें बोलाविती ।
जयरामा स्थूळदेही संत हे कैसे तरती ।
राघोबा तारक ब्रह्म तारिसील तूं निर्धारें ॥ ४७ ॥
समर्थें जयरामयोगीयाचा मोहछह वाढविला ।
प्रथम वडगावीं समर्थें रथ काढविला ।
ग्रामपक्कान्नमार्ग मोडविला । सिद्धान्न स्वयंपाक करविले ॥ ४८ ॥
समर्थें पांडुरंगीं कीर्तनदिवस न घेतले ।
द्विभुज पांडुरंग श्रीरामरूपें संतसज्जन सर्व देखिले ।
सर्व हि कीर्तनदिवस आपुले चि लेखिले । ब्रह्मांड पंढरी वाळुवंट धरणी[2] ॥
समर्थश्रीगुरुस्वामीच्या पूर्ण मनोरथीं । भरतखंडीं चालिल्या दोनि चक्रवीथि[3] ।
भीमरथी दुसरी भागीरथी । जेथें हारि हर तारक ब्रह्ममूर्ति दक्षिणोत्तरें[4] ॥
समर्थासी श्रीपांडुरंगीचे हरिदास ह्मणती ।
स्वामि पांडुरंगप्रसादें आह्मासी संतति संपति ।
स्वामीपासीं हे निस्पृह लोक दिसती ।
यासीं काय सुख हें सांगावें ॥ ५१ ॥

---

१ यावरून वडगांवकर जयरामस्वामी शरीरानें स्थूल होते, असें दिसतें. त्यांना समर्थांनीं सूक्ष्म मार्गानें बोलाविलें, अर्थात् जयरामांना त्या मार्गानें जातां येईना, तेव्हां समर्थ ह्मणतात, जयरामा, तुमच्यासारखे स्थूळदेही संत कसें तरणार? त्यावर जयराम ह्मणाले, श्रीराम तारक ब्रह्म आहे, (व त्यांचे आपण दास आहां,) तेव्हां आपण च आह्मांस ताराल. २ सारें ब्रह्मांड ही च पंढरी व धरणी ह्मणजे पृथ्वी हें च चंद्रभागेचें वाळुवंट असें मानून केवळ पंढरीस च श्रीसमर्थांनीं स्वतःला कीर्तनाचे दिवस नेमून घेतले नाहींत. ३ चक्र=चाक व वीथि=मार्ग. ४ श्रीसमर्थांचा मनोरूपी रथ या भरतखंडांत दोन मार्गांनीं गेला: दक्षिणेस जेथें विष्णूचें माहात्म्य विशेष आहे अशा भीमानदीच्या मार्गानें व उत्तरेस ज्या मार्गावर शंकराचें माहात्म्य विशेष आहे अशा भागीरथीच्या मार्गानें. तात्पर्य, श्रीसमर्थांची उपासना एकदेशी नसून सर्वव्यापी आहे.

समर्थे वेणाबाईमुखें उत्तर देवविलें। गोसावी स्वता पाहिजे हे अनुभविलें।
जेहिं प्रपंचिक सुख मानूनि घेतलें। त्यासी हें न कळलें निजवर्म ॥५२
समर्थाची ज्ञान वैराग्य संपत्ति। शिष्य संप्रदाई वंशसंतति[1]।
कडेकपाटीं भाग्यवैभवें लुटविती। संत जाणती सर्वत्र हो ॥ ५३ ॥
समर्थमुखीचें वाक्य घडोनि येईल।
कोण्ही येक ब्रह्मनिष्ठ धर्मिष्ठ राजा होईल।
समस्त ग्रंथ पंथ शोधूनि पाहील। समर्थदेवें सांगितलें ॥ ५४ ॥
समर्थकर्णीं भक्तिप्रेममुद्रा। समर्थकर्णीं मुक्तमाळामुद्रा।
समर्थकर्णीं अनंत मुद्रा। अनंत प्रसाद देताती ॥ ५५ ॥
समर्थ वैराग्यबोधें विचरती। असंप्रज्ञात[2] समाधि स्थिति।
पाई कर्म कंटकरूपीं रुपती। शरण येती समर्था ॥ ५६ ॥
समर्थचरणीं भक्तिनवनीतलेपन। सहज चि अभक्तकंटकविसर्जन।
नाना श्रीगुरुपदींचा संस्कार जाला जाण।
निर्विकल्प कंटक सृष्टीवरी ॥ ५७ ॥
समर्थ मंचकीं पहुडती। दंशी जीव तात्काळ पळती।
सज्जनासी दुर्ज्जन प्राणी जे छळिती। त्यासी सिकविती प्रबोधें ॥५८॥
समर्थमंचकशैय्येसी कृष्णास्नान। साक्षात्कारें होतसे जाण।
समर्थअंगराग कृष्णा इछी परिपूर्ण। गंधधूसरीं सुमनमाळीं ॥ ५९ ॥
समर्थदेवें ब्रह्मारण्यें धरिलीं। ब्राह्मण्यबाळकें भिक्षेसी धाडिलीं।
अयाचित अमान्यें[3] उदंड आलीं। सामान्य[4] मानिलीं समर्थे ॥ ६० ॥
समर्थ नाना आम्रफळें भक्षिती। नाना शेषफळें मंचकातळीं रक्षिती।
नाना निस्पृह ग्रामांतरें भिक्षा करूनि येती। सायंकाळीं गुरुदर्शना ॥
समर्थसान्निधीं कथाकीर्तनें होती। उदास निस्पृह स्वइछा विचरती।
माहापुरुष कोणाच्या वाट्यास न येती। ज्यांसी आतिथ्यें घडती ते धन्य ॥

---

१ ज्ञान आणि वैराग्य ही च त्यांची संपत्ति व शिष्यसंप्रदाय ही च संतति होय. २ ज्या निर्बीज समाधींत सर्व वृत्तींचा लय होऊन आत्मा केवळ आपल्या स्वरूपाचे ठिकाणीं लीन असतो तीस असंप्रज्ञात समाधि ह्मणतात. ३ अम+अन्न= अमान्न=सिधा. ४ सामान्य भिक्षा मान्य करिती । सकळ प्राणी ॥ १४$\frac{3}{13}$

समर्थें महंत उदास परीक्षिले । दोनि प्रहर दासविहिरे उपसविले ।
केवळ माध्यान्हीं भिक्षेसी ग्रामांतरें धाडिले । वैशाखमासीं उष्णकाळीं ॥
समर्थ ह्मणती माझीं लेकुरें भुकेलीं । निस्पृह उदास भिक्षेसी चालिलीं ।
करुणासिंधुनि वळोनि आणिलीं । या रे पर्वतीं च भिक्षा करा रे ॥६४
समर्थें पर्वतपाषाण उलथविले । सिद्ध सामे सिधे काढिले ।
भोजनपदार्थमात्र पर्वतें दिधले । सामर्थ्यकौतुक प्रभूचें ॥ ६५ ॥
एवं समर्थगाथाचरित्रवर्तमान । सेवकें केलें निवेदन ।
पुढें हें चि पुसतील संतसज्जन । वेणीगिरिधर सांगतील ॥ ६६ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ६७ ॥
समास आठरावा ॥ १८ ॥ जय जय राम ॥

---

## ॥ समास एकोणिसावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्टकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

मागा समर्थगाथाचरित्रवर्तमानें । सेवकें केलीं निवेदनें ।
आतां तें चि पुसिलीं संतसज्जनें । संतसेवेसी निवेदिलीं ॥ १ ॥
समर्थें बाळपिशाच्यउन्मत्तता केली । कोण्हासी हि न वचे अनुमानली ।
संतसज्जनासी अनुभवासी आली । यथानुक्रमें ऐका जी ॥ २ ॥
समर्थें बाळरुदनीं रुदन केलें । क्षुधिस्थ बाळकीं बाळकरूप दाविलें ।
लोक ह्मणती रे समर्थासी क्षुधेनें व्यापिलें । शुद्ध स्वयंपाक सिद्ध करा रे ॥

---

१ मोठाले पाणदुरे; श्रीसज्जनगडावर पाण्याचीं जीं टांकीं आहेत तीं.
२ बाल, पिशाच आणि उन्मत्त अशा तीन अवस्था आत्मज्ञानी पुरुषाच्या असतात. साधु केव्हां बालाप्रमाणें निर्मल, निष्कपट दिसतात, केव्हां पिशाच्याप्रमाणें त्यांची कृति दिसून पहाणाराला त्यांचा अदमास च होत नाहीं व केव्हां केव्हां उन्मत्ताप्रमाणें ते आपल्या च ठिकाणीं रमतात.

समर्थें पिशाच्यवैराग्य अत्यंत केलें । कोण्हासी हि न वचे अनुमानकें ।
श्रीरघुनाथेंचि येक गिरिकंधरीं रक्षिलें । पूर्ण व्यापक ह्मणोनियां ॥ ४ ॥
समर्थें उन्मत्तता अत्यंत दाखविली । अनंत ईश्वरमाया दृष्टीसी नाणिली।
नाना मतमतांतरें हारविलीं । शुद्धविचारें परमार्थें ॥ ५ ॥
समर्थें हनुमानसामर्थ्य किंचित दाखविलें ।
समुद्रीं जहाज बुडतां जाऊनि धरिलें ।
आंग पुसावया धोत्र आणविलें ।
तेव्हां संतसज्जनासी कळलें हे जगदोद्धारी ॥ ६ ॥
समर्थ तारक ब्रह्म निश्चिती । कलि कल्मर्ष[1] पातकी उद्धरिती ।
चतुरो ब्राह्मणो योगी पुराणें गर्जती । श्रीहनुमंत सहस्रनामी ॥ ७ ॥
समर्थ नाना धर्मस्थापना करिती । कर्म उपासना ध्यानमूर्ति ।
ज्ञान विज्ञान ब्रह्म अमूर्ति । जयंत्यापर्वीं तत्पर ॥ ८ ॥
समर्थें चांफळीं श्रीरामनौमीसी निराहार वर्जिले ।
फळाहार उपाहार लोकीं करविले । मुख्य ब्रह्मसंतर्पणीं योग चालविले।
उपवास उपाहास वर्जूनियां ॥ ९ ॥
समर्थें नवरात्रीं तांबुल वर्जिलें । देव द्विजअर्चनीं मात्र देवविलें ।
प्राणसंरक्षणीं शातातप मुनि तैलपक्क[2] बोलिले ।
प्राणोत्क्रमण न हे तांबुलेविणें[3] ॥ १० ॥
समर्थ गुप्तेश्वर कथाकीर्तनीं परामृश घेती ।
धृपदे ताळधारी नाहीं त्यासी अनकूळ करिती ।
व्यस्ताव्यस्त गातां बोलतां सुशब्दें सन्मानिती ।
भले संत महंत हो गातसा ह्मणोनियां ॥ ११ ॥
समर्थ गुप्तेश्वर तों दृष्टि पडेतिना । सन्मान शब्द श्रवणीं पडती नाना ।
अमानुषी महिमा विचित्र कळेचिना। स्वामि सर्वांतर्याम निर्धारें ॥ १२ ॥

---

१ पाप. २ शातातप मुनींनीं आपल्या स्मृतींत असें सांगितलें आहे कीं, प्राण जात च असला तर शूद्राकडिल हि तेलांत तळून पक्क केलेले पदार्थ भक्षण करावें. ३ पण तसा कांहीं प्राण नवरात्रांत विडा न खाल्ला तर जात नाहीं.

समर्थ सज्जनपर्वतीं असतां । चाफळीं यात्रेंत चाले सर्व सत्ता ।
लक्षानलक्ष यात्रा मिळतां । येकात्मता पूर्ण निर्धारें ॥ १३ ॥

समर्थावरी रंगमूर्ति रंगमाळेवरूनि रुसोनि चालिली ।
समर्थें पंचक्रोशीतूनि बळें चि धरूनि आणिली ।
रंगशिळेसी कथारंगप्रसंगीं उभी केली । जाईल कोठें समर्थापुढें ॥१४

समर्थस्थळीं चाफळीं ग्रामस्थीं कर मागितला ।
शिवराजें ऐकतां जीवघात आरंभिला ।
प्राणजीचा प्राण रक्षूनि समर्थें अभयंकर दिधला ।
सेवाभाग्य दिधलें चिरकाळें ॥ १५ ॥

समर्थ आज्ञा पुसे शिवराजा । श्रीरघुनाथदेवाल्य मी बांधेन वोजा ।
समर्थ ह्मणती शिष्यसमुदाय संप्रदाय माझा ।
देवाल्यें करवीन अनंत हस्तें ॥ १६ ॥

समर्थें देवाल्यें केलीं सामान्य हस्तें । सामान्यें[1] मान्य केलीं समस्तें ।
पुढें पुढें कार्यें करितील प्रशस्तें । अनंतहस्ति समर्थ ॥ १७ ॥

समर्थें नाना सिद्धिसामर्थ्यें विघ्नें निवारिलीं ।
वेणाबाईची अनशन तपें वर्जिलीं ।
आपण येऊनि निजपंगति पारणीं करविलीं । गुरुसंप्रदाईं अंतराय[2] वारिले ॥

समर्थासी कोण्ही येकें वाघाटीफळाचे[3] तुरे आणिले ।
समर्थें ब्राह्मणाचे अंतर्भाव जाणितले ।
सवाहात तुज्यासी सवाशत होन दिधले ।
व्रतबंध विवाह करविले पुत्राचे ॥ १९ ॥

समर्थासी संत महंत प्रश्न करिती ।
प्राकृत ग्रंथ काळांतरें कोठें जी राहती ।
अहो आपुलाले आराध्यदैवतीं लीन ग्रंथ असती ।
यथापूर्व प्रगटती युगांतरें ॥ २० ॥

---

१ सामान्य भिक्षा. २ विघ्नें. ३ एक प्रकारची रानभाजी.

समर्थआराध्यदैवत विचित्र करणी ।
कोण्हीयेक जटिळें दाविली दिवसा रजनी ।
हनुमंतें भ्रांति काढोनि तत्क्षणीं । निस्पृह भिक्षाटणी निभ्रम केला ॥
समर्थ हनुमानस्वरूप वायोरूप निर्धारें । जातां तीर धरिती मागिल्या करें ।
समुद्रीं जहाज चाले जेवी त्वरें । तेवी सत्वरें श्रीसमर्थगमन ॥ २२ ॥
समर्थासी शिष्य पुसती निर्धारें । संत साधु ब्रह्मरूप केवी अवतारें ।
अरे अवतार धरिजे सर्वेश्वरें । मायापूर्वपक्ष निरसावया ॥ २३ ॥
समर्थ सद्गुरु केवळ परब्रह्म । निर्मळ निश्चळ विमळ ब्रह्म ।
ईश्वरत्वीं कांहीं जन्मकर्म । मायोपाधि मिथ्यत्वें ॥ २४ ॥
समर्थासी पुसती कोण्हीयेक शिष्य ।
आह्मी कां संसारा न येणें ह्मणती माहा पुरुष ।
अरे भक्तिमार्गीचा भक्तिउत्कर्ष । पूर्वपक्ष साधु बोलिले ॥ २५ ॥
समर्थासी पुसिलें लडिवाळें उत्तरीं । आह्मी पुन्हा जन्मा न यो किं संसारीं ।
आरे आपुली आत्मभावना निर्धारीं । भक्तितात्पर्यें येणें न येणें ॥२६॥
समर्थें निरसिलें संसरणदुख । जन्ममरण हें दुखदायक ।
नवविधा भक्तीचें घ्यावया सुख । सुखें येतील तरि योतु कोण्ही ॥२७
समर्थें ये चि जन्मीं या चि डोळां । दाविला भुक्तिमुक्तीचा सोहळा ।
आतां जन्ममरण वेळोवेळां । दाऊं नका जी विचारें ॥ २८ ॥
समर्थासी पुसती संतमूर्ति । स्वजन संप्रदाई कळह केवी करिती ।
अहो कळहमिसें हे माया वीट आणिती । सत्संगतिरोचनार्थें ॥ २९ ॥
समर्थासी लोक भजती निःकाम । स्वजन भांडती कां सकाम ।
अहो देव दैत्य हे वर्मावर्म । आशापाशें विरोधी ॥ ३० ॥
समर्थं ह्मणती असतां येकत्रें । सुखें विलासें भोगोत अन्नवस्त्रें ।
विभागें निघाल्या स्वतंत्रें । देवासी अर्धें तदर्ध सेवां ॥ ३१ ॥

---

१ मारुति. २ ह्या आज्ञेकडे विद्यमान मठपतींनीं व रामदासीयांनीं लक्ष दिलें पाहिजे. विभक्त व्हावयाचे वेळीं अर्धा हिस्सा देवाचा निराळा राखून बाकीच्या अर्ध्यांत सर्वांनीं यथाशास्त्र हिस्से पाडावे.

समर्थ ह्मणती सर्व वैभव देवाचें । निस्पृह कोरान्न उपजीविकेचें ।
तथापि अर्ध्या विभागें स्वजनाचें । समाधान राखावें ॥ ३२ ॥
समर्थदेवें कळह निरसिले । समर्थ आज्ञे निर्द्वंद्व राहिले ।
समर्थअवज्ञे अर्थ स्वार्थ घडले । अनर्थीं पडले परमार्थी ॥ ३३ ॥
समर्थ ह्मणती रे मुख्य मातापिता । मग अर्ध्या विभागांत बंधु तत्वता ।
तैसी च गुरुपद देवपद कथा । अर्ध्या विभागें स्वजनभोगु ॥ ३४ ॥
समर्थ ज्ञातेपणासीं न बोलती । नेणतपणीं अत्यंत बोलती ।
जाणोनि नेणते सिद्ध पाईं लागती । ज्ञान विज्ञान सारूनियां ॥ ३५ ॥
समर्थ प्रथम दर्शनीं शनै शनै बोधें । गमनकाळीं अत्यंत प्रबोधें ।
सलगी देऊनि लोक लाविताती वेधें ।
हातासी आलिया शिष्य कसि[3]ताती ॥ ३६ ॥
समर्थासी लोक पुसती जी गुरुदेवा । देहीं देहांतीं जोतिर्लयो कैसा करावा ।
जाणीव जगजोतीचा स्वसंवेद्य मी विसांवा । सर्वधीसाक्षिभूत गीर्तार्थे ॥
समर्थासी पुसिलें सेवक जनीं । वृत्तिलयो केवी जी जितां मरणीं ।
अरे कल्पनावृत्ति मिथ्यत्वें निर्गुणीं । निर्विकल्प आपणी आपणत्वें ॥ ३८
समर्थे गुरुआज्ञे शिष्य सेवे परीक्षिले ।
लवकरी उदकपात्र घ्या रे बोलिले ।
वेणाबाईमठीं काशीराज उदक घेऊनि धांविले ।
अग्रोदक देवार्चनाचें ॥ ३९ ॥
समर्थ ह्मणताती देवगृहीं लेंकुरें सर्वब्रह्मी जालीं ।
अग्रोदकें सुस्नातें बहिर्भूमि चालविली ।
कर्म उपासना मर्यादा राहिली । वेणीसंप्रदाईं निर्धारें ॥ ४० ॥

---

१ त्यांतल्यात्यांत जे निःसंग, ब्रह्मचारी शिष्य असतील त्यांनीं कोरडी भिक्षा मागून पोट भरावें व इतर सर्व वैभव श्रीरामार्पण करावें. तथापि स्वबांधव नाखुष होत असतील तर निमे उत्पन्न त्यांना द्यावें. २ प्राप्तीचा अर्धा वाटा देवाचा किंवा गुरूचा व अर्धा स्वबांधवांचा. ३ परीक्षा करितात. ४ गुरुगीतेंतील सद्गुरुस्तवनपर "ब्रह्मानंदं परमसुखदं" इत्यादि श्लोकाला अनुसरून. ५ न समजतां, सर्व ब्रह्म च आहे, असें नुसतें तोंडानें बोलून एकंकार करणारे आचारभ्रष्ट लोक.

समर्थासी वेणाबाई देताती लडिवाळपणें उत्तरें ।
स्वामि समर्थकृपेचीं सर्वज्ञ लेकुरें ।
कर्म उपासना रक्षिती आदरें । गुरुभक्तियोगें गुरुआज्ञें ॥ ४१ ॥
समर्थआज्ञे विलंबन न व्हावें । अग्रोदक उदंड येईल स्वभावें ।
सुस्नातिक अग्रोदक तें चि तें सद्भावें । गुरदेवकार्यीं लागलें ॥ ४२ ॥
समर्थें ग्रंथीं च केला निर्धारु । जैसा देव तैसा गुरु[1] ।
पाहतां देव मायोपाधि सर्वेश्वरु । श्रीगुरु मातातीत परब्रह्म ॥ ४३ ॥
समर्थें निरोपिलें ग्रंथांतरीं । गुरुदेवासीं बराबरी करी तो दुराचारी[2] ।
ह्मणोनि श्रीगुरुसमर्थमहिमा अधिक निर्धारीं ।
गुरुदेवेसी बराबरी घडेना ॥ ४४ ॥
समर्थें आनंदमूर्तीचा देखिला प्रेमा । गुरुनामीं निष्ठा कृष्णदास जयरामा ।
रथोछाह समर्थें करविला वाढविला महिमा । समर्थस्थितीसी मानवले ॥
समर्थें वृत्तांत असेल ऐकिला । कृष्णनामांकित कोण्ही येक अंतेज आला ।
कृष्णदासजयरामें आधीं भोजनीं तृप्त केला ।
मग वृंदावनीं आपण घेतला नैवेद्य ॥ ४६ ॥
समर्थें कौतुक असेल ऐकिलें । गुरुदास्यीं वृषभशवासी संकीर्तनीं नेलें ।
कृष्णातीरीं अश्ववाहनासी निक्षेपिलें । नाना कीर्तन उछाहें करूनियां ॥
समर्थकृपेच्या संतमूर्ति । गुरुभक्तियोगें त्यांच्या कीर्ति ।
समर्थापासीं संपादिती सत्कीर्ति । दासबोधग्रंथश्रवणार्थें ॥ ४८ ॥
समर्थआज्ञे विलंब न केले । कल्याण नाम्नें देहसंकल्प घातलें ।
वृक्षपातें कल्याणनाम पावलें । श्रीगुरुदास्यीं वचनार्थें ॥ ४९ ॥
समर्थें श्रीरामकार्जीं दिव्य देह समर्पिलें । श्रीरामदास्य श्रीगुरुरूपें केलें ।
आधीं केलें मग सांगितलें[4] । दासबोधग्रंथार्थें ॥ ५० ॥

---

१ जैसा देव तैसा गुरु । शास्त्रीं बोलिला हा विचारु ॥ ४ $\frac{६}{३२}$. २ गुरुदेवास बराबरी । करी तो शिष्य दुराचारी ॥ ५ $\frac{३}{४३}$. ३ ह्या ओवींतील गोष्ट समजत नाहीं(?) ४ हें प्रचीतीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें । मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीयेकें ॥ ११ $\frac{२०}{२४}$

समर्थाचीं अवतारप्रयोजनें । उत्कटभक्तिज्ञानवैराग्यलक्षणें ।
कर्म उपासना संरक्षणें । विचार संन्यास[1] वाक्यार्थें ॥ ५१ ॥
समर्थदेवें जें जें केलें । तें कोण्ही नसेल ऐकिलें देखिलें ।
भक्ति ज्ञान वैराग्य गाजलें । न भूतो न भविष्यति ॥ ५२ ॥
समर्थस्थितीसी मानवती संत । मोक्षश्रिया भाग्यवंत ।
येकंकार नसे निभ्रांत । येक विचार परमार्थी ॥ ५३ ॥
समर्थदेवा सद्गुरुरामा । परम पुरुषा पूर्णकामा ।
श्रीगुरुभजन न घडे आह्मा । गुरुभक्तांचीं धन्य जिणीं ॥ ५४ ॥
समर्थासी आधीं पात्र वाढावें । मग देवासी समान समर्पण करावें ।
जैसें पितृयज्ञीं समान ब्रह्मार्पण व्हावें ।
देव पितर समसाम्यें ॥ ५५ ॥
समर्थसद्गुरुमहिमा अधिक । जेथें आटती ब्रह्मा[2]दिक ।
देव ऋषि पितर लोक । श्रीगुरुप्रतिमापूजनार्थें ॥ ५६ ॥
समर्थ भजनाचें अधिष्ठान । देव ब्राह्मण संत साधु सज्जन ।
श्रीरामचंद्र उपासन आराधन । मारुतिदर्शन श्रीगुरुरूपें ॥ ५७ ॥
समर्थकृपें भागवत आह्मी । द्वैत अद्वैत जाणूं स्वामी ।
सद्गुरुकृपेनें परब्रह्मीं । आत्माराम निरंजनीं ॥ ५८ ॥
समर्थें ऐकोनि वेणीवाणी लडिवाळ उत्तरें ।
वेणाबाईसी दिधलीं वरदोत्तरें ।
निर्द्वंद्व गुरुदेवभजन घडेल निर्धारें । श्रीरामउपासना गाजेल ॥ ५९ ॥
समर्थआज्ञा जाली बरवी । श्रीरामकथा ब्रह्मांड भेदूनि पैलाड [3]न्यावी ।
वेणीसंप्रदाईं श्रीरामायणें व्हावीं । छंदप्रबंधें स्वानंदें ॥ ६० ॥
समर्थआज्ञेचीं महिमानें । सप्तविध जालीं रामायणें ।
संतसाधुसज्जनीं श्रवणें । केलीं असतील निर्धारें ॥ ६१ ॥

---

१ संन्यासी ह्मणिजे षडन्यासी । विचारवंत सर्वसंन्यासी ॥१५ १०/३६. २ ह्मणौन सद्गुरुसामर्थ्य आधीक । जेथें आटती ब्रह्मादिक ॥ ५ ३/४२. ३ रामकथा ब्रह्मांड भेदून । पैलाड न्यावी ॥ १२ ९/२६..

समर्थे ठेविलीं अभिधानें । मंगळें संकेतें छंदोरामायणें ।
लवकुशें सुंदरें अब्दरामायणध्यानें ।
भाषारामायणें वदविलीं कृपें ॥ ६२ ॥
समर्थकृपें रामायणाब्धि । बांधूनि काढिती वानर प्रबंधीं ।
सद्गुरुकृपें कार्यसिद्धि । हनुमंतरूपें निर्धारें ॥ ६३ ॥
समर्थासी शिष्यें समाचार निवेदिले । निरंजन देवदर्शना आले ।
समर्थ ऐकोनि येकांत वनीं गेले । विचित्र दर्शन द्यावया ॥ ६४ ॥
समर्थदर्शनासी निरंजन तेथें । तव हनुमान वृक्षारूढ देखिलें येथें ।
भरजरी मंदिल मस्तकीं झळकतें । जरी पैजारा पादपद्मीं ॥ ६५ ॥
समर्थासी पाहेल तो समर्थ । इतरांसी न कळे हा गुह्यार्थ ।
कऱ्हाडनगरीं हा यथार्थ । समर्थवृत्तांत वर्तला ॥ ६६ ॥
समर्थ शुद्ध भावार्थें भाविले । पूर्णाक्षर मंत्रीं बोळले ।
जगदोद्धार तारक मंत्रीं केले । तारक ब्रह्मेंद्र समर्थ ॥ ६७ ॥
समर्थे अभाविकांचीं मंत्राक्षरें सांडविलीं ।
कर्णांतूनि हस्तावरी वोतिविलीं ।
प्रत्यक्ष राममंत्राक्षरें दाखविलीं । संतसज्जनीं कृष्णातीरीं ॥ ६८ ॥
*समर्थासी कोण्ही येकें अरुषें आक्षेपिलें ।
स्वामि काय करितां अहां पुसिलें ।
अरे मतांतरें लेकुरीं कार्य नासिलें ।
तें सरिसें करितों ग्रंथांतरीं ॥ ६९ ॥

---

* पोथींत ६८ पर्यंत ओव्या असून पुढें एक पान कोरें सोडलें आहे. बाडांत ८१ पर्यंत पूर्ण ओव्या असून ८३ व्या ओवीचीं तीन चरणें आहेत व पुढें एक पान कोरें सोडलें आहे च. गिरिधरांनीं हा समास अपूर्ण ठेवलेला दिसतो. कां कोण जाणे ! १ या सात हि रामायणांचें विवेचन प्रस्तावनेंत केलें आहे. २ आर्ष, विक्षिप्त मनुष्यानें. ३ महाराष्ट्रांत मतामतांचा गलबला माजून लोकांच्या कल्पना कांहीं विपरीत च झाल्या होत्या. त्या असत्य कल्पनांचा निरास करून श्रीसमर्थांनीं दासबोधग्रन्थद्वारें महाराष्ट्रास सत्य महाराष्ट्रधर्म शिकविला.

समर्थासी कोण्ही येक लोक ह्मणती ।
स्वामि अखंड अधोदृष्टि अंतर्दृष्टि कां असती ।
अरे अंतरीं पाहतसों श्रीराममूर्ति ।
तुह्मासी सगुणमूर्ति हे लक्षावया ॥ ७० ॥
समर्थें कृपादृष्टि आह्मासी पाहिजे पाहिलें ।
समर्थें पाहतां चि सगुण पाहणें राहिलें ।
स्वामि मुळीचें आमुचें तें चि तें भलें ।
समर्थध्यान संपूर्ण अवलोकूं[1] ॥ ७१ ॥
समर्थस्वामि पांडुरंगहरिदासें सभास्थानीं बैसविले ।
समर्थापुढें कथाप्रसंगीं रंग न जाले ।
समर्थ येकांतीं जाऊनि कथाश्रवणीं बैसले ।
अद्भूत रंग जाले संकीर्तनीं ॥ ७२ ॥
समर्थ भक्तिप्रेमें उंच बुरुजीं गोविले ।
स्वामी अंतर्धान पाऊनि बाहेरी प्रगटिले ।
जयरामस्वामी आपण निघाले । लोक प्रेमें वोसंडेती ॥ ७३ ॥
समर्थ ह्मणती जयरामा रे । तुझीं लेकुरें रडवीं कां रे ।
अद्यापि नेणती लेकुरें राघोबा रे । जाणतीं होतील सज्ञानें ॥ ७४ ॥
समर्थें जयरामयोगी म्लेछउपद्रवीं सोडविले ।
कऱ्हाडीं उंच मनोऱ्यावरूनि उतरिले ।
समर्थ वायुस्वरूप देखोनि म्लेछ चमत्कारले ।
भुभुकारें जाले मूर्छागत ॥ ७५ ॥
समर्थजयरामयोगी आले चांफळासी ।
तों समर्थ चाफळीं च देखिले दृष्टीसी ।
जयरामें अभिनव केलें मानसीं । धांवण्या धांविले स्मरणमात्रें ॥ ७६ ॥

---

१ समर्थांनीं कृपा केली ह्मणजे शिष्य समर्थरूप होतो, पण त्याला कांहीं ती स्थिति प्रिय वाटत नाहीं. समर्थापासून भिन्न राहून त्यांचें ध्यान करण्यांत जें सुख आहे तें तद्रूप होण्यांत नाहीं असें च त्याला वाटतें ! भक्तिप्रेमाचा हा महिमा आहे ! २ भरून गेले.

समर्थप्रसाद श्रीरामनौमीचे वैदिकीं उपेक्षिले ।
दत्ताजिपंत वाकेनिविसाकडे विपुळ दक्षणे धांविले ।
समर्थें विठलगोसावियांसी पारणावृत्तांत पुसिलें ।
स्वामि युगधर्म केले ब्राह्मणीं ॥ ७७ ॥
समर्थें भोंवरवाडियांचीं शूद्र दंपत्यें आणविलीं ।
मांडवीनदींत मंगळस्नानें करविलीं ।
चोळ्या पातळें धोत्रें सहस्त्रां देवविलीं । संपूजिलीं संतर्पणीं ॥ ७८ ॥
समर्थचरित्र ब्राह्मणासी कळलें । वैदिकीं येऊनि समर्थासी स्तविलें ।
श्रीगुरुदेवें सुबोलीं सन्मानिलें ।
ह्मणती यदृच्छा लाभ संतुष्ट असावें ॥ ७९ ॥
समर्थें प्रकृतिपुरुषें सर्वत्र भाविलीं [1] ।
नाना देवीं येक चि देव वाणी वदलीं [2] ।
आत्मयारामासी आरती केली । कर्ता भोक्ता सर्वेश्वरु ॥ ८० ॥
समर्थ पुरुषमात्रासी रघुनाथा ह्मणती । स्त्रियांसी रघुनाथे अनुवादती ।
सहस्रशतां दंपत्याहातीं पोहेळी [3] चांफळीं प्रारंभिती ।
सुमुहूर्तें श्रीरामदेवालई ॥ ८१ ॥
समर्थ ह्मणती स्वल्पारंभा क्षेमकरा । पुढें उत्कट करणें आहे सर्वेश्वरा ।
वज्रदेह परंपरा । आकल्प श्रीरामसंस्थान ॥ ८२ ॥
समर्थें भोवरवाड्या वाटिप्रसाद दिधले ।
मंडपमंडपीं तबकप्रसाद पाठविले ।
पुढें पुढें निरोपग्रहणीं प्रसाद देवविले* ।

---

१ दासबोध १७–७ पहा. २ नाना देवीं देव येक विराजे ॥ असा चरण, श्रीसमर्थकृत आत्मयारामावर जी आरती आहे, तींत आहे. ३ "पोवळी" असा शब्द आहे व पुढील एकविसाव्या समासाच्या सोळाव्या ओवींत हि तो आला आहे. पोवळी ह्मणजे देवालयाच्या आवाराची भिंत. * चरित्रश्रवणाचा चटका लागून रहावा, तृप्ति होऊं च नये, ह्मणून च कीं काय कोण जाणे हा समास गिरिधरांनीं अपूर्ण ठेविला आहे !

## ॥ समास विसावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥
॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥

मागा श्रीगुरुसमर्थचरित्रें वर्द्धमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां श्रीरामअधिष्ठानीं वर्तमानें । निवेदन करणें सेवेसी ॥ १ ॥
समर्थस्वामीचीं महिमानें । प्रगट राजाब्रह्मरामनिशाणें ।
अधिष्ठान हजुरी[1] वर्तमानें । विश्व लागले भजनासी ॥ २ ॥
नाना देशकाळवर्तमानें । नाना राजपूजा होती बहुमानें ।
राव रंक समानपणें । समर्थचरणसेवेसी ॥ ३ ॥
कैलासवासी शिवगणनाम्नें । क्षत्रियकुळावतंसें सप्रेमें ।
मंत्रियानुमतें सेवेसी संभ्रमें । रुद्रसंख्या[2] ग्रामें समर्पिलीं ॥ ४ ॥
जव जव शिवराज्यवर्धमानें । तव तव रामभजनासी ग्रामप्रदानें ।
राजा ब्रह्म राम अनुसंधानें । राजश्रिया विराजत ॥ ५ ॥
कृष्णातीरीं मारुतिस्थानें । पूर्व पश्चिम उत्तर दक्षिणे ।
रुद्र संख्या अधिष्ठानें । यात्रा चाले देवाची ॥ ६ ॥
बाहेग्राम शक्तिग्राम अभयग्राम । शूर्पग्राम मसुरग्राम पूर्वग्राम ।
पाटणग्राम उदुंबरग्राम निनामग्राम । यात्रा चाले देवाची ॥ ७ ॥
बाहेक्षेत्रीं उपग्रामीं । मानसग्रामीं पारग्रामीं ।
मारुति स्थापितांती[3] समर्थस्वामी । यात्रा चाले देवाची ॥ ८ ॥
चाफळ चंपावती आंवर्तगिरि[4] । विमळ मांडवीनदीतीरीं ।
श्रीरामनौमी उछह भारी । प्रतिपदेपासूनि वर्द्धमाने ॥ ९ ॥

---

१ हाजीरनीस. २ अकरा गांवें. ३ मागील समास तिसरा, ओवी ५८, ५९ पहा. ४ भोंवताली डोंगर आहेत ज्याच्या.

प्रतिपदेसी मानकरी शाहापुरकर । द्वितीयेसी मानकरी वडगावकर ।
तृतीये दिवसीं मानकरी माहागांवकर । चतुर्थी भेडसगावकराची ॥१०॥
पंचमीसी सन्मान श्रीआळयकरीं ।
षष्ठीसी भक्तराज नृसिंहराय अधिकारी ।
सप्तमीसी बहुमान पारगांवकरीं । अष्टमी बाहेकराची कथा ॥ ११ ॥
मुख्य नवमी दिवस समर्थ महंतांचा ।
दशमी दिवस चांफळीं दीपाराधना रथोछहाचा ।
प्रतिपदेपासूनि प्रारंभ यात्रेचा । नित्यानंद पद्धति ॥ १२ ॥
नाना मंगळतुरें प्रभातकीर्तनें । नाना कांकड आरति नीराजनें ।
नाना पुष्पमाळा रंगमाळा आसनें ।
अर्चनसामग्री देवाची ॥ १३ ॥
श्रीगुरुरामचंद्रहनुमानअर्चनें । नाना यात्राप्रभाव वर्धमानें ।
नाना दिंड्या पताका सकळ शासनें ।
आरति धूपार्ति प्रदक्षिणा ॥ १४ ॥
नाना पुराणश्रवणें व्यासवाल्मीकपूजनें ।
नाना संत महंत देव द्विज अर्चनें ।
नाना तीर्थ प्रसाद ब्रह्मसंतर्पणें ।
स्थळोस्थळीं मंडपीं होताती ॥ १५ ॥
सायंकाळीचीं पंचोपचारपूजनें ।
नाना दीपिका नमस्कार बंदीजनें गर्जनें ।
नाना वाक्यें वर्तमानें समर्था निवेदनें । सर्वत्र जनें परिसती ॥ १६ ॥

---

१ उत्सवांतील नऊ दिवस कोणकोणाकडे नेमले होते त्यांचीं जीं नांवें येथें दिलीं आहेत व क्रम सांगितला आहे, तीं नांवें व क्रम बखरींतील नांवाशीं व क्रमाशीं जुळत नाहींत. समर्थप्रताप १६५१ पूर्वींचा व बखर १७१५ तील व ती हि अशुद्ध छापलेली, हल्लीं ज्या कांहीं तिच्या हस्तलिखित प्रती मिळतात त्यांत हि परस्परविरोध आढळतात इत्यादि कारणांमुळें प्रताप च विश्वसनीय मानला पाहिजे. २ चाफळकरांचा. ३ नरसो मलनाथ अंबरखाने, हे चाफळास महाराजाकडून मामलतीस होते. ४ भाट.

नाना हरिकीर्तनें अनुसंधानें । नाना राग रंग आलाप गायनें ।
नाना प्रकारीचीं तानमानें ।
ब्रह्मगोळ अतिमानें कोंदाटला ॥ १७ ॥
नाना दारुयंत्राच्या ध्वनि गाजती ।
नाना भगवद्भक्तांच्या फौजा साजती ।
नाना आंबेबनीं कपीचे भुभुकार उठती ।
जयजयकार करिती करताळिका ॥ १८ ॥
नाना दिव्य ताटीं नीलाजनें । सहस्त्रावधि वधुजनें ।
जगन्माता सप्रेम मनें । जगजनकजनका वोवाळिती ॥ १९ ॥
नाना दीपदीपिका दीपाराधना सकळ ।
नाना शिखरें उजळितां उजळे ब्रह्मगोळ ।
नाना कथाकीर्तनीं रंग कल्लोळ ।
भूगोळ खगोळ संपूर्ण जाला ॥ २० ॥
नाना गंध धूसरें सुमनवृष्टि । नाना समर्थध्यानें दिसती दृष्टि ।
नाना यात्रापद्धति चालिली सृष्टि ।
स्वानंदपुष्टि सकळिकां ॥ २१ ॥
समर्थासी गिरिकंधरीं गुप्त राहाणें । लोकानुग्रहें प्रगट होणें ।
प्रगट होतां जनीं[1]जनार्दनें । वरुषाव करिजे पूजेचा ॥ २२ ॥
ह्मणोनि पंचक्रोशींत समर्थ प्रदक्षिणा करितातो ।
नाना यात्रेकरांसी मार्गीं दर्शनें देताती ।
चांफळयात्रेमध्यें प्रगट न होती ।
कां जे जनसंग वोढेल ह्मणोनियां ॥ २३ ॥
श्रीरामनौमींत समर्थ गिरिकंधरीं ।
नाना पुष्प मेखळा चंदन संपूर्ण शरीरीं ।
विचित्रवेषें प्रत्यहीं येती गुप्त देवाल्याभीतरीं ।
वृक्षारूढ शार्वरीं[3]त संकीर्तनें ऐकावया ॥ २४ ॥

---

१ लोकांनीं. २ "आपणाकडे" असा पाठ बाडांत. ३ शार्वरी=रात्र.

कितीयेक काळें समर्थ शृंगवाडीसी प्रगट जाले ।
गजारूढ करूनि लोकीं यात्रेंत आणिले ।
नामशेटि मंडपीं पलीण[1] पर्वतीं उंच स्थानीं बैसविले ।
महंतीं दुर्गावर्त केले चतुर्विधद्वारें[2] ॥ २५ ॥
तीन मुहूर्त पूजासमारंभ जाले । ब्रह्मगोळ आनंदें संपूर्ण भरले ।
सर्वत्र लोकांचे मनोरथ पुरले ।
नाना लोक लोटले संदर्शना ॥ २६ ॥
कितीं वस्त्रें भूषणें अळंकार । किती सुमनगंधमाळा संभार ।
कितीं घूसरें उधळिलीं अपार । ब्रह्मगोळ जाला संपूर्ण ॥ २७ ॥
कित्तेक ब्राह्मण संतुष्ट केले । किती संत सज्जन अर्चिले ।
कितीयेक माल यात्रेसी लाविले । श्रीरघुनाथजीच्या भजनासी ॥२८॥
अस्तमानीं समर्थ अंतर्धान पावताती ।
लोक आपुलाल्या मंडपासी जाती ।
समर्थ ध्यानीं मनीं सर्वत्र राहती ।
नवरात्र अधिष्टानीं असती गुप्तेश्वर ॥ २९ ॥
वेणाबाईहिं दशमीचें आत्मपारणें मागितलें ।
समर्थें कृपेकरूनि संपूर्ण दिधलें ।
तीनतपें[3] परिपूर्ण चालविलें । पुढें संप्रदाईं ऐसें चि चालेल ॥ ३० ॥
वेणाबाईवांचूनि कांहीं । इतरां कन्येसी सभेसी कीर्तन आज्ञा नाहीं ।
येकासनीं बैसोनि कीर्तन करणें पांहीं । प्रसंगानुसारें मर्यादे[4] ॥ ३१ ॥

---

१ पल्लाण=अंतर. श्रीसमर्थांना नामशेटींनीं सर्वांपासून जरा दूर अशा पर्वततुल्य उंच आसनावर बसविले. २ व चारी बाजूंनीं श्रीसमर्थदर्शनास इतके महंत लोटले कीं जणूं काय पर्वतावर वाऱ्याचे भोवरे उठले. ३ शक १५६६ त श्रीरामाच्या उत्सवास श्रीसमर्थांनीं सुरवात केली. तेव्हांपासून तों निधनापर्यंत सुमारें तीन तपें ह्मणजे शक १६०० पर्यंत वेणाबाईनीं दशमीचें पारणें करावें. ४ फक्त वेणाबाईनीं सभेंत उभ्यानें कीर्तन करावें, इतर रामदासी स्त्रियांनीं फार तर एका च जागीं बसून कीर्तन करावें, पुराण सांगावें, ही श्रीसमर्थांनीं घालून दिलेली मर्यादा सांप्रदायिकांनीं पाळली च पाहिजे.

नीति न्याय भजन मर्यादा । समर्थसंप्रदाईं चालिली सर्वदा ।
कर्म उपासना ज्ञान विज्ञान प्रसिद्धा । दासबोधग्रंथ निर्धारें ॥ ३२ ॥
समर्थसद्गुरुनिजबोध । दासबोधरूपें सर्वत्र प्रसिद्ध ।
नाना साक्षात्कार होती विविध । येकनिष्ठ गुरुभक्तांसी ॥ ३३ ॥
देवपद गुरुपद दोनीं स्थानें । समर्थें केलीं हीं संस्थानें ।
नाना ढाला ध्वजा दिंड्या शासनें । चांफळपर्यळीं अधिष्ठानीं ॥ ३४ ॥
नाना दिंड्या सन्मान माहागजरें । नाना प्रेम आलिंगनें परस्परें ।
नाना देवदर्शनें प्रेम निर्भरें । चांफळपर्यळीं अधिष्ठानीं ॥ ३५ ॥
नाना आपुलाले आत्मपवाडे । नाना पूर्व उत्तर पक्ष गोढे ।
नाना संत पारंपत्ये करिती निवाडे ।
चांफळपर्यळीं अधिष्ठानीं ॥ ३६ ॥
नाना क्षीरापत्ति मान पद्धति । जैशा जैशा नवरात्र तिथि ।
तैशा तैशा क्षीरापति मिर्वती । अनुक्रमें येती देवालयां ॥ ३७ ॥
नाना संतसज्जन पूजनें संकीर्तनें । नाना देवब्राह्मण अर्चनें संतर्पणें ।
नाना औषध दारु दीपिका दीपाराधनें ।
चाफळपर्यळीं अधिष्ठानीं ॥ ३८ ॥
सहस्रावधि चालती वधुजनें । देवास वोवाळिती नीराजनें ।
स्त्रियादिकांसी दुरूनि गुरुदेवदर्शनें । नीति मर्यादा स्वामीची ॥ ३९ ॥
पुढें समर्थस्वामी आज्ञा करिताती ।
स्त्रियादिकांसी नीराजनें वर्जिताती ।
नाना युगधर्म लौकिक स्थिति । मर्यादा राहिली पाहिजे ॥ ४० ॥
नाना रथोछाह मांडले देवाचे । नाना देशांतरीं लोक आले वैभवाचे ।
नाना लोकीं लोक वाढविले साचे ।
चांफळपर्यळीं अधिष्ठानीं ॥ ४१ ॥

---

१ प्रतापांत अनेक ठिकाणीं श्रीमत् दासबोधाचा महिमा प्रगट झाला आहे. जे कोणी श्रीसमर्थांचे एकनिष्ठ भक्त ग्रन्थराजाचीं पारायणें करितात त्यास साक्षात्कार होतात. २ विद्वत्ताप्रचुर. ३ शिक्षा.

नाना देवालयें नूतन रचना । नाना यात्रा पद्धति वर्धमाना ।
नाना आराम वनें मारुतिस्थापना ।
चांफळपर्यळीं अधिष्ठानीं ॥ ४२ ॥
नाना देवदुंदुभि लागती गगनीं । नाना नरवाद्यें गर्जती अवनीं ।
नाना ताळ मृदांग उपांग यंत्रध्वनि ।
चांफळपर्यळीं यात्रेमध्यें ॥ ४३ ॥
नाना गंध धूशरें सुमनें परिमळ । नाना गंधरूप जाला ब्रह्मगोळ ।
नाना मंगळतुरीं जयजयकारीं खगोळ ।
संपूर्ण जाला सत्कीर्ति ॥ ४४ ॥
अधिष्ठानीं यात्रेसी लळित नाहीं । रथोछाहीं स्वानंदें मिरवण पाही ।
भद्रीं श्रीराम बैसऊनि भक्तांहिं । कारुण्यें उपकार आठविजे ॥ ४५ ॥
श्रीगुरुसमर्थें डोंगरीं राहिजे । यात्रा संपूर्ण कृपादृष्टि पाहिजे ।
देव भक्तासवें जाइजे । ध्यानरूपें निर्धारें ॥ ४६ ॥
लक्षानलक्ष यात्रा आली । आत्मसदनासी स्वानंदें चालिली ।
श्रीगुरुदेवदर्शनासी यात्रा निवडोनि निघाली ।
सज्जननाम पर्वताकडे ॥ ४७ ॥
अति लालस सप्रेमयुक्त । त्याचें निघेना येथूनि चित्त ।
मुमुक्ष मोक्षाधिकारी केवळ गुरुभक्त ।
संतसंगें गुरुदर्शना गेले ॥ ४८ ॥
ऐवं श्रीरामनौमीवर्तमान । श्रीरामसमर्थअधिष्ठान ।
कृष्णवेणीतीरीं पंचक्रोशीं जाण । वाक्यें श्रीपदीं निवेदिलीं ॥ ४९ ॥

---

१ या उत्सवाचें वर्णन श्रीसमर्थांनीं डफगाण्यावर केलें आहे, त्यांत शेवटीं ते ह्मणतातः दास डोंगरीं राहातो । यात्रा देवाची पहातो । देव भक्तासवें जातो । ध्यानरूपें ॥. २ श्रीक्षेत्रचाफळास श्रीरामनवमीचा उत्सव करून निवडक भक्तमंडळी श्रीसमर्थदर्शनास सज्जनगडास जातात. ३ ह्या समासांत गिरिधरांनीं उत्सवपद्धतीचें जें वर्णन केलें आहे त्यावरून त्या काळीं किती थाटानें उत्सव होत असला पाहिजे याची आज नुसती कल्पना करणें हि आल्हादकारक आहे.

वेणाबाईसी समर्थसदनीं वास करणें ।
समर्थसदनीं देवार्चन देवार्चनीं पूजणें ।
समर्थसदनीं करावें प्रसादपारणें ।
कथाकीर्तनें करावीं समर्थसदनीं ॥ ५० ॥

समर्थचरणीं भक्ति वेणी उत्पन्न ।
समर्थचरणीं अंतीं ऊर्ध्व पंथीं लीन ।
अधिष्ठानीं पावली संस्थान ।
चिताभूमीसी भक्ति चंपक निघाला ॥ ५१ ॥

वाल्मीकिरामायणीचे दाखले आले ।
कबंधगंधर्वें श्रीरघुनाथजीसी वृतांत कथिले ।
देवा मतंगगुरुदास्यें शिष्याचे श्रमबिंदु भूमि पडले ।
त्यांचे पुष्पतरु निघाले पंपा[1]सरोवरीं ॥ ५२ ॥

समर्थअधिष्ठानीं सज्जनगिरिवरी । गुरुभक्त लयो पावतां शरीरीं ।
भक्तितरु उठती सामर्थ्येंकरी । संत जाणती सर्वज्ञ ॥ ५३ ॥
श्रीरामनौमी विसांवे[2] दिनीं । सद्गुरुचरणीं लीन वेणी ।
चांफळपर्येळीं अधिष्टानीं । आत्मारामीं निमग्ना ॥ ५४ ॥

श्रीगुरुदास्यीं दिव्यदेह पडे । श्रीगुरुचरणीं अनन्य भक्ति जडे ।
तेथें अघटित तें तें घडे । देखिलें वर्तमा[3]न लिहिलें हो ॥ ५५ ॥

---

१ कबंधानें श्रीरामचंद्रांना पंपासरोवराचा मार्ग दर्शवितांना असें सांगित-ल्याची कथा अरण्यकांडाच्या त्र्याहात्तराव्या सर्गांत दिली आहे कीं पंपासरोवरा-जवळील मतंगऋषींच्या आश्रमांत मतंगशिष्य गुरुकरितां काष्टांचीं ओझीं आणतांना थकून त्यांच्या शरीरांतून जे घर्मबिंदु भूमीवर पडत त्यांचीं पुष्पें व्हावीं! तद्वत् येथें वेणाबाईच्या समाधिस्थलीं चंपकवृक्ष निर्माण झाला! २ ह्मणजे चैत्र वद्य १४ स वेणुबाई समाधिस्थ झाल्या. बखरींत हि ही च तिथि दिली आहे. " शके १६०० चैत्र वद्य १४ सह अमावास्येस वेणुबाई निजधामास गेल्या ". ३ गिरिधरांच्या वेळीं तो चंपकवृक्ष होता, कारण गिरिधरांनीं देखिलें तें लिहिलें आहे. हनुमंतस्वामींच्या वेळीं तो वृक्ष नव्हता. तेव्हांपासून वेणुबाईच्या समाधि-स्थलीं वृंदावन च आहे.

श्रीरामअधिष्ठानीं वर्तमान । विद्यमान स्वामीसी केलें निवेदन ।
श्रीगुरुसमर्थस्वामीचें संस्थान । सज्जनगिरिमाझारी ॥ ५६ ॥
गुरुभक्त मंत्रि वाकेनिविस । सन्निध वाक्यार्थ लिहितसे सावकाश ।
संतसज्जन करूनि अवकाश । अनुक्रमें वाक्यें ऐका जी ॥ ५७ ॥
श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती । प्रांतीचे लोक दर्शनासी येती ।
सकळ प्रांतीचा स्वामी परामृश घेती । चिंता करिती विश्वाची ॥५८॥
देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्थ होती मनें ।
ह्मणती कैसी वाचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ ५९ ॥
कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवाल्यें तगती ।
कैसे कुटुंबवछल लोक जगती । कोणेकडे जातीलें हे ॥ ६० ॥
समर्थ भविष्य न सांगोनि सांगती । दक्षणेसी युद्धें दुर्धर दिसती ।
अकरा अकरीं तरवारा मागों धाडिती । शिवराजयासी सत्वर ॥६१॥
शिवराजें चिन्ह जाणितलें । दक्षणेसी परचक्र सत्य आलें ।
समर्थें सर्व पराभविलें । स्वयें निजशस्त्रें घेउनियां ॥ ६२ ॥
पुढें समर्थ शिवराजयासी लग्न करा ह्मणती ।
शिवराज आपुला कैलासमार्ग लक्षिती ।
समर्थासी वंदूनि रायगडासी जाती । कैलासवास करावया ॥ ६३ ॥
समर्थ स्वप्रकाशें आंधारीं तीन मास बैसताती ।
मुरूभपात्रें उदकें सेविताती ।
शर्कलपात्रें घेऊनि धांवताती । अरण्याकडे दुश्चिन्हें ॥ ६४ ॥
दक्षणेसी तैसें च जालें । न सांगोनि समर्थें सांगितलें ।
उत्तर परचक्र आलें गेलें । दक्षणेसी धर्मसंस्थापना ॥ ६५ ॥

---

१ खनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणी च न पाहे । सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ १५$\frac{२}{३}$. २ पृथ्वी. ३ वांचती. ४ ह्या दोन ओव्या कोणाच्या अंतःकरणाला चटका लावणार नाहींत ! ५ ही माहिती नवीन आहे. ६ शिवाजी महाराजांच्या निधनाचें श्रीसमर्थास इतकें दुःख झालें कीं तीन महिने ते अंधारांत च बसून राहिले. ७ मुरूमाचें भांडें, मातीचें भांडें. ८ फुटकीं भांडीं. ९ ह्मणजे तंजावराकडे. तंजावरचा मठ समर्थकालीन आहे.

जीर्ण देवालयें नूतन रचना । देवदेवालईं देवस्थापना ।
समर्थस्वामींची श्रीराम उपासना । आत्माराम कर्ता सर्वेश्वरु ॥ ६६ ॥
नाना देशकाळरूपें भगवान । नाना अवतारें सेवी वन ।
वागांपुरीं करूनि प्रस्थान । पुन्हा संस्थान चांफळीं स्थानीं ॥ ६७ ॥
विचित्र गैबी वाद्यें वाजीनलीं । सिबिका चंपकसुमनापरी चालिली ।
म्लेंछविलयें श्रीरघुनाथजी पूर्वस्थळीं । भद्रसिंह्मासनीं बैसले ॥ ६८ ॥
श्रीराम समर्थ सामर्थ्यरूपें सर्वत्र असती ।
भक्तितरूसी छेदितां चमत्कार दाविती ।
अवतार संकल्प किं श्रीरघुनाथमूर्ति । आकल्प भजन वाढवावें ॥६९॥
सद्गुरुसमर्थ व्यापक सचराचरीं । ब्रह्मारण्य वसविती निर्धारीं ।
श्रीहनुमान स्वामी मठ निर्विकारी । निर्गुण निरंजन निःप्रपंच ॥ ७०॥
अनंत अवतारी नामरूप मठ । नामरूपातीत अनाम मठ ।
मीतूंपणाची गुरुपदीं नाहीं खटपट ।
परब्रह्ममठ सकळांचा ॥ ७१ ॥
श्रीरामसमर्थासी पश्चिम सिद्धांतीं राहाणें ।
सद्गुरुसमर्थासी पश्चिमपर्वतीं निजसौख्य पाहाणें ।
श्रीगुरुसमर्थासी पश्चिम देशीं स्वधर्मराज्य पाळणें ।
श्रीरामराज्य करणें सर्वत्र हो ॥ ७२ ॥
दोनी तपें केवळ केलें वैराग्य ।
तीन तपें लोकांसी लाभलें भजनभाग्य ।
भक्तिज्ञानवैराग्यें समर्थ श्रीगुरु सभाग्य ।
भाग्य भोग भोक्तातीत योग्य निरंजन मठीं ॥ ७३ ॥
सद्गुरुसमर्थ सज्जनगिरिवरी । आत्माराम चिद्विलासें वर्तती शरीरीं ।
येकांत राम होऊनि असती निर्धारीं । सकळ चराचरीं प्रसादरूपें ॥७४॥

---

१ संभाजीमहाराजांच्या वधानंतर यवनांची गर्दी झाली तेव्हां पंतअमात्य यांच्या विचारें श्रीरघुपतीच्या मूर्ति चाफळखोऱ्यांत वाघापुरचे सज्यावर नेऊन ठेविल्या होत्या. २ गुप्त, आकाशांतील. ३ पुढें यवनांचें बंड मोडून राजाराममहाराज चंदीहून परत आले तेव्हां श्रीच्या मूर्ति सज्यावरून परत चाफळीं आणल्या.

नाना मेखळा प्रसाद महंतें निजकरें शिरीं धरिले ।
सर्वांगरक्षणी आत्मसदनीं संपूजिले ।
बहुतां महंतां अंगप्रसाद लाभले ।
श्रीसमर्थप्रतापचरित्रें गाताती ॥ ७५ ॥
एवं श्रीरामसमर्थअधिष्ठानें । संतसज्जनीं केलीं श्रवणें ।
पुढें श्रीगुरुसमर्थस्वामीसंस्थानें ।
सज्जनगिरीसी गिरिधर सांगेल ॥ ७६ ॥
इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।
सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ७७ ॥
समास ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥

## ॥ समास एकविसावा ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**॥ आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ॥**
**॥ श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥ १ ॥**

मागा श्रीरामअधिष्ठानवर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ।
आतां श्रीगुरुसमर्थअधिष्ठानें । निवेदन करणें सेवेप्रती ॥ १ ॥
सद्गुरुसमर्थमहिमानें । देवपद गुरुपद अधिष्ठानें ।
नाना सज्जनपर्वत पर्यळी वर्तमानें । सैह्याद्रिखंडीं ऐकिजे ॥ २ ॥
त्रिंबकपर्वत जैसा लिंगरूप । सज्जनपर्वत तैसा आत्मलिंगस्वरूप ।
येकांतधामीं सद्गुरु ब्रह्म अरूप । अगोचरी मुद्रा अनामी ॥ ३ ॥
अनंतनामें समर्थाचीं । अभंग नामें सांगों स्वामीचीं ।
कविता अळंकारीं प्रगटलीं साचीं । संतसज्जनीं परिसावीं ॥ ४ ॥

---

१ श्रीसमर्थांच्या अंगस्पर्शानें पवित्र झालेले कपडे व इतर वस्तु श्रीसज्जनगडावर आहेत व कित्येक महंतांच्या मठांतून हि अद्यापि क्वचित् दृष्टीस पडतात.

मुख्य **रामदासस्वामी समर्थ** नाम ।
**रामीरामदास द्विज नारायण** नाम ।
**दास उदास देवदास सेवक** गुप्त नाम ।
नवविधा नामें निरोपिलीं ॥ ५ ॥
**भक्त उपासक अतीत अनन्य** ।
**रसिक हरिजन दासजन कवि गाण** ।
**बंदे जिंदे फकिर फर्जंद** अभिधान । भाषापरत्वें समर्थाचें ॥ ६ ॥
बाविस नामें अभंगीं वर्तलीं । चोविस नामें कविताप्रसंगीं प्रगटलीं ।
दोनि नामें गुप्त असती भलीं ।
सर्वब्रह्मीं बोलिलीं चतुर्दश श्लोकीं ॥ ७ ॥
सद्गुरुसमर्थ अनाम नाम । अनामाचें लीलाविग्रह नाम ।
नामरूपातीत परब्रह्म । आत्माराम सुखमूर्ति ॥ ८ ॥
सैह्याद्रिशिखरीं समर्थआसनें । देवदेवालयें समाधिभुवनें ।
सभामंडप राजांगणें वृंदावनें । नाना सरोवरें उचंबळती ॥ ९ ॥
सज्जनपर्वतीं निर्बंद नाहीं । गुरुराजआज्ञा सर्वत्र पाहीं ।
समर्थें बहुत पर्वत पाहिले कांहीं । सज्जनपर्वत मानला ॥ १० ॥
सैह्याद्रिशिखरीं समर्थशिखर । माहाप्रासाद मनोहर ।
नाना चंपकवृक्ष फुलले सुंदर । रामसरोवर सन्मुखीं ॥ ११ ॥
दुर्गद्वारांतूनि यावे । आधीं मारुतिदर्शन घ्यावें ।
पुढें माहाद्वार अवलोकावें । तोरणमंडित सुचित्रें ॥ १२ ॥
धूळिदर्शनें महंतदर्शनें । स्वागत रमणीय संभाषणें ।
श्रीरामसमर्थ विध्योक्त अर्चनें । कथानुकीर्तनें सर्वदां ॥ १३ ॥

---

१ श्रीदासविश्रामधामाच्या पंधराव्या अवधानांत श्रीसमर्थांचीं एकंदर ३६ नामें देऊन त्यांपैकीं सोळा नामें कवितेंत कोठें कोठें योजिलीं आहेत त्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. २ हीं दोन गुप्त नामें कोणतीं ? श्रीसमर्थकृत " सर्वब्रह्म " नामक एकादें प्रकरण असावें व त्याच्या चवदाव्या श्लोकांत हीं नामें आलीं असावीं असें वाटतें. ३ अजून हि आहेत. ४ समोरचें जें पिण्याच्या पाण्याचें टांकें आहे, त्याचें नांव " रामसरोवर ".

धन्य धन्य ते सज्जनदुर्गवासी । जैसें स्वर्गी स्वर्गवासी ।
नां जी स्वर्गस्थ येती गुरुदर्शनासी ।
अविनाशें सौख्ये भोगावया ॥ १४ ॥
नाना सप्तऋषी दुर्गवासी । राजश्री हे नित्य जयासी ।
राजऋषी चालती समर्थसदनासी । ब्रह्मानंदासी भोगावया ॥ १५ ॥
भोंवते पर्वत पोवळी प्राकार । मध्यें सैह्याद्रीचें उंचि शिखर ।
पंचक्रोशीं घडे नमस्कार । श्रीगुरुसमर्थआसनासी ॥ १६ ॥
पुण्यवंत येती गुरुदर्शनासी । श्रीपद लाभती अविनाशी ।
नाना विश्रांति होतसे मनासी । समर्थसदनासी देखतां ॥ १७ ॥
स्वर्ग भोगितां वेचे सुकृत । सद्गुरु सेवितां वाढे सुकृत ।
स्वर्गी आहे सुधारस अमृत । श्रीरामनामामृत सज्जनदुर्गी ॥ १८ ॥
स्वर्गी येऊनि दैत्यसंमोह पडे । श्रीगुरुकृपें काळ पायां पडे ।
स्वर्गी नाना संकल्प विकल्प कुडे । येथें निर्विकल्प घडे समाधि ॥ १९ ॥
स्वर्गासी यज्ञकर्मे करूनि जावें । येथें येक्या भावें शरण यावें ।
स्वर्ग भोगूनि भूतळीं पडावें । गुरुपदें चढावें परब्रह्म ॥ २० ॥
ह्मणोनि श्रेष्ठ तें पर्यळीसदन । परशत्रु प्रकृति जेथें लीन ।
ब्रह्मांडकोशीचे पुण्यवंत जन । पाहों ह्मणती मोहछह ॥ २१ ॥
समर्थे अपूर्व श्रीरामार्चन भारी आणिलें । सैह्याद्रिशिखरीं संस्थापिलें ।
सामर्थ्यतेजें ब्रह्मांड धवळलें । आकल्प संकल्प पूजनाचा ॥ २२ ॥
दक्षणेसी सहस्रांकित सदन । उत्तरेसी समर्थसमाधिभुवन ।
माहाप्रासादीं श्रीरामार्चन । श्रीगुरुदेवपादुका आसन येकांतीं ॥ २३ ॥

---

१ ना जी=किंबहुना नव्हे, कारण. २ सज्जनगडाची योग्यता स्वर्गाहून मोठी आहे, कारण स्वर्गांतलें सुख नाशवंत आहे यासाठीं स्वर्गस्थ देव देखील अविनाश सुख मिळावें ह्मणून श्रीगुरुदर्शनास गडावर येतात. ३ भोंवतालची भिंत. ४ प्राकार ह्मणजे हि भोंवतालची भिंत. पोवळीनें गडाची भिंत घ्यावी व प्राकारानें मंदिराची बाहेरची भिंत समजावी. ५ वाईट. ६ पुण्य असे तों स्वर्गांत राहून पुण्य क्षीण झालें ह्मणजे जीव पुन्हा मर्त्यलोकीं येतो. ७ गडावरील मूर्ति तंजावराहून आणल्याची प्रसिद्धी आहे च.

शेष शयनसंभारें उबगला । श्रीगुरुदेवआसनीं वेष्टूनि राहिला ।
नाना उपकर्ण सामग्री घेऊनि बैसला ।
नाना छत्रें चामरें मंडितें ॥ २४ ॥
अनंत शेषेशिरोमणि काढिले । समर्थसदनीं दीपावळीसी ठेविले ।
स्वयंप्रकाश भुवनीं दाटले ।
मुख्य अष्टोत्तरशत दीप लागले येकांतीं ॥ २५ ॥
रुद्र संख्या द्विजमूर्ति । रुद्रपाठें आत्मलिंगासी स्नपिती ।
रुद्र कुंभ गोमुखीं श्रवती तीर्थी ।
माहारुद्र गुरुमूर्ति आसनीं सुमनशैया ॥ २६ ॥
नित्य प्रभाते मंगळतुरें कांकड आरति ।
सडे सामर्जने रंगमाळा रेखिती ।
नाना उपकर्णें उद्वर्चनें सुमनमाळा गुंफिती ।
गुरुदेवदेवार्चनें विध्योक्त ॥ २७ ॥
समस्त हरिजन भक्तजन । सकळ साधु संत सज्जन ।
निबिड दाटले राजांगण । वाद्यें गर्जती बहुसालें ॥ २८ ॥
धूपार्ति येकार्ति नैवेद्य अर्पण । उत्तराच्मन करोद्वर्तन चंदन ।
श्रीरामसमर्थ तांबुलग्रहण । पुढें अनंत फळें रसाळें ॥ २९ ॥
अमित नीलांजने उजाळिलीं । अमित द्रव्यें वोवाळिलीं ।
सत् चित् आनंद कल्लोळीं । आरति होतसे समर्था ॥ ३० ॥
छत्रें चामरें मोरछलधारी । रुमाल दीपिका विंजणे वारिती करीं ।
उभय भागीं उभे वारिती वेत्रधारी ।
श्रीरामसमर्थ सिंह्यासनीं ॥ ३१ ॥
नाना वाद्यें दमामे भेरि । शंख शृंगें काहळा भारी ।
कर्णे बांके तुतारे नफेरी । बुरुंगें ढोल डफडी पांवे ॥ ३२ ॥

---

१ श्रीसमर्थपादुका गडावर समाधीच्या मागच्या बाजूस असून त्यांवर शेष आहे. २ श्रीसमर्थसमाधीस. ३ स्नान घालतात, अभिषेक करितात. ४ विंजणा, विंझुणा, विजणा=पंखा. ५ चर्मवाद्यें ६ एकवाद्य. ७ बुरग=वाद्यविशेष.

टाळ मृदांग उपांग श्रुति । माहा गजरे होतसे आरति ।
सर्वांतरीं आनंद हेलावती । मंत्रपुष्पें वाहती दीर्घस्वरें ॥ ३३ ॥
रुद्र संख्या प्रदक्षिणा आरति नमस्कार ।
दिंड्या पताका अमित भार ।
नाना काव्या शासनें वेत्रधार ।
जयजयकार करताळिका सर्वत्रीं ॥ ३४ ॥
मंगळमूर्ति मारुति नृसिंह्य नारायण । क्षत्रपाळ दिग्पाळ आदिकरून ।
समस्त देव वोवाळून सव्य घेऊन । राजांगणा आणिले ॥ ३५ ॥
पंचपदी राम कलिसंकीर्तन । येकाध्याई नित्य नेमें पुराणश्रवण ।
वाल्मीकव्यासाचें विध्योक्त अर्चन । श्रीगुरुपूजन संतांचें ॥ ३६ ॥
देवद्विजांचीं तीर्थें वंदूनि घेती । मग ब्रह्मसंतर्पणीं पंगति बैसती ।
प्रतिपदेपासूनि वर्धमान होती । दशमीपर्यंत मोहछह ॥ ३७ ॥
विडा दक्षणा प्रदानें वस्त्रदानें । पंगति होती सूर्यअस्तमाने ।
सायंसंध्या पुन्हा गुरुदेवदेवार्चनें । पंचोपचार विध्योक्त ॥ ३८ ॥
पुढें धूपातींचा मोठा गजर । दीप दीपिका नमस्कार ।
भाट बंदीजन गर्जती नाना प्रकार ।
नाना मंत्री वाक्यें निवेदिती समर्था ॥ ३९ ॥
पुढें कथानुकीर्तनें अनुक्रमें । मानकरी दिवस नेमिले नेमें ।
हॅरिभक्त विरक्त गाती परम प्रेमें ।
नादें ब्रह्मगोळ कोंदाटला ॥ ४० ॥
राग रंग आलाप ठाईं ठाईं । हास्य विनोद प्रसंगें कांहीं ।
प्रेमळ संकीर्तनें ऐकत पांहीं । वैकुंठनाथ तिष्ठतसे[1] ॥ ४१ ॥
नाना स्वेत आरक्त धूसरें उधळती । नाना सुमनवृष्टि प्रसंगें होती ।
नाना दीपावळिदारुतेजें दिशा उजळती ।
नाना सेना आवरिती सैनिक ॥ ४२ ॥

---

१ नाहं वसामि वैकुंठे । योगिनां हृदये रवौ । मद्भक्ता यत्र गायन्ति । तत्र तिष्ठामि नारद ॥

माहि मोर्तबे तगटी ढाला । उन्मत्त गजावरी अचाट अढाला ।
नाना छत्रें चामरें तेज झळाळा । दिवट्या हिलाल अनंत ॥ ४३ ॥
देवदुंदुभी गर्जती गगनीं । नाना नरवाद्यें वाजती अवनीं ।
मंगळतुरें मंजुळें श्रवणीं । रागमाळा आळापिती ॥ ४४ ॥
राजांगणीं रंगशिळेसी करुणाकीर्तनें अनुसंधानें ।
नाना प्रेमळ भक्तांचीं संकीर्तनें ध्यानें ।
श्रुतिसंमत शास्त्रोक्त वचनें । संत सज्जन संतोषती ॥ ४५ ॥
सिंह्मासनीं आदिमूर्ति । कथावसानीं सेजआरति ।
मूर्तिध्यानें धरूनि लोक जाती ।
आत्मसदनीं विश्रांति घ्यावया ॥ ४६ ॥
आकल्प सैह्याद्रिशिखरस्थान । समर्थस्वामीचें अधिष्ठान ।
संत सज्जन सुखें स्वानंदघन । आनंदउछह करिताती ॥ ४७ ॥
जैसा चांफळीचा उछहपद्धतिप्रकार ।
तैसा सज्जनपर्वतीं पद्धतिप्रकार ।
नाना प्रसंगें लोमविलोम[1] अविचार ।
न करिती साचार महंतजन ॥ ४८ ॥
जैसे चांफळीं श्रीरामनौमीउछह । तैसे चि येथें पुण्यतिथिमोहछह ।
चांफळीं विशेष होती रथोछह ।
येथें अनंत संत मिर्वती मनोरथीं ॥ ४९ ॥
अधिष्ठानीं भक्त निर्द्वंद भजती । उत्तम पुरुष पुण्यकीर्ति ।
दीक्षा दंडक गुण नाम कीर्ति । विस्तार केला भूमंडळीं ॥ ५० ॥
मोहरे मोहरे इरेसी पडेती । मोहरे मोहरे बळावती ।
मोहरे मोहरे भक्ति करूनि दाविती ।
प्रीतिकळहो दिसती परमार्थे[3] ॥ ५१ ॥

---

१ वर्णसंकर असा तात्पर्यार्थ. २ मोठमोठ्या महंतांत चुरस लागते. ३ पण ही सर्व चुरस, श्रीसमर्थांची कोण अधिक सेवा करितो, अशा स्वरूपाची असे.

नाना देशकाळें प्रसंगें वर्तती । नाना राजयोगें राजकारणें करिती ।
नाना अध्यात्मग्रंथीं विवरणें विवरिती ।
विवेकविचारें परमार्थें ॥ ५२ ॥

बहु नायक महंत जाले । महंत महंतीं विचार केले ।
मुख्य सज्जनपर्वतीं साक्षात्कार जाहाले ।
समर्थदेवें आज्ञा केली ॥ ५३ ॥

समर्थें जांबुवतीपुरीसी साक्षात्कार केले ।
समर्थमहंत गंगातीरासी गेले ।
गंगाधरस्वामी गंगातीरस्थ प्रार्थिले ।
समर्थभजनें वाढावया ॥ ५४ ॥

समर्थें आसनीं मंत्रोद्धारें केले । समर्थें मस्तकीं दासबोध धरिले ।
समर्थें कंथा मेखळा देऊनि स्थळासी आणिले ।
गंगाधरस्वामी श्रेष्ठपौत्र स्वानंदें ॥ ५५ ॥

मुख्य अधिष्ठानीं स्वामी समर्थ । दासबोधें स्वामीचा परमार्थ ।
समर्थ बोलिले महावाक्यार्थ । तत्त्वमस्यार्थ प्रगटूनियां ॥ ५६ ॥

संत सज्जन जाणती समर्थ । इतरांसी न कळे गुह्यार्थ ।
जागती ज्योती स्वामी यथार्थ । आत्माराम जगद्गुरु ॥ ५७ ॥

कोण्ही येक्या काळें म्लेंछउपद्रवें ।
पर्वतावरूनि उतरिलीं पदार्थवैभवें ।
अधिष्ठानीं पादुका राहिल्या स्वभावें ।
पंचक्रोशींत देखिल्या कृष्णातीरीं ॥ ५८ ॥

कोण्ही येक ताम्र पर्वताधिपति । समर्थें छडीनें उडविला अधःपातीं ।
क्षत्रिय केला दुर्गाधिपति । सैह्याद्रिशिखरीं समर्थें ॥ ५९ ॥

---

१ श्रीसमर्थांनीं श्रेष्ठांचे नातु गंगाधर यांना जांबेहून चाफळास आणिले तेव्हां "पृथ्वि त्वया धृता लोकाः" इत्यादि मंत्रानें त्यांनीं गंगाधरांचें आसन पवित्र केलें, त्यांच्या मस्तकीं दासबोध धरिला व त्यास मेखळा दिल्या. २ यवन.

कोण्ही येक कृत्या श्रीमंतकांता ।
चिताभूमीसी नैवेद्य न्या रे ह्मणतां ।
पादरक्षाप्रयोग गैबी[1] करूनि तत्वता ।
पुन्हा ब्रह्मसंतर्पणें करविलीं ॥ ६० ॥
समाधिपूजनीं श्रृंगी[2] नाद होती । नाना चमत्कार लोकांसी येती ।
नाना महंतसामर्थ्यें भजनें चालती । परत्र पावन परमार्थें ॥ ६१ ॥
अधिष्टानीं मायाब्रह्में मजुम दफ्तरें ।
विचारशोधनिये सुरुनिसी दफ्तरें ।
ॐकार दबिरी अक्षरें सुंदरें ।
फडनिसी चिटिनिसी मज्यालसी ॥ ६२ ॥
संत प्रतिनिधि न्यायाधिसी । महंत सेनापति सिद्ध साधक बकसी ।
मंत्रि हरकारे वाकेनिविसी खुपेनिविसी ।
श्रीगुरुभक्त उपासक दर्बारीं[3] ॥ ६३ ॥
येकांतीं नाजुक वर्तमान । मनासी आणिती महंत प्रधान ।
सर्वकाळ ग्रंथ संत सज्जन । सुखस्वानंदें विवरिती ॥ ६४ ॥
प्रथम **पूर्वारंभ** मनासी आणिती ।
**जुनाटपुरुषाचें** स्वरूप पाहाती ।
**अंतर्भाव आत्माराम** लक्षिती । **सगुणध्यानें निर्गुणध्यानें** ॥ ६५ ॥
**मानसपूजा** येकाग्र मनें करिती । **पंचसमासी** ग्रंथ विवरिती ।
**पंचमानीं मानपंचकीं** ज्ञान विज्ञान लाभती ।
सद्गुरुकृपें करूनियां ॥ ६६ ॥
**चतुर्थयोग पंचीकरणयोग** । विवरतां माहावाक्यीं **ब्रह्मियोग** ।
नाना षड्रिपूचे प्रयोग । परब्रह्मीं मावळती ॥ ६७ ॥

---

१ कोण मारतो हें न दिसतां त्या बाईवर पादरक्षाप्रयोग झाला आणि मग त्या शुद्धीवर आल्या. २ "सींगी" वाद्यांत. ३ परमार्थी तो राज्यधारी । या न्यायानें श्रीसमर्थांच्या दरबारांत बाकीचे हे सर्व अधिकार महंतांकडे होते च.

नाना उपग्रंथ उपसमास । संत विवरण करिती सावकाश ।
मुख्य **दासबोध** ग्रंथराज सर्वांस । अज्ञानतिमिरविध्वंसनीं ॥ ६८ ॥
अनंत **पदें ललितें** समर्थवैखरी । नाना **श्लोक** छंदबंद **अष्टाक्षरी** ।
पूर्णांत प्रारंभ **वोव्या बाविसाक्षरी** ।
नाना **सवाया बीर डफगाणीं** ॥ ६९ ॥
**समर्थे नाना** प्रासादिक ग्रंथ केले । अनंत गुणी समर्थ विराजले ।
आधीं प्रताप केले मग महंतासी सांगितेले ।
महंतीं महंत वाढविले[3] तो प्रसाद स्वामीचा ॥ ७० ॥
आदिपुरुष समर्थ सद्गुरु सर्वांचा ।
निश्चयें निर्धार केला वेदशास्त्रांचा ।
नाना गीता भागवत भावगर्भ संताचा ।
अंत अनंताचा[4] ना कळे गुरुकृपेंविण ॥ ७१ ॥
समर्थ अनंत गुणें परिपूर्ण । निजरूप पाहतां केवळ परब्रह्म निर्गुण ।
लीलाविग्रहें शिष्योपदेशें सगुण । संत सर्वज्ञ जाणती ॥ ७२ ॥
श्रीगुरुनाथीं शिष्य हितगुज सांगती ।
श्रीगुरुनाथ सर्व हि परिसती ।
स्वरूपसिंह्यासनीं बैसोनि सादर वाक्यें ऐकती ।
सद्गुरुस्वामी समर्थ ॥ ७३ ॥
नाना विनतिपत्रें निवेदनें । असत्शिष्य सच्छिष्य वर्तमानें ।
नाना दर्शनहेतु ऐकिजे श्रवणें । सद्गुरुनाथ समर्थें ॥ ७४ ॥
मुख्य **स्वात्मबोध** वर्तमान । नाना **दिग्पाळवार्ता** निवेदन ।
नाना **नवग्रह महर्षि** कथन । सद्गुरुचरणीं निवेदिती ॥ ७५ ॥

---

१ मालेंतील पहिला भाग श्रीदासबोध व पांचवा भाग श्री श्लोक मनाचे खेरीज करून श्रीसमर्थांची बरी च कविता तिसऱ्या भागांत आली आहे व आतां जी राहिली आहे तीं मालेंतील दहाव्या व अकराव्या भागांत येणार आहे. २ श्रीमत् दासबोध दशक अकरा, समास दहा पहा. ३ महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावें । जाणते करून विखरावें । नाना देशीं ॥. ४ मायातीता अनंताची । संत सोये सांगती.

**पंचीकरणी ब्रह्मगोळी** वर्तमानें । नाना **दैवी पांथिकी** वर्तमानें ।
**सृष्टिनिवेदनें आत्मशासनें**[1] । सद्गुरुचरणीं होताती ॥ ७६ ॥
नवखंड द्वीपावती अमरावती वार्ता । वैकुंठ कैलास सत्यलोक वार्ता ।
नाना देवावतार पूर्णावतार वार्ता ।
आदिपुरुषवार्ता श्रीगुरुचरणीं ॥ ७७ ॥
सद्गुरु समर्थ दयासिंधु पूर्ण[2] । अनन्य राहेना गुरुपदीं अपूर्ण ।
हरिहर ब्रह्मादिक देव संपूर्ण । ब्रह्मीं ब्रह्म पूर्ण भावार्थे ॥ ७८ ॥
**समर्थ सद्गुरु पूर्णभावें सेविती । त्यांचे सर्व हि मनोरथ पुरती ।**
**सर्व कामना परिपूर्ण होती । सद्गुरुसमर्थप्रतापें[3] ॥ ७९ ॥**
श्रीगुरुपदीं कैचें दृश्यपाप । श्रीगुरुकृपें ब्रह्म आपेंआप ।
सद्गुरुसमर्थस्वामीचा भानुप्रताप । उदयअस्तेंविण विराजे ॥ ८० ॥
सद्गुरुस्वरूप गगनभानुमंडळ ।
मरीचमृगांबोंसी[4] नाहीं चि स्थळ ।
ज्ञान अज्ञान तम प्रकाश समूळ । विद्या अविद्या असे चि ना ॥८१॥
श्रीगुरुचरणीं तत्त्वमसि त्रिवेणी । अधोर्ध्व व्यापक अखंडपणीं ।
समर्थप्रतापें गर्जे प्रसादवाणी । सज्जनपर्वतीं स्वानंदें ॥ ८२ ॥
माघ वद्य प्रतिपदेपासूनि । चैत्र शुद्ध प्रतिपदेशुभदिनीं ।
मोहछाहीं आरंभ उभयस्थानीं । चांफळपर्यळीमाझारी ॥ ८३ ॥
श्रीरामनौमी पुण्यतिथि उछह । कथानुकीर्तनीं मोहछह ।
संतसज्जनीं परमोछह । विश्व विख्यात आनंदें ॥ ८४ ॥
संत सज्जन स्वानंदें तोषती । जयजयकारें विश्वजन गर्जेती ।
आनंदें विधिगोळ भरूनि राहाती । समर्थसद्गुरुप्रतापें ॥ ८५ ॥

---

१ असे हे दहा हकिकतवाके गिरिधरांनीं श्रीसमर्थचरणीं निवेदन केलेले आहेत, त्यांचा उल्लेख या भागाच्या प्रस्तावनेंत आला आहे. २ माझा गुरु सद्गुरु रामदास । सर्वत्र जो पूर्णपणें उदास ॥ अशा पूर्ण गुरुपादुकांला जो अनन्य भावानें शरण जातो तो हि पूर्ण होतो, अपूर्ण राहत नाहीं. ३ प्रत्यहीं एक एक समास वाचून शेवटीं ही ओवी धरून पुढल्या अकरा ओव्या ह्मणण्याचा परिपाठ ठेवावा आणि गिरिधर सांगतात त्याचा अनुभव घ्यावा. ४ मृगजलासी.

समर्थप्रताप अद्भुत जाले । समर्थप्रताप विस्तारले ।

समर्थप्रताप श्रवण केले । ........[1]....समास संपूर्ण ॥ ८६॥

समर्थस्वामीचा हरिजन कवि । समर्थप्रताप अद्भुत जाणवी ।

संत सज्जन ब्रह्मानुभवी । ब्रह्मानंदें स्वानंदें ॥ ८७ ॥

ब्रह्मांडकोशीं माहालक्ष्मीस्थान । करवीरप्रतिमा बीडे[2] महिमान ।

तेथें वेणीगिरिधर मंत्री हजुरी जाण ।

समर्थप्रताप लिहितसे स्वानंदें ॥ ८८ ॥

इति श्रीसमर्थप्रताप ग्रंथ । प्रगट चालिला उदास पंथ ।

सभानायक साधु संत । आत्माराम परिसती ॥ ८९ ॥

समास ॥ २१ ॥ ७ ॥

॥ श्रीसमर्थप्रतापग्रंथ संपूर्णमस्तु ॥

॥ श्रीसद्गुरुनाथार्पणमस्तु ॥

॥ श्रीपदभक्तिरस्तु ॥

॥ श्री राम जय राम जय जय राम ॥




---

१ दोन्ही प्रतींत येथें जागा सोडली आहे. "येकवीस" असा शब्द या जागीं योजावा. २ हे बीड गांव मोगलाईतील एका जिल्ह्याचें ठिकाण आहे. तेथून जवळ च एका डोंगरावर देवीचें स्थान आहे. गिरिधरांची समाधि बीडास च आहे. समाधीवर शिलालेख आहे तो प्रस्तावनेंत दिला च आहे समाधिशक १६५१.